कादंबरीमय आंग्लशाही : २

# भारतमातेची हांक


विठ्ठल वामन हडप

'कादंबरीमय शिवशाही'कर्ता



आदर्श वाङ्मय प्रकाशन

कोल्हापूर.

# आदर्श वाङ्मय प्रकाशन

सम्पादक : **यशवंत हडप**

गांधीयुगाच्या आरंभापासून, गांधीजींचा ता. ३० जानेवारी सन १९४८ रोजीं वध झाला तेथपावेतोंच्या अगदीं आजकालच्या ऐतिहासिक कालखंडावरील पांच कादंबऱ्यांची ही '**कादंबरीमय आंग्लशाही**' माला कादंबरीकार हडप हे गुंफीत आहेत. या मालेंतील कादंबऱ्या दर तीन महिन्यांनीं एक याप्रमाणें यापुढें नियमित प्रसिद्ध होतील.

- भारतमाते ऊठ !
- भारतमातेची हांक
- भारतमातेचा शाप
- भारतमाता वनवासी
- भारतमाता की जय !



प्रथमावृत्ति, ऑक्टोबर १९४८

**किंमत तीन रुपये**



चित्रकार : दीनानाथ द. दलाल.
मुद्रक : कृ. ह. सहस्रबुद्धे,
श्रीज्ञानेश्वर प्रेस, कोल्हापूर.
प्रकाशक : यशवंत हडप,
आदर्श वाङ्मय प्रकाशन,
खासबाग, कोल्हापूर.

# भूमिका

'भारतमातेची हांक' ही या 'कादंबरीमय आंग्लशाही' मालेंतील दुसरी कादंबरी गांधीजींनीं सन १९३० सालीं केलेल्या देशव्यापी मीठ सत्याग्रहाच्या पार्श्वभूमीवर, कोंकणांतील शिरोडें मीठ सत्याग्रह हा मध्यबिंदु कल्पून त्या मध्यबिंदुसभोंवारच्या कोंकणांतील खेडुत जीवनाच्या परिसरांतील त्या वेळच्या वातावरणावर आधारलेली आहे.

माझ्या 'अन्नदाता उपाशी' या नव्याच सर्वत्र गाजलेल्या कोंकणांतील दारुण शेतकरी जीवनावरील कादंबरींतील खेडेगांवींचें जीवन ( सन १९२०–२१ ) त्यानंतर आठ–नऊ वर्षांनीं कसें असेल याचें सत्यात्मक प्रतीक आंग्लशाही मालेंतील या दुसऱ्या कादंबरींत स्वाभाविकपणेंच रंगविलें गेलें आहे.

या कादंबरींत काँग्रेसच्या व अर्थात् असहकारिता चळवळींतील, खेडेगांवी हिरे आहेत तसे कोळसेही आहेत. सत्यकठोर आत्मपरीक्षण ज्यांच्या प्रकृतीला मानवेल, त्यांना माझें एवढेंच सांगणें आहे कीं आजही आपल्या स्वतंत्र हिंद राष्ट्रांत काँग्रेसमधील हिरेही सांपडतात व कोळसेही सांपडतात. पं. जवाहरलाल नेहरूंसारखे हिरे निराळे दाखवून देण्याचें कारण नाहीं. आतां कोळशांबद्दल कटुसत्य बोलावें, तें आम्हीं कोणत्या तोंडानें बोलावें ? तें बाबू पुरुषोत्तमदास टंडन यांच्या अश्रूंनीं भिजलेल्या शब्दांत सांगायचें तर, "स्वराज्याचें हेंच फळ काय ? ज्यासाठीं आपण लढलों, कष्ट सहन केले आणि जीवितार्पण केलें, तें हेंच का ? माझे सहकारी देशभक्त इतक्या अधमावस्थेंत जाऊन पोहोंचतील असें मला अगोदर कळलें असतें तर मीं गुलामी पत्करली असती. जे काँग्रेसवाले स्वातंत्र्यासाठीं लढले व जे स्वतःला देशभक्त म्हणवून घेतात, त्यांच्याबद्दलच्या या कष्टदायक बातम्या मी ऐकतों, काँग्रेसवाल्यांविरुद्ध मोठ्या गंभीर अशा तक्रारी माझ्या तोंडावर फेकण्यांत येतात तेव्हां मी लज्जेनें मान खालीं घालतों व माझें हृदय दुभंग पावतें. सत्ता व संपत्ति मिळण्यासाठीं असा आत्म्याचा त्याग करूं नका."

टंडनजींना ज्या कॉंग्रेसमधील लोकांकडे पाहून वरच्यासारखे खेदजनक उद्गार काढावे लागले ते लोक नऊ दहा वर्षांपूर्वी समाजांत कॉंग्रेसचे कार्यकर्ते म्हणून कसे वागत व दिसत असत, सज्जन प्रामाणिक कॉंग्रेसनिष्ठांना ते कसे नडत, याचेंच कटु सत्यात्मक चित्र प्रस्तुत कादंबरींत आढळेल.

गेलें जवळ जवळ एक वर्ष माझ्या उजव्या हाताच्या अपघातांत वाया गेलें. एथील सरकारी इस्पितळांत चीफ सर्जन मेजर डी. एस्. खत्री, एल्. आर्. सी. पी., एम्. आर्. सी. एस्., आय्. एम्. एस्. ( सेवानिवृत्त ) हे कर्तव्यदक्ष व नितान्तनिष्णात डॉक्टर नसते, तर माझी खात्री आहे कीं माझा हात गमावलेला मला खास गवसला नसता. त्यांचे आभार मानायला मजपाशीं शब्द नाहींत.

कोल्हापूर,
गांधी जयंति
ता. २।१०।४८.

विठ्ठल वामन हडप

# भारतमातेची हांक

## दांडी यात्रेचे पडसाद

त्या दिवशीं दोन सूर्य उगवणार होते. एक साऱ्या जगाचा आणि दुसरा कोंकणांतील रत्नागिरी जिल्ह्यांत देवगड तालुक्यांतील काजरोळी गांवचा. आज सकाळीं त्या गांवीं एक तरुण कॉंग्रेसभक्त पुढारी येणार होते.

ता. १२ मार्च १९३० रोजीं सुरू झालेली महात्मा गांधींची दांडी यात्रा आतां एकट्या गुजराथ प्रांतापुरतीच मर्यादित राहिली नसून हिंदुस्थानच्या कोनाकोपऱ्यांत तिचे पडसाद सत्याग्रहाच्या रूपानें उमटूं लागले होते. काजरोळी हें दळणवळणाच्या साधनांच्या अभावीं मागासलेल्या रत्नागिरी जिल्ह्यांतील मागासलेलें खेडें खरें; पण त्या खेड्यांतही ते पडसाद घुमूं लागले होते. त्या जागृतीचें श्रेय, खरें सांगायचें तर, जवळच्या लिंगडाळवाडी या काजरोळीच्या वाडीवरचे रहिवासी शेतकरी, तेथील मराठी शाळेंतील तरुण मराठी असिस्टंट शाळा मास्तर आबा सदाशिव मेजारी ऊर्फ आबा मास्तर यांना होतें.

आज आपल्या गांवचा देशभक्त नवा धनी सदानंद देसाई गांवीं येणार ही वार्ता कानीं आल्यापासून काजरोळीकर कॉंग्रेसप्रेमी खेडुत शेतकरीवर्ग इतके दिवस जो सरकार, सावकार व जमीनदार यांच्या भीतीमुळें भिऊन अंग राखून वागत होता तो आज सारी भीति व सारा आळस झाडून धिटाईनें पोरासोरापासून म्हाताऱ्याकोताऱ्यापावेतों प्रसन्न झाला होता.

आपल्या गांवच्या अगर आजूबाजूच्या गांवच्या जमीनदार, सावकार कॉंग्रेसपुढाऱ्यांसारखा आज येणारा हा आपला गांवकरी कॉंग्रेसवाला

पुढारी नाहीं असें या नवीन येणाऱ्या देशभक्ताचें गुणगान आबा मास्तर गेल्या आठ दिवसांपासून शाळेंत मुलांपाशीं करूं लागले होते. आज तो देशभक्त नक्की येणार असें कळतांच तर आबा मास्तर गेल्या रात्रीं दोन मैलांवर असलेल्या लिंगडाळवाडीवरील आपल्या घरीं जेवायलाही गेले नाहींत. आपली चुलत मावसबहीण जमना राणे हिच्याकडेच त्या रात्रीं जेवायला राहिले.

त्यांना नव्या पाहुण्यांच्या स्वागतासाठीं सुदाम्याचे पोहे मूठ मूठ भिक्षा मागून जमवायचे होते. शाळेवर व देवळावर कागदी तिरंगी झेंडे कापून चिकटवून त्यांचीं गुढ्यातोरणें उभारायचीं होतीं, शाळेंतील मुलांना राष्ट्रीय गीतें नीट तालसुरावर गायला शिकवून आजपासून गांवांत प्रभातफेरी काढायची होती, आणि ह्या साऱ्या गोष्टी करण्यासाठीं गांवच्या पुढाऱ्यांना चुचकारून धूप घालून, त्याप्रमाणेंच ख्यातनाम गांवकुठारांना बाबा पुता करून, माणसाळवून सगळ्यांचा होकार मिळवायचा होता.

त्या सर्व गोष्टी मनाजोग्या झाल्या आणि भल्या पहांटेला शाळेंतील मुलांची प्रभातफेरी निघून तिनें सारा गांव खडबडून जागा केला. काजरोळी गांव कॉंग्रेस कमेटीचे अध्यक्ष यांच्या पुढारीपणाखालीं गांवचे निवडक शेतकरी तिरंगी झेंडा घेऊन पाहुण्यांच्या स्वागतासाठीं मोटारीच्या रस्त्याकडे गेले. कांहीं वेळानें आबा मास्तरही निवडक तीन शाळकरी मुलांना घेऊन फुलांच्या हारानें शृंगारलेला प्रभातफेरींतला तिरंगी झेंडा फडकवीत हारतुरे घेऊन तिकडे निघाले.

शाळेचे पडवळ हेडमास्तरही सज्जन खरे पण जरा भित्रे. चार कच्चीं बच्चीं पदरीं, तशांत पेन्शनीला आलेले. आणखी तीन वर्षांनीं पेन्शन घेणार होते. कॉंग्रेसचा तिरंगी झेंडा वाढत्या वैभवानें दिगंतांत फडकावा आणि आपला देश कॉंग्रेसच्या चळवळीनें खडबडून जागा होऊन जुलमी सरकारचा निःपात करीत स्वतंत्र व्हावा असें त्यांनादेखील वाटत होतें. पण ते त्या खोडकर म्हणून महशूर असलेल्या गांवाला व सभोंवारच्या परिस्थितीला भिऊन वागत होते. वरिष्ठांची आणि गांवांतील प्रतिष्ठितांची

मर्जी राखून कॉंग्रेसच्या चळवळीला जो काय यथाशक्ति हातभार लावतां येईल तो लावायला ते चुकत नसत.

आठ दिवसांपूर्वी काजरोळी गांवचा गंगाराम देवळी पोलीस पाटील यानेंही पोलीस अधिकाऱ्यांच्या विचारणेवरून—आणि लोक म्हणत कीं बापटशास्त्री सावकार यांच्या सांगण्यावरून—आबा मास्तर गांवांत कॉंग्रेसच्या चळवळींत भाग घेत असल्याबद्दल गुप्तपणें सरकारला कळवलें होतें म्हणे. आणि त्यामुळेंच कीं काय, आबा मास्तरांच्या वर्तनावर सक्त नजर ठेवण्याबद्दल वरिष्ठांकडून हेडमास्तरांना नुकतें कालच लिहून आलें होतें.

आणि तशांत हा आजचा दिवस उजाडला!

प्रभातफेरींतील निवडक मुलें बरोबर घेऊन आबा मास्तर येणाऱ्या पाहुण्याच्या स्वागतासाठीं सकाळींच मोटारीच्या रस्त्यावर निघाले; तेव्हां हेडमास्तरांनीं त्यांना मुद्दाम बोलावून सांगितलें होतें, "मास्तर! सांभाळा बरें! डगला—पट्टेवाला वाघ गांवांत आला आहे."

पण आबा मास्तर कसलेंही भय मनांत न बाळगतां, गांवांत पोलीस आला आहे आणि तो नेहमींप्रमाणें दारू गुत्तेदार पोलीस पाटलाचा पाहुणा म्हणून राहिला आहे, हें ध्यानीं घेऊनही, 'काय व्हायचें असेल तें होईल' असें म्हणत मोटारीवर पाहुण्याचें स्वागत करण्यासाठीं मुलें घेऊन गेलेच.

काजरोळी गांवच्या पस्तीस वर्षांच्या तरुण विधवा जमीनदारीण पार्वतीबाई देसाई यांचा तो तरुण देशभक्त पाहुणा सदानंद देसाई दत्तक मुलगा. तो आज बोटीनें मुंबईहून प्रथमच गांवीं येणार होता. पन्नाशीची झुळुक लागलेले देसाईणबाईंचे कारभारी नाना अधिकारी हे तिहेरी नात्यानें त्या येणाऱ्या पाहुण्याचें स्वागत करण्यासाठीं रस्त्याच्या तिठ्यावर हजर होते.

तिहेरी नात्यानें याचा अर्थ असा कीं, एक तर ते देसाईणबाईंचे मेहुणे—वडील बहिणीचे पति, व गेल्या आठ वर्षांपासूनचे कारभारी. शिवाय त्यांच्या या दत्तक मुलाचे जनक वडील. आणि काजरोळी गांव कॉंग्रेस कमेटीचे अध्यक्ष. कॉंग्रेसच्या प्रचारकार्याला आपल्या त्या टापूंत

चांगला जोर लागावा व महिना—पंधरा दिवसांत लवकरच शिरोड्याला होऊं घातलेल्या मिठाच्या सार्वजनिक कायदेभंगाच्या लढाईत काजरोळी गांव, सारा देवगड तालुका सत्याग्रही स्वयंसेवकांच्या भरघोस संख्येनें अग्रभागीं चमकावा ही त्यांची इच्छा. त्यांनींच सदानंदाला बी. ए. ची परीक्षा झाल्यावर आज मुंबईहून मुद्दाम प्रचारासाठीं इकडे बोलावलें होतें.

वडिलांची ती आज्ञा सदानंदानें शिरसा मान्य करून इथवर पल्ला गांठला होता याचाही नानांना भूषणरम्य अभिमान वाटत होता. आपला लेक कायदेभंगाच्या प्रचारकार्यासाठीं देवगड तालुक्यांत स्वतःच्या जमीन-दारीच्या काजरोळी गांवीं प्रथम येणार ही बातमी त्यांनीं रत्नागिरी जिल्ह्याचें कॉंग्रेसवादी मुखपत्र म्हणून प्रसिद्ध असलेल्या ‘ रत्नागिरी ’ पत्राला गौरवपूर्ण भाषेंत अगोदरच कळविली होती. ती त्यांच्या अपेक्षे-प्रमाणें कालच टपालानें हातीं आलेल्या ‘ रत्नागिरी’च्या ताज्या अंकांत प्रसिद्धही झाली होती.

“ अरे, तुम्ही वाचलीत का ही ‘ रत्नागिरी ’ मधली बातमी ? धरा, वाचा. ” असें म्हणून नानांनीं शिवराम तांबे या तिशीच्या घरांतील आपल्या एका तरुण कुळाच्या हातीं ‘ रत्नागिरी ’चा तो अंक खिशांतून काढून दिला. आपण तिथून उठून जवळच्या वडाच्या झाडाखालीं जाऊन बसले, व खिशांतून ‘ नवें जग ’ मासिकाचा अंक सदानंदानेंच थोड्या दिवसांपूर्वीं त्यांच्याकडे पाठविला होता तो काढून चाळून पाहूं लागले. वाचनाची त्यांना फारशी आवड व संवयही नव्हती. ‘ नवें जग ’चा तो अंक आठ दिवसांपूर्वीच टपालांतून त्यांच्याकडे आला होता. अजून त्यांनीं त्यावरचें वेष्टणही फाडलें नव्हतें.

मासिकाचें रंगीत वेष्टण उलटून त्यांनीं आंतील पृष्ठावर सहज नजर टाकली. तों पृष्ठाच्या प्रारंभींच ‘ प्रतिभाशाली उदयोन्मुख कथालेखक सदानंद देसाई यांची सत्याभासात्मक उद्बोधक लघुकथा ’ असें ठळक ठशांत छापलेलें होतें. त्याखालीं गोष्टीचा ठसठशीत मथळा त्याहून मोठ्या ठशांत छापला होता, व त्याखालीं गोष्टीचें रहस्य सूत्ररूपानें वाचकांच्या ध्यानीं आणून देण्यासाठीं गोष्टींतील एका पत्रांतील उतारा छापला होता.

नानांना कथाकादंबऱ्या हें वाङ्मय आवडत असे, असें नाहीं. परंतु ती चिरंजीवांनीं लिहिलेली गोष्ट, म्हणून त्यांनीं त्या रिकामपणच्या फावल्या वेळीं वात्सल्यपूर्ण कौतुकानें ती वाचायला सुरुवात केली:

## भारतपुत्रा! जागा हो!

प्रिय सुलभा!

मी महात्माजींच्या आदेशानुसार कायदेभंगाचें सतीचें वाण पत्करून आज घराबाहेर पडत आहें. आपण सुशिक्षित पांढरपेशी तरुण पिढी भारतमातेच्या पस्तीस कोटी संतानांचे ऋणी आहों. आपला देश जसा अठरा विश्व दारिद्र्यानें तसाच अशिक्षितपणाच्या अमावास्येच्या निबिड अंधारानें व्यापलेला आहे. या अंधारांतून हिंदुस्थानच्या सात लाख खेड्यांतील कोट्यवधि अजाण खेडुतांना हात देऊन प्रकाशांत आणण्याची जबाबदारी तुझ्या—माझ्यासारख्या सुखवस्तु, सुशिक्षित, पांढरपेशा तरुण पिढीवर आहे, हें मी तुला नेहमींच सांगत आलों आहें. तें पुन्हा पुन्हा कशाला सांगूं? आतां मला वेळ फार थोडा आहे. प्रचाराच्या मोहिमेवर एकदां निघाल्यावर देशभर वणवण करीत हिंडावें लागेल. तेव्हां केव्हां कशा खडतर प्रसंगाला तोंड द्यावें लागेल याचा काय नेम? प्रचाराला निघण्या-पूर्वी म्हणजेच मृत्यूच्या दरबाराकडे किंवा निदान तुरुंगाकडे जाणाऱ्या वाटेनें प्रवास करूं लागण्यापूर्वी तुला एकवार भेटावें अशी इच्छा होती. पण पुन्हा मनानें ठरविलें कीं—नाहीं, आज भेटायचें नाहीं. भेटायचें तर मिठाच्या कायदेभंगाच्या रणक्षेत्रावर वरवड्याला—तुझ्या जन्मगांवीं भेटायचें. तेव्हां भेट झाली नाहीं,— हो! तेव्हां भेट होईलच याचा काय नेम? अगोदरच एकीकडे मी चतुर्भुज झालों आणि दुसरीकडे तूं चतुर्भुज झालीस, तर रणक्षेत्रा-वर तरी आपली भेट होईलच कशावरून? अधिक लिहीत नाहीं. आपण दोघेंही चतुर्भुज होणार ना? त्या मंगल दिवसाची वाट पाहात रणक्षेत्राकडे प्रयाण करणारा—

तुझा (कोण म्हणायचा?)
सर्वानंद

इतकें नानांचें वाचून होतें आणि ते मासिकाचें पुढील पृष्ठ उलटूं लागतात तोंच देवगडहून येणाऱ्या मोटारीचा भोंगा वाजलेला त्यांना ऐकूं आला. शिवरामनें धांवत येऊन साखर मुखीं पडल्यासारख्या गोड हंसतमुखानें सांगितलें, "नाना! मोटार आली."

"आली? चला." असें म्हणत नाना तो मासिकाचा अंक खिशांत कोंबीत वर उठले.

●

पहांटेला देवगड बंदरांतून बोटीवरचे उतारू घेऊन निघालेली मोटार तिरंगी झेंडा फडकवीत सूर्योदयाच्या सुमाराला काजरोळीच्या तिठयावर येऊन थांबली. मोटारीची वाट पाहात तिथें उत्सुकतेनें उभे असलेल्या काजरोळीच्या खादीटोपीधारी खेडुतांनीं मोटारीकडे डोकावून पाहात प्रसन्न चित्तानें जयजयकार केला:

महात्मा गांधी की जय!

दे. भ. सदानंद देसाई की जय!

मोटारीच्या खिडकींतून एक बाविशीच्या उमरीचा नखशिखांत खादीधारी गोरापान तरुण हंसतमुखानें त्या जमावाकडे पाहात होता. त्याच्या हास्यांत उगवत्या सूर्याच्या कोमल किरणांचें शीतल तेजही होतें आणि चांदण्याच्या शीतलतेसारखी नम्रताही होती.

खेडुतांनीं व आबा मास्तरांच्या विद्यार्थ्यांनीं आपल्या गांवच्या त्या प्रसन्न उगवत्या सूर्यावर जयजयकाराबरोबर परड्या भरून आणलेलीं फुलें उधळलीं.

नानांनीं आपल्या मेहुणीच्या—या काजरोळी गांवच्या तरुण विधवा जमीनदारीणबाईच्या—मांडीवर तीन वर्षांपूर्वी आपला हा धाकटा मुलगा सदानंद दत्तक दिला होता ही गोष्ट साऱ्या गांवाला तेव्हांच गोड तोंडानें माहीत झाली होती. दत्तविधान काजरोळी गांवीं न होतां देवगड तालुक्यांतील कासार्डें गांवीं अर्थात् नानांच्या गांवीं झालें होतें. गांवकुठार लोक नसतीं विघ्नें आणतील, 'देसाईणबाईचा बारा वर्षांचा औरस मुलगा दिनकर देसाई वर्षांपूर्वी नाना व आपली आई यांच्या वर्तनाला विटून

चिडून घरांतून तोंड घेऊन गेला' असलें कांहीं काळेंबेरें बोलून सदानंदाला बिंथरवतील, तो खरोखर मेला नसेल म्हणूनही खोटेंनाटें सांगतील, म्हणून नानांनीं इतकी खबरदारी घेतली होती. तरीही गांवांत त्या समारंभाची साखर वांटून देसाईणबाईंनीं आपल्या साऱ्या शेतकरी कुळांचें तोंड गोड केलें होतें. त्यामुळें थांबलेल्या मोटारींतून तो खादीधारी हंसतमुखाचा सूर्य उगवलेला त्यांनीं जेव्हां पाहिला तेव्हां त्यांना त्याची ओळख पटायला मुळींच वेळ लागला नाहीं.

हलक्या हातानें आपल्या गांवकरी मंडळींना जरा बाजूला करीत आबा मास्तरांनीं मोटारीकडे जाण्यासाठीं आपल्या विद्यार्थ्यांना प्रथम वाट करून दिली; आणि त्यांच्या मागोमाग हंसतमुखानें सदानंदाच्या चर्येवर आपली स्नेहपूर्ण दृष्टि स्थिरावीत स्वतः पुढें झाले.

त्या तीनही मुलांनी हार, तुरे वगैरे साहित्य नीट व्यवस्थेनें हातीं धरीत मागें मास्तरांकडे वळून पाहिलें.

मास्तरांची नजर इषाऱ्यादाखल किंचित् हंसली. त्याबरोबर त्या तीनही मुलांच्या तोंडून जयजयकाराचे सुस्वर मंगल ध्वनी हवेंत निनादले:

दे. भ. सदानंद देसाई की जय !

त्या जयजयकाराबरोबरच त्या मुलांनीं बरोबर झोळीभर आणलेलीं फुलें मुठी भरभरून सदानंदावर पुन्हा उधळलीं. त्यांतल्या एका सडपातळ गोऱ्या व तरतरीत नाकाडोळ्यांच्या मुलानें आपल्या शेजारीं फुलांचा हार घेऊन बावरत्या लाजऱ्या वृत्तीनें उभा असलेल्या काळ्यासांवळ्या मुलाला डाव्या हाताच्या कोपरानें हळूच धक्का देऊन पाहुण्यांच्या गळ्यांत हातांतील हार घालण्याचा इशारा दिला. पण तोही अशा अवखळपणानें कीं तो बावरलेला काळासांवळा मुलगा आपलें काय चुकलें या भावनेनें आणखी बावरावा.

लगेच दुसऱ्याच क्षणाला त्या अवखळ मुलानें त्या मुलाच्या हातांतील फुलांचा हार हिसकून घेऊन सदानंदाच्या कंठीं घातला व त्याला हंसतमुखानें नमस्कार केला.

त्या मुलामागोमाग लगेच तिसऱ्या गोरटेल्या मुलानें त्या बावरलेल्या दुसऱ्या मुलाला उजव्या हातानें हलकेच पण बालसुलभ हेटाळणीनें बाजूला सारीत पुढें जाऊन आपल्या हातांतील गुच्छ सदानंदाच्या हातीं दिला व रुबाबांत तिरंगी झेंड्याला झेंडावंदनानंतर 'नमस्ते' करतात तसें प्रसन्न पण गंभीर वृत्तीनें 'नमस्ते' केलें.

सदानंदानें हंसतमुखानें त्या सत्काराचा स्वीकार करीत नमस्कार केला आणि दोन्ही हातांनीं त्या दोन मुलांना पाठीवर शाबासकी देत विचारलें, "काय रे, काय नांवें तुमचीं ?" हार घालणाऱ्या मुलाच्या हनुवटीला लाडका हात लावून तो त्याला म्हणाला, "तुझें नांव काय रे ?"

"भास्कर माधव काळे." तो मुलगा मोटारीकडे सावध चपळ नजरेनें पाहात गालांतल्या गालांत हंसत अवखळपणानें उत्तरला.

"म्हणजे निशिकांत काळ्यांचा धाकटा भाऊ का रे तूं ?"

पिकलेल्या शेतांत चरण्यासाठीं भरारत आलेल्या पक्ष्यानें शेतांतील बुजगावण्यावर नजरेची पाळत राखून सावधपणानें भाताच्या कणसांतील दाणे टिपावे तसा भास्कर महाराच्या पोराला शिवल्याबद्दल मोटारींतील आजोबांना भीत भीत पाहात उत्तरला, "होय."

"आणि तुझें रे काय नांव ?" सदानंदानें गुच्छ देणाऱ्या दुसऱ्या मुलाच्या डोकीवरील तिरपी खादी टोपी हळूच कुरवाळीत विचारलें.

"शेख महंमद शेख उस्मान." तो मुलगा पाणीदार पण स्थिर नजरेनें सदानंदाच्या नजरेला नजर भिडवीत हंसतमुखानें उत्तरला.

"शाबास ! आजकाल मुलें धीट असावीं तर अशीं असावीं." सदानंद त्या मुलांकडे व त्याला लागून मागें उभे असलेल्या आबा मास्तरांकडे पाहात प्रसन्न वृत्तीनें उद्‌गारला, "हिंदू मुसलमान एक-दिलानें असे आपल्या भारतमातेच्या उद्धारासाठीं तिरंगी झेंड्याखालीं आणून उभे करणारे सुजाण शिक्षक आमच्या गांवाला लाभले आहेत हें मी आमच्या गांवाचें मोठें भाग्य समजतों."

आबा मास्तरांनीं तें ऐकून कृतज्ञतापूर्वक सदानंदला नमस्कार केला व त्या बावरलेल्या मुलाला हाताशीं धरून त्याच्यापुढें नेत हळूच म्हटलें,

"अशा घाबरतोस काय? महार म्हणून काय असें भ्यायचें? तुम्हां अस्पृश्यांचा उद्धार करण्यासाठीं महात्माजी कसे रात्रंदिवस आपलें रक्त आटवीत आहेत हें वर्गांत नाहीं मी तुम्हाला समजावून सांगत?" ते त्या मुलाला सदानंदापुढें करीत म्हणाले, "हा आमच्या शाळेंतला सर्वांत हुषार महार विद्यार्थी. शाळेंत नेहमीं याचा पहिला नंबर असतो. या वर्षी त्याला आम्ही मिड्ल स्कूल स्कॉलरशिप्च्या परीक्षेला बसवणार आहों. आमचे हेड मास्तर देखील म्हणतात कीं हा मुलगा आमच्या जिल्ह्यांतच काय पण साऱ्या मुंबई इलाख्यांतही पहिला येईल."

"शाबास!" सदानंद त्या मुलाला आपुलकीच्या कळवळ्यानें जवळ ओढीत त्याच्या पाठीवरून प्रेमानें हात फिरवीत म्हणाला, "काय रे, तुझें नांव काय?"

"पिरा शिवा म्हार." तो मुलगा घाबरट नजरेनें सदानंदाच्या व आबा मास्तरांच्या तोंडाकडे पाहात दोन्ही हात जोडीत उत्तरला.

"काय सांगितलें आहे मीं तुला? कसें नांव सांगायचें?" आबा मास्तरांनीं किंचित् भुंवया चढवीत दटावणीच्या पण हंसऱ्या नजरेनें त्या आपल्या आवडत्या विद्यार्थ्याच्या अंतःकरणाचें कवाड उघडीत विचारलें.

"पिराजी शिवाजी काजरोळकर." तो विद्यार्थी पाण्यांत उमलूं लागलेल्या कळीसारख्या लाजऱ्या नजरेनें आबा मास्तरांकडे पाहात म्हणाला.

पिराजीच्या पाठीवरून प्रेमानें हात फिरवीत सदानंद आबा मास्तरांकडे पाहून म्हणाला, "शाबास! महात्माजींना आपण पत्र पाठवून या मुलाची हकिगत कळवूं. का हो मास्तर! स्कॉलरशिप मिळते याला?"

"नाहीं. कांहीं मिळत नाहीं. हा असा—अंगावर धड कपडाही नाहीं, आणि कित्येकदां तर उपाशी देखील शाळेंत येतो! मग मधल्या दुपारच्या सुट्टींत देऊळवाड्यांत चार घरीं हिंडून उंड्या मागून खातो." आबा मास्तर पिराजीची हनुवटी कुरवाळीत उद्गारले.

"उकिरड्याच्या ढिगाऱ्याखालीं दडपले गेलेले असले कोहिनूर हिरे त्या उकिरड्याच्या राशी आम्ही त्यांच्यावर रचलेल्या आमच्या हातानें उपसून टाकून असे उजेडांत आणले पाहिजेत. अशा हिऱ्यांच्या दिव्य

प्रकाशानेंच आपल्या भारतमातेच्या स्वातंत्र्याचा मार्ग आमच्यासाठीं उजळणार आहे. तुम्ही या मुलांचे मास्तर काय ? " सदानंदानें वाढत्या उत्सुकतेनें विचारलें. आबा मास्तरांशीं त्याचा एक नवोदित साहित्यिक या नात्यानें अलीकडे पत्रव्यवहार होत असे. त्या दोघांची पत्रद्वारां चांगली मैत्री जुळलेली होती. तेच हे आबा मास्तर असावेत असें त्याला वाटलें.

" होय. " आबा मास्तर हात जोडून नम्रपणें उद्गारले.

पिराजी मोटारींतील बापटशास्त्र्यांना आणि बाजूला उभ्या असलेल्या नानांना पाहून कीं काय, एकदम भिऊन अंग चोरीत मागें सरला आणि जरा दूर एका झाडाखालीं आपली अस्पृश्याची पायरी ओळखून जाऊन उभा राहिला. सदानंदाच्या उत्तेजनपर कौतुकपूर्ण बोलांनीं त्याच्या परित्यक्त, उपेक्षित, नरकतुल्य अशा मरगळलेल्या कष्टमय जीवनाला जरा कुठें टवटवी येऊन तें जीव धरूं लागलें होतें, ती सारी टवटवी बापटशास्त्र्यांना—त्या सनातनी दुर्वासाला—पाहातांच आभाळी खार पडून त्या खारींत करपून जाणाऱ्या आंब्याच्या कोंवळ्या मोहोरासारखी करपून गेली.

थोड्या दिवसांपूर्वी सनातनी नानांनीं शिवा महाराला—या पिराजीच्या बापाला—आपल्या म्हणजे देसायांच्या सड्यावरील रानगवत वरंडभर 'चोरून' कापल्याबद्दल मरेमरेतों पायांतल्या पायतणांनीं बडवलें होतें.

तेवढ्यांत मागाहून आबा मास्तरांना औपरोधिक हांक ऐकूं आली, " अहो मास्तर ! "

ते मागें वळून पाहतात तों शिवरामनें कांहींशा अप्रसन्न वृत्तीनें त्यांच्याकडे पाहात त्यांना नजरेनें सुचविलें कीं, आम्ही गांवकरी मागें खोळंबून उभे आहों; तुम्ही आतां जरा बाजूला सरा.

तें ध्यानीं घेऊन आबा मास्तर बाजूला सरले.

आपल्या आजूबाजूच्या खेड्यांत जाणारे उतारू मोटारींतून तिठ्यावर उतरले. त्यांतच काजरोळीशेजारच्या दहीबाव गांवचे पन्नाशी उलटलेले बापटशास्त्री सावकार आपली खादीची टोपी उजव्या हातानें आपल्या गोऱ्या तुळतुळीत मस्तकावर सांवरीत डाव्या हातांत खादीच्या फडक्यांत

गुंडाळलेलें लहानसें गाठोडें घेऊन सदानंदाकडे स्मितहास्यपूर्वक न्याहाळून पाहात खालीं उतरले.

आबा मास्तर त्याच पावलीं निराशेनें खट्टू होऊन सर्व मंडळींचा डोळा चुकवून मागच्या पावलीं मागें चालले. त्यांना तिथून जातांना अतिशय वाईट वाटलें. पण करतात काय ? आधींच आपल्या कुळाचा—सदबा मेजाऱ्याचा—हा माजोरी मुलगा म्हणून बापटशास्त्र्यांचा त्याच्यावर राग. कोंकणांतील खोत, जमीनदार, सावकार यांच्यावर भाषणांतून आणि लेखांतून खरी खरी सडेतोड टीका करणारा आबा मास्तर हा बापटशास्त्री, नाना, गंगाराम देवळी पोलिस पाटील वगैरे थोर मंडळीला आपला वैरीसा वाटे.

•

आपण नेसलेलें धोतर, अंगांत घातलेला सदरा व अंगावरील उपरणें हे कपडे अस्सल खादीचे नसून आपल्या देवगडच्या दुकानांतील गिरणीच्या खादीचे आहेत ही जाणीव बारीकशा कुसळासारखी समोरच्या त्या तरुण खादीधारी देशभक्ताकडे पाहून बापटशास्त्र्यांच्या अंतःकरणांत जरा सलूं लागली. त्यांनीं धारण केलेले कपडे हातसुताच्या हातविणीच्या शुद्ध खादीचे होते कीं गिरणीच्या खादीचे होते हें सभोंवारच्या लोकांना कळायला कांहीं मार्ग नव्हता. तशी शंकाही तिथें कुणाच्या मनांत आली नाहीं. खेडेगांवीं झुळझुळ वाहणारी लोकगंगा ती. शहरांतल्यासारखें तिचें पात्र जरी चहूं मुलखींच्या बातम्यांनीं व माहितीनें खळाळत महानदीसारखें अथवा सागरासारखें रुंदावलेलें नव्हतें, तरी त्या गंगेंत पावसाळी नदीप्रवाहाचा गढूळपणा अगर समुद्राच्या पाण्याचा खारटपणा नव्हता. खादी हातसुताची व हातविणीची असते तशीच देशी गिरणीची अथवा जपानी बनावट खादीही असते, तसेंच बापटशास्त्र्यांसारखे कांहीं खादीधारी ' यथाशक्ति ' देशभक्तही असतात, हे खादीव्रतांतील पर्याय त्या खेडुतांना काय माहीत ?

' यथाशक्ति ' या बोंचक शब्दाची वानगी बापटशास्त्र्यांनीं नुकतीच दोन आठवड्यांपूर्वी ' नवें जग ' मासिकांतील सदानंदाच्या त्या गोष्टींतून

नाखुषीनें कोयनेलसारखी चाखून पाहिली होती. स्वदेशीच्या जाज्वल्य पुरस्कारासाठीं परदेशी दारूवर संपूर्ण बहिष्कार घालून फक्त स्वदेशी दारू पिणारा दारुडा देशभक्त व खादीधारीपणांतील फेसाळ प्रचारमहिमा तेवढा अचूक ध्यानीं घेऊन त्या प्रचाराला बळकटी आणण्यासाठीं शुद्ध खादीऐवजीं गिरणीची जपानी खादी वापरणारा 'यथाशक्ति' देशभक्त, असल्या त्या गोष्टींतील छद्मी कोंपरखळ्या कथालेखकानें कोणाही देश-भक्ताला अनुलक्षून मारल्या असोत वा नसोत, त्यांतली एक कोंपरखळी अंधारांतून सूं सूं करीत येणाऱ्या गोळीसारखी बापटशास्त्र्यांच्या अंतःकर-णाला जखमी करून गेली होती खरी.

सदानंद हा नुसता कॉंग्रेसनिष्ठ जहाल कॉलेजकुमार नसून उपजत बुद्धीचा प्रतिभाशाली कवि व कथालेखकही आहे; तो शेतकरी, कामकरी, शिक्षक अशा खेडेगांवी दलित जनतेचा कैवारी आहे व तो प्रसंगविशेषीं टीकाही अत्यंत मार्मिक करतो, असा त्याचा सौम्य कीर्तिपरिमल गेल्या दोन वर्षांपासून दरवळूं लागला होता.

बापटशास्त्र्यांना त्या खेडुतांची नाहीं तरी त्या तरुण खादीधारी देश-भक्ताची किंचित् लाज वाटलीच. आपण गांव कॉंग्रेस कमेटीचे अध्यक्ष व आपल्या तालुक्यांतील कॉंग्रेसचे निष्ठावंत जबाबदार प्रचारक पुढारी, आणि आपल्या अंगावर शुद्ध खादी नाहीं हें जर त्या तरुण देशभक्तानें ओळखलें तर ?

असे शास्त्रीबुवा आपल्याच सांवलीला भीत चोरट्या अंगानें त्या खेडुतांच्या गर्दींत अग्रभागीं उभे असलेल्या खादीधारी नानांपाशीं गेले आणि हंसतमुखानें म्हणाले, "नाना! इतके दिवस आम्ही वर्तमान-पत्रांतून तुमच्या चिरंजीवांची नुसती कीर्तीच ऐकत होतों. पाहिलें नव्हतें प्रत्यक्ष कधीं. म्हणून मीं मोटारींत ओळखलें नाहीं यांना. तुम्ही मोठे भाग्याचे आहां नाना! म्हणून तुमच्या पोटीं असला हिरा निपजला. असलें त्रिभुवनाच्या मोलाचें तेजस्वी रत्न तुम्हीं आमच्या देसाईणबाईच्या ओटींत घालून एकट्या काजरोळी गांवावरच नव्हे तर आमच्या साऱ्या रत्नागिरी जिल्ह्यावर फार मोठे उपकार करून ठेवले आहेत."

तोंच सदानंद सभोंवार जमलेल्या गर्दींतून वाट काढीत पुढें आला व वडिलांना नमस्कार करून हंसतमुखानें समोर उभा राहिला.

बापटशास्त्री कुतूहलपूर्ण प्रसन्न वृत्तीनें तिकडे पाहूं लागतात तोंच नानांनीं वात्सल्यपूर्ण स्वरांत त्याला सुचविलें, "हे आपले दहीबावचे बापटशास्त्री. मोठे सावकार आहेत. काँग्रेसचे आमच्या तालुक्यांतले मोठे पुढारी आहेत. दहीबाव गांव काँग्रेस कमेटीचे अध्यक्ष आहेत. शिरोड्याला यांची मोठी मिळकत आहे. तिथें कांहीं मिठागरेंही यांच्या आणि तिथल्या खटपटे सावकारांच्या भागीदारी मालकीचीं आहेत. शिरोड्याला लवकरच होऊं घातलेल्या मिठाच्या सत्याग्रहांत पहिला प्राण यांनीं ओतला आहे. आपल्या काँग्रेसच्या सत्याग्रही स्वयंसेवकांना सत्याग्रही मीठ लुटण्यासाठीं यांच्या मिठागरांत मुक्तद्वार मिळणार आहे."

शिरोडें हा शब्द कानीं पडतांच एकदम अंतःकरणावर ताज्या फुल-लेल्या आपल्या आवडत्या जाईजुईच्या फुलांची पखरण पडावी तशा रम्य मधुर पूर्वस्मृती सदानंदाच्या मनांत उचंबळूं लागल्या. नुकतीच मुंबईला प्रचारकार्यांत परिचयाची झालेली त्याची आवडती मैत्रीण प्रतिभा खटपटे हिची ती जन्मभूमि; आणि आतां लवकरच ती भूमि भारतवर्षाच्या भाग्योदयासाठीं प्राणार्पणाच्या तयारीनें अहिंसात्मक युद्ध लढायला हंसतमुखानें त्या रणक्षेत्राकडे जाण्याच्या मार्गावर असलेल्या भाग्यवंत देशभक्तांची कर्मभूमि ठरणार होती.

"प्रचारकार्यासाठीं आलां असाल तुम्ही? मीं कालच वर्तमानपत्रांतून तुमचा दौरा आपल्या तालुक्यांत सुरू होणार आहे असें वाचलें होतें. तेव्हां लगेच शिरोड्याला आमच्या आप्पासाहेब खटपट्यांना पत्र लिहून टाकलें देखील कीं तुमची प्रतिभा काँग्रेसची केशरी स्वयंसेविका मुंबईला आहे तिला सरकारी लाठीमाराच्या आणि गोळीबाराच्या खाईत उतरून चळवळीचें रान पेटवायला शिरोड्याला कां नाहीं बोलवीत?" ते सदानंदकडे स्नेहपूर्ण दृष्टिक्षेप फेंकीत नानांना म्हणाले, "असला निधड्या छातीचा सव्यसाची तरुण योद्धा इथें येऊन कायदेभंगाचें रणशिंग फुंकूं लागल्यावर इंग्रजांच्या जुलमी सत्तेचें खांडववन आमच्या तालुक्यांत या

खेडोपाडीं, घरोघर, झोंपडीझोंपडींतून हां हां म्हणतां कसें भडकतें पाहा तरी! आमची प्रतिभा देखील अशीच तळपती वीज आहे. ही तुमच्या चांगली ओळखीची आहे असेंहि आप्पासाहेबांनीं पत्रांत लिहिलें होतें. मीं तिला पत्र पुन्हा पाठवायला आप्पासाहेबांना लिहिलें आहे, कीं तिला आतां शिरोड्याच्या मिठाच्या लढाईत नांदीपासून भरत-वाक्यापर्यंत वेंगुर्ले तालुक्यांतच प्रचारासाठीं संचार करूं द्या. सारी जमीन नांगरून तयार आहे महाराजा! आतां तिच्यांत फक्त पेरणी करायचा अवकाश आहे, कीं खुळें पीक हां हां म्हणतां वारेमाप उफाळून येईल. आपल्या तालुकाभर खेडोपाडीं शिरोड्याच्या मिठाच्या सत्या-ग्रहासाठीं सभा झाल्या पाहिजेत. प्रचार झाला पाहिजे. मी म्हणतों घरटीप नाहीं तर गांवटीप तरी दरेक गांवांतून दहा दहा सत्याग्रही आम्ही शिरोड्याच्या लढाईवर पाठविले तरी एकट्या आमच्या देवगड तालु-क्याच्या एकशेंपस्तीस गांवांतून साडेतेराशें सत्याग्रही सैन्य खडें राहील. तुमच्यासारखा नवा तरुण पुढारी लाभल्यावर मग हो काय? बहार उडेल! आमचा नानू देखील मुंबईत या चळवळींत जोरानें भाग घेतो म्हणतात. तुम्हांला तो चांगला ओळखतो. तोही येणार आहे विल्या-पार्ल्याहून शिरोड्याला येणाऱ्या सत्याग्रही तुकडीबरोबर."

"कोण?" सदानंदानें प्रश्न केला.

"निशिकांत माधव काळे."

"होय. निशिकांत माझ्या ओळखीचा आहे. आमचा एक चांगला मित्र आहे तो." तो माझा व प्रतिभेचाही मित्र आहे हें सांगण्याचें संकोचानें टाळीत सदानंद उत्तरला.

"माझा नातू तो. हिंदळगांवला दिलेल्या माझ्या मोठ्या मुलीचा मुलगा. गेल्या वर्षी बी. ए. झाला. त्याला आम्ही सांगतों आहों कीं इतका शिकल्यासारखा एकदां एल्‌एल्. बी. हो आणि मग खुशाल देशकार्य कर. देशकार्याला झाला तरी वकीली बाणा अवश्य लागतो. लोकमान्य टिळक वकील होते. महात्मा गांधीदेखील वकील आहेत. सरकारचीं बोटें सरकारच्या डोळ्यांत घालून चळवळ करायची तर युक्तिबाज

वकिली डोकें त्याला हवेंच. मी तर आमच्या प्रतिभेलासुद्धां नेहमीं सांगतों कीं चांगली वकील हो आणि नांव काढ. आपल्या जिल्ह्यांत अजून कोणी बायको माणूस वकील झालेली नाहीं. प्रतिभा वकील झाली आणि मग देशकार्यांत पडली तर ती आमच्या रत्नागिरी जिल्ह्याची सरोजिनी नायडू होऊन बसेल. पुढारी म्हणून मिरवायचा परप्रांतांतल्या बायकांनाच काय मक्ता दिला आहे? प्रतिभा तशी फार बुद्धिवान पोरगी आहे. बरें, तुम्ही आमच्या गांवीं प्रचारासाठीं येणार ना?"

"येणार तर! मी एकदोन आठवडे ह्या तालुक्यांत आणि साधल्यास मालवण—वेंगुर्ल्याकडेही हिंडून जनतेला जागी करणार आहें. रान जितकें उठवतां येईल तितकें थोडें आहे. पण माझी खात्री आहे कीं महात्माजींनीं आरंभिलेला पांडवकालीन राजसूय यज्ञाच्या तोडीचा हा यज्ञ आपल्या देशाच्या दुरितांचें जाळून सर्वमंगल केल्याखेरीज शांत होणार नाहीं."

"दुरितांचें सर्वमंगल!" ते सदानंदकडे आपले जोडले हात वळवून नानांकडे पाहात उद्गारले, "पूज्य महात्माजींच्या अहिंसाधर्माचें असें सर्वोदयकारक दर्शन घडलें कीं इंग्रजी जुलुमाच्या जोखडाखालीं जगावें कीं मरावें ह्या चिंतेनें झुरणीला लागून पांगळें बनलेलें हें मन पंचविशीच्या उमेदीचे अलंकार लेऊन खदखदां हंसून सांगूं लागतें कीं मी जगणार! मरणार नाहीं, जगणार! मला मारणारांना मारून जगणार!..."

तोंच आपल्या तोंडून बोलण्याच्या ओघांत अचानक निघून गेलेला 'मारून जगणार' हा शब्दप्रयोग आपल्या अहिंसाधर्माच्या ब्रीदाला कलंक लावणारा आहे कीं काय अशा अनुकंपामय भीतीनें त्यांनीं आपल्या वाणीच्या ओघाला एकदम कलाटणी दिली, "मारून जगणार म्हणजे काय; आमच्यावर अस्मानी सुलतानी गाजवणाऱ्या इंग्रजांच्या ठायींची आसुरी वृत्ति आमच्या अहिंसाधर्माच्या पालनानें नाहींशी करून त्यांना माणसें बनवणार! राक्षसांच्या ठायींची राक्षसी वृत्ति मारून त्यांना माणसें बनवणें म्हणजेच त्यांना मारणें. एरव्हीं ते आपले शत्रू थोडेच आहेत? माणूस माणसाचा कधीं शत्रू नसतो—खरें ना नाना?"

नाना त्यावर नुसते गालांतल्या गालांत हंसले.

•

आपल्या देशभक्त पुत्राच्या देशभक्तीचें गौरवपूर्वक कोडकौतुक करण्यासाठीं आलेले काजरोळी गांवचे शेतकरी खेडूत दबकून बाजूला निमूटपणें खोळंबल्यासारखे उभे आहेत हें ध्यानीं घेऊन नाना सदानंदाला म्हणाले, "अरे, दरिद्रीनारायणाचे सेवक तुम्ही, खेडोपाडींच्या कुणब्याशेतकऱ्यांचे आणि काबाडकष्टानें रंजल्या गांजलेल्यांचे कैवारी. हे आमचे कुसक्या काष्टीचे दरिद्रीनारायण इतक्या हौसेनें स्वतःच्या बुद्धीनें तुला पाहायला शेतांतलीं कामें तशींच अर्धीं टाकून धांवून आले. त्यांची विचारपूस करायचें सोडून हें काय हें? जा, जा तूं अगोदर मंडळींकडे!" सदानंदला त्या खेडुतांच्या मेळाव्याकडे वळवीत बापटशास्त्र्यांकडे पाहून ते म्हणाले, "मी जरा देवगडला जाऊन येतों बापू! आज तुम्ही आतां थेट घरींच जाणार ना?"

"होय." शास्त्रीबुवा नानांनीं भानावर आणून सोडल्यासारखे आपल्या गांवच्या वाटेकडे वळतां वळतां सदानंदकडे पाहून म्हणाले, "आमच्या गांवीं यायचें कबूल केलें आहे तुम्ही. केव्हां येणार? आज संध्याकाळीं?"

"नाहीं,—नाहीं बापू! आज ते नाहीं यायचे." शिवराम हातांतील तिरंगी झेंडा उंचावीत पुढें होऊन म्हणाला.

"बरें बाबा! माझें राहिलें. आज नाहीं तर उद्यां तरी यांना घेऊन येणार ना तूं आमच्या गांवीं?" शास्त्रीबुवा सदानंदकडे वळून पाहात हंसत म्हणाले, "हा आमच्या तालुक्याचा वल्लभभाई. तुमच्या काजरोळी गांवचा दरिद्रीनारायणांचा खंदा तरुण पुढारी...झाल्या गेल्या गोष्टी बोलूं नयेत; पण आतां—हे नाना, तुम्ही, त्या वाईटाचें चांगलें करीत आहांत. मातीचें सोनें करायची किमया महात्माजींनीं आपणा सर्वांना शिकवली, त्या किमयेच्या प्रभावानें आतां त्या मातीचें सोनें झालें आहे. उदक वाहून गेलें आणि गंगा तेवढी राहिली.—तुमच्या आजोबांचा खून करून फांशीं गेलेल्या तुमच्या कुळांपैकीं एकाचा हा मुलगा शिवराम

तांबे.—आतां सांगा, उदक गेलें आणि गंगा राहिली असें मीं म्हटलें तें खरें कीं खोटें ? ”

“ अगदीं लाखांतली गोष्ट बोललां शास्त्रीबुवा ! उदक गेलें आणि गंगा राहिली. ” त्या खेडुतांच्या गर्दीतून एक ऐन विशींतील कोंवळी मिसरूड फुटूं लागलेला तरुण उत्सुकतेनें पुढें होऊन उद्गारला.

“ होय होय. उदक गेलें आणि गंगा राहिली. पण आतां ही गंगा मरणाला टेकलेल्या गरीबांच्या मुखीं लागून त्यांना देवाघरचा पुण्याईचा रस्ता मोकळा करून देते कीं गांवांतल्या नाठाळ दारुड्या जनावरांना गुत्त्यावर जाऊन दारू प्याल्यानंतर चूळ भरायला उपयोगीं पडते हेंच आपणाला पाहायचें आहे. ” शिवराम वर मान करून त्या तरुणाला अनुलक्षून हंसत बापटशास्त्री, नाना व सदानंद यांच्याकडे पाहात उद्गारला.

“ सावळाराम ! पाहा बुवा ! आतां गांवचा उद्यांचा पोलीस पाटील तूं आहेस. गंगारामाचें काय; तो आतां नुसता सह्याजीराव. याचा मोठा भाऊ तिकडे मुंबईत लालबुंद गिरणभाई होऊन उंडारतो आहे. त्याचा असून नसून बापाला उपयोग काय ? तूं तरी जरा आतां नीट काळ वेळ ओळखून वागायला शीक. तुझ्याकडे या आमच्या वल्लभभाईची नजर रागानें वळूं लागली आहे बरें का ! ” एवढें बोलून बापटशास्त्री जरा मागेंपुढें पाहात खांकरत दहीबावच्या वाटेला लागले.

त्यांनीं खाकरून मागें पुढें वळून काय पाहिलें तें आणखी कुणाला कळलें नाहीं तरी त्यांच्या मागोमाग हळूच मोटारींतून उतरलेल्या एका माणसाला कळलें. तो माणूस इतका वेळ पलीकडे एका झाडाआड उभा होता. तो त्या इशाऱ्यासरसा जणूं कांहीं आपण त्या गांवचेच नाहीं असा बहाणा करीत शास्त्रीबुवा चालत होते त्या अनुरोधानें चालूं लागला. त्यानें आपला बेलिफाचा पट्टा अगोदरच देवगडहून निघतांनाच आपल्या दप्तराच्या गाठोड्यांत बांधून घेतला होता. शिवाय तो तालुक्याला नवीनच बदलून आलेला. त्यामुळें त्याला बेलीफ म्हणून फारसें कोणी ओळखूं शकलें नाहीं.

सदानंद देसाईणबाईच्या मांडीवर दत्तक बसल्यामुळें काजरोळी गांवांतील धनी झाला असला तरी तो आज त्या गांवीं व त्या टापूंत उपराच. तो त्या बेलीफाला ओळखूं शकला नाहीं. पण तो बेलीफ मात्र सदानंदाला ओळखूं शकला. कारण याच आठवड्यांत आज उद्यां तोही काजरोळी गांवचा रहिवासी व देसायांच्या त्या गांवांतील वृंदावन शेता-पुरता लहानसा धारेकरी–मालक होणार होता.

बापटशास्त्र्यांकडे देसायांकडून बरींच वर्षे गहाण असलेलें व बाबा देसायांचा खुनी रघुनाथ राणे याच्या तरुण विधवा बायकोकडे–जमनाकडे खंडानें तें शेत होतें. गहाणाची रक्कम अवघी पांचशें रुपये. आणि ठिकाण तर असें तालेवार कीं जमीन म्हणजे सोन्याचा तुकडा. पण खुनी रघुनाथ फांशीं गेल्यावर समंध होऊन त्या ठिकाणांत मिरास धरून बसला आहे, तो नडेल या भीतीनें जमनेशिवाय दुसरें कोणी कूळ तें ठिकाण खंडानें करायला तयार नाहीं. आणि जमना तर शेताचा दुपिकी खंड, सालीना किमान पीक–दीड खंडी भात व दहा मण नाचणे, सावे, हरीक असें वरकस धान्य, आणि शिवाय आंबे, फणस, उंडल, चार धरते माड यांचें उत्पन्न निराळेंच,–एवढ्या उत्पन्नाचा अवघा सहा मण खंड घाली. म्हणून कंटाळून बापटशास्त्र्यांनीं तें शेत जमनालाच सहाशें रुपयांना खरेदी देऊं केलें होतें. जमना तरी तो बेलिफच्या नोकरीवर असलेला तिच्या माहे-रचा कासार्डें गांवचा शेजारी रावबा विचारे याच्या धीरावर हा सौदा करायला उभी राहिली होती. रावबाची बायको नुक्ती दोन वर्षांपूर्वी बाळंतपणांत मेलेली. अशा स्थितींत दोघेंही एकमेकांना पटलीं, भाळलीं. आतां उद्यां जमना रावबाची पाटाची बायको होणार होती. आणि राव-बाच्या पैशावर तें ठिकाण विकत घेऊन ती आतां, तिचें वाटोळें करतां करतां खून झालेल्या बाबा देसायाच्या त्या ठिकाणांत सत्तेचें खोपटें बांधून संसाराचा नव्यानें मांड मांडणार होती. हें फक्त तिला, तिच्या आईला व रावबाला काय तें माहीत होतें.

बापटशास्त्र्यांना तरी फक्त एवढें माहीत कीं रावबा विचारे बेलीफ जमनाच्या माहेरचा शेजारी तिला शेत विकत घ्यायला उसनवार पैसे

देणार आहे. अवांतर गोष्टींची ते कशाला चांभारचौकशी करतात! तूर्तास निरुपायानें ऋणकोच्या घरावर गुपचुप हुकमी जप्ती नेऊन दरखास्तीच्या रकमेची जप्ती करायला तर तो बेलीफ उपयोगीं पडत होता!



त्या मंडळींना दिसणार नाहीं इतक्या अंतरावर रस्ता चालून गेल्यावर बापटशास्त्र्यांनीं एकवार मागें वळून आपणाकडे कोणी पाहात नाहीं याची खात्री करून घेतली; आणि ते मागाहून येणाऱ्या रावबा बेलिफासाठीं रस्त्यांतच थांबून म्हणाले, "नीट आठवण आहे ना काय काय करायचें तें? मी नुसता दुरून तुला सदबा मेजाऱ्याचें घर दाखवून देईन. आमचा हरिबा देवधर तर काय मुलखाचा बावळट धनको आहे. मग काय करतोस बाबा! गरीब माणूस हरिबा फुकट मरेल म्हणून अशी तत्त्वाला थोडी मुरड घालून वाट दाखवावी लागते रे! कोर्टकचेऱ्यांवर बहिष्कार घालावा हें तर खरेंच. पण बिचाऱ्या हरिबानें तरी इथें काय करावें रे? कोर्टकचेरीचें तोंड पाहाणें नको म्हणून तडजोडीनें तंटा तोडायची आम्हीं होती नव्हती तेवढी शिकस्त केली. पण कांहीं उपाय चालेना. मग आम्ही तरी कोणत्या तोंडानें हरिबाला कोर्टाची पायरी चढूं नको म्हणून सांगावें रे? तो म्हणाला, तें कांहीं नाहीं. आतां आपण कोर्टांत दावा ठोकणार. मग म्हटलें ठोक बाबा! बाकी आजकाल ऋणको आणि कुळें देखील मोठीं माजोरी झालीं आहेत बरें का, आमच्या गांधींच्या रामराज्यांतील पिसाळलेल्या वांदरांसारखीं! कॉंग्रेसच्या आणि गांधींच्या नांवामागें लपून धडधडीत धन्याच्या तोंडाला पानें पुसूं लागले आहेत कीं रे! आम्ही एक हा छळ सहन करूं. कारण कॉंग्रेसचे लोक पडलों आम्ही. पण जगांत सारेच आमच्यासारखे निष्ठावाले भोळे सांब थोडेच असतात?"

बोलतां बोलतां त्यांनीं रावबाच्या चेहऱ्याकडे पाहिलें. तेव्हां आपल्या साखरपेरीचा त्याच्या मनावर गोड परिणाम झालेला त्यांना दिसला.

रावबा नुसता त्यांच्याकडे पाहून मधून मधून होकारार्थी मान तुकवीत व ओंठांतल्या ओंठांत हंसत होता. हरिबाकडूनच त्याला काल जप्ती-

वॉरंट घेतांना कळलें होतें कीं सदबा मेजारी ऋणको मूळ बापटशास्त्री सावकारांचा. हरिबा त्यांचें कूळ. त्यानें त्यांच्या शब्दासाठीं आपल्या नांवानें कर्जखत पोकळ बेचन करून घेतलें होतें इतकेंच. असलें हें विकृत श्राद्ध घेऊन सव्य अपसव्य करायला हरिबा तयार झाला याचें कारण तों त्यांचें चार पिढ्यांचें कूळ. गेल्या दोन वर्षांपासून शास्त्रीबुवांनीं त्याच्या-मागें सारखा लडका लावला होता कीं, जमिनीचा खंड दीडपट दे नाहींतर जमीन सोड.

आणि जमीन सोड म्हणजे जमिनींतलें राहातें खोपटें मोडून डोकीवर घेऊन बायकोपोरांसह देशोधडीला लाग !

अशा स्थितींत 'सदबा मेजाऱ्याचें कर्जखत तुझ्या नांवानें, बेचन करून घेत असलास तर तुला खंड वाढवीत नाहीं आणि जमिनींतलें. तुझें झोंपडेंही पेचायला लावीत नाहीं' असें धन्यानें सांगितलें, तेव्हां प्राणावर आलेलें एवढ्या खोड्यावर निभावलें, असें म्हणून हरिबा त्याला तयार झाला होता.

बाकी, सदबा मेजाऱ्याच्या नांवचा मूळ पन्नास रुपये मुद्दलापासून व्याज—आणि त्या व्याजाचें व्याज—आणि त्या व्याजाचें व्याज असा वाढत वाढत दीडशें रुपयांचा झालेला कर्जरोखा हरिबासारख्या गरीब फाटक्या शेतकऱ्याच्या नांवानें पोकळ बेचन करून देतांना शास्त्रीबुवा केवळ त्याच्या सालसपणावरच अवलंबून राहिले नव्हते. माणसानें व्यवहाराला चोख असावें, असा चोखपणा हरिबाला पटवून देऊन त्यांनीं त्याच्याकडून दीडशें रुपयांची वचनचिठी अगोदरच लिहून घेतली होती, व तीही माधवराव काळे यांच्या—जवळच्याच हिंदळगांवांतील आपल्या सावकार जांवयाच्या—नांवची.

मोका सांपडला कीं धनको सावकाराची दरखास्त बजावणीला निघा-यची ही सावकारनीति रावबा विचारे बेलिफाला माहीत होती. पण शास्त्रीबुवा आज कोणता नक्की मोका साधूं पाहात आहेत हें मात्र त्याला अजून कळलें नव्हतें.

बापटशास्त्री आपला मतलब साधण्यासाठीं वाढत्या हिकमतीनें रावबाला पटवीत रस्ता चालत होते व रावबा शिंगें मोडून वासरांत

शिंगणाऱ्या बैलासारखा आपल्या मतलबावर नजर ठेवून त्यांच्या हो ला हो देत होता.

●

तिन्हीसांजांना थंडगार वाऱ्यांतून वाटेनें चालतां चालतां एकदम शेजारच्या वाटसरूनें हातांतील बॅटरीच्या प्रकाशाचा झोत त्या रानांत दूरवर पाडावा व त्या प्रकाशाच्या झोतांत रानांतील झुडपांत लपलेल्या वाघाचे खुनशी डोळे चमकावे, तसें एक ताज्या कडवट पूर्वस्मृतीचें चिडलेलें मानवी जनावर बापटशास्त्र्यांच्या उद्गारासरसें सदानंदाच्या मनांत आव्हानाच्या भयानक पवित्र्यांत उभें राहिलें.

एक महिन्यापूर्वी त्या दिवशीं मुंबईत परेल भागांत पालीवाल गिरणीच्या आवारांत मुंबई प्रांतिक कॉंग्रेस कमेटीच्या वतीनें घेतलेल्या कामगारांच्या सभेंत सदानंद मुख्य वक्ता म्हणून बोलत असतां त्याला भरसभेंत बिनतोड युक्तिवादानें अडवून निरुत्तर करणारा तो राजाराम काजरोळकर नांवाचा भांडखोर कामगार त्याच्या दृष्टीनें चिडलेलें मानवी जनावरच नाहीं तर काय ?

"तो राजाराम काजरोळकर याच काजरोळी गांवचा इथल्या गंगाराम देवळी पोलीस पाटलाचा मोठा मुलगा तर नसेल ?" हा प्रश्न विजेच्या दिव्याभोंवतीं रेंगाळणाऱ्या पाखरकिड्यासारखा त्याच्या मस्तकांत संचारूं लागला. पण अशा वेळीं असली चवकशी करणें शोभणार नाहीं, मग माहिती घेतां येईल, असें म्हणून तेवढ्यापुरता त्यानें तो विचार डोक्यांतल्या डोक्यांत अलग बाजूला सारला.

ती दोन वर्दील मंडळी पुढें आली; त्यांच्या नादानें आपण आपणासाठीं इतक्या कळकळीनें तिथें जमलेल्या शेतकरी खेडुतांना डावलून बड्या गांवकरी मंडळीशींच बोलत राहिलों हें आपलें चुकलें या जाणिवेनें सदानंद मनांतल्या मनांत किंचित् ओशाळा झाला होता. तो शिवरामचा हात हातीं घेऊन त्या मंडळींत मिसळतां मिसळतां सावळारामला स्मितहास्यपूर्वक हातानें जवळ यायला खुणावीत म्हणाला, "ये ना सावळाराम!"

“ अरे ये ना ! दारू गुत्तेदार म्हणून येऊं नकोस; पोलीस पाटील म्हणूनही येऊं नकोस; पण कॉंग्रेसचा पाईक, महात्मा गांधींच्या कायदे-भंगाच्या मोहिमेंतला निधड्या छातीचा तरणाबांड सत्याग्रही शिपाई म्हणून तर पुढें ये ! ” शिवराम सावळारामचा हात धरून त्याला ओढून सदानंदाशेजारीं आणून उभा करीत म्हणाला.

बापटशास्त्री निघून गेले. आपल्या शेतकरी कुळांना आपला संकोच वाटायला नको म्हणून नाना देवगडाकडे जाणाऱ्या मोटारीची वाट पाहात किंचित् दूर जाऊन वडाच्या झाडाखालीं उभे राहिले.

हारतुरे घेऊन उत्साहानें पुढें सरसावत दुसऱ्या हातानें तिरंगी झेंडा सांभाळीत शिवरामनें विचारलें, “ नाना ! तुम्ही आमचे पुढारी. तुमच्या सावलीला आम्ही उभें राहायचें, तुमच्या पावलांवर पाऊल टाकून चालायचें. तुम्ही असे दूर उभे कां ? धन्यांना तुमच्या हातूनच हार घातला गेला पाहिजे ... ”

“ अरे नव्हे, चुकतां तुम्ही. तुमच्याच हातून हार घातला गेला पाहिजे त्याला. आपण सारे कॉंग्रेसचे सेवक, महात्मा गांधींचे निष्ठावंत पाईक. बाप आणि लेक, धनी आणि कूळ, श्रीमंत आणि गरीब, मोठा आणि लहान ही भाषा आपण सोडायची आतां. ” असें म्हणत आपल्या कुळांच्या शब्दाला मान देण्यासाठीं वडाच्या झाडाखालून नाना हळू हळू पुढें सरकत आले.

ते पुढें म्हणाले, “ असला भिडस्तपणा तुम्हीं कुळांनीं सोडला पाहिजे आतां. शेतकऱ्यांचें राज्य स्थापायचें आहे ना आपल्याला आतां देशांत ? तूं शेतकरी, देशाचा खरा धनी तूं आहेस. राजा आहेस तूं. आम्हीं आणखी किती दिवस आणि कां म्हणून तुमचे पुढारी म्हणून मिरवायचें रे ? तुम्हांला तुमच्या पायावर उभे राहातां नको यायला आतां ? ”

किती झालीं तरी तीं खेडुत कुळें. बरोबरीच्या नात्यानें धन्याशीं कशीं बोलतील ? हें शिवराम धीटपणें बोलला तेंच फार बोलला. बाकीच्यांनीं त्याला हंसतमुखानें नुसतें खुणावलें. त्यानें सदानंदाला घालण्यासाठीं फुलांचा हार त्यांच्या हातीं दिला.

नानांनीं प्रसन्न पण भारदस्त गंभीर वृत्तीनें हार तुरे सदानंदाला अर्पण केले. दुसऱ्या एकानें पिंजरीची पुडी उघडून पुढें केली. नानांनीं त्या पिंजरीचा मंगल टिळा आपल्या हातानें सदानंदाच्या कपाळाला लावला.

महात्मा गांधींच्या जयजयकारांत लोकांनीं सदानंदावर पुन्हा एकदां फुलें उधळलीं.

सदानंदनें आपल्या कंठांतील हार नम्रतापूर्वक काढून उजव्या हाताच्या मनगटाला गुंडाळीत फुलांचा तुरा धरल्या हातानें समोर शिवरामच्या खांद्यावर फडकणाऱ्या तिरंगी झेंडयाला आदरपूर्वक प्रणाम केला.

" हं ! जा आतां तुम्ही घराकडे. शिवराम तेवढा राहील धन्याबरोबर सोबतीला. " नाना म्हणाले. त्यांनीं मनांत विचार केला, मुंबईत गिरणींत काम करून मुलखोमुलखींच्या कामगारांत वागून बारा बंदरांचें पाणी पिऊन आलेला अवखळ कामगार हा. गांवांत कॉंग्रेसच्या सभेंत बोलला, खादीची टोपी वापरीत असला, तरी बाबा देसायांच्या खुनी शेतकऱ्याचा मुलगा तो. बाप तसा लेक. नव्या धन्याविषयीं देखील त्याच्या पोटीं काय काळें बेरें असेल याचा काय नेम ?

लोकांना आपल्या त्या नव्या देशभक्त देसाई धन्यांना सन्मानानें मिरवीत गांवांत न्यायचें होतें. नानांनीं तें ओळखलें होतें. आपल्या पोटीं जन्माला आलेल्या पुत्राचे असले सौभाग्यसोहाळे पाहून डोळ्यांचें पारणें फेडून घेण्याची हौस त्यांनाही नव्हती असें नाहीं. पण आज त्या वेळीं त्यांना तो सोहळा नकोसा वाटला. याचें कारण, मग त्यांना त्या सोहळ्यांतच रंगून जावें लागलें असतें. आज देवगडांत त्याचें घराण्याच्या अब्रूवर बेतलेलें एक नाजूक काम होतें. तिकडे जाणें त्यांना भागच होतें. आणि पाहावें तर सरकारी नोकऱ्या, कोर्ट-कचेऱ्या यांवरील बहिष्काराच्या घोषणांनीं दुमदुमून गेलेला काळ तो.

तसल्या त्या मुका मार देणाऱ्या कामासाठीं ती मिरवणूक टाळून जातांना त्यांचें मन त्यांना खात होतें.

ते त्या लोकांना म्हणाले, " मिरवणूक वगैरे कांहीं नको रे. असल्या समारंभांत रंगून जायला आपल्याला वेळ नाहीं आतां. जा तुम्ही आपा-

पल्या कामाला आतां. शेतांतलीं कामें आटोपून साऱ्याजणांनीं संध्याकाळीं देवाच्या पटांगणांत जमायचें!" ते शिवरामकडे वळून म्हणाले, "चाकरीच्या म्हाराला बोलाव आणि गांवांत वाडीवाडीवरून ताकीद द्यायला सांग. म्हणावें आज कॉंग्रेसची सभा आहे. साऱ्यांनीं आलें पाहिजे. मी तोंवर येतोंच माघारा तिन्हीसांजांपूर्वी."

ते सारे गांवकरी शेतकरी मग आढेवेढे न घेतां घरच्या वाटेला लागले. एकटा शिवराम तेवढा सदानंदबरोबर राहिला. तो पाहुण्यांचें सामान उचलून घेऊन त्यांच्याबरोबर चालूं लागला.

●

"कोणत्या वाटेनें जायचें रे आपल्याला?" त्या तिठ्यावरून नजरेसमोर तीन वाटा फुटलेल्या पाहून सदानंदानें विचारलें.

"चला, त्या मधल्या वाटेनें चला." शिवराम त्या मधल्या वाटेकडे बोट दाखवून म्हणाला, "ही मधली वाट शेंपन्नास पावलें दूरची असली तरी अधिक बेणी आहे. गवत तुडवीत जाण्यापेक्षां बेण्या वाटेनें जाणें बरें."

वास्तविक शिवराम धन्याला घेऊन जाणार होता ती मधली वाट जरा लांबचीच व अधिक अडचणीचीही होती. असें असतां शिवराम त्या वाटेकडे आकर्षिला गेला होता याचें कारण त्याची आवडती मैत्रीण जमना—त्या वाटेनें काजरघाटी उतरतांना लागणाऱ्या देसायांच्या वृंदावन शेताचें कूळ—शेतांतल्या आपल्या झोंपडींत होती. तिला तो आज दोन आठवड्यांत भेटला नव्हता. न भेटायला कारणेंही तशींच होतीं. एरव्हीं जिव्हाळ्याची मैत्रीण ती त्याची. काय केलें म्हणजे ती 'बायको' व्हायला—पाट लावायला—वश होईल हें त्यानें आतां उमजलें होतें. आणि म्हणूनच ती तयारी करण्यासाठीं गेले पंधरा दिवस त्याची खटपट चालली होती.

तें सारें काम मनाजोगें आटोपून कालच शिवराम गांवीं आला होता. आपलें राहातें घर व त्या घरासभोंवारचें आंबे—फणस—पोफळींनीं गजबजलेलें विस्तीर्ण परडें एवढ्यावर त्यानें हिंदळगांवच्या काळे सावकाराचे चारशें रुपये कर्जाऊ काढले होते. दोनशें रुपये त्याच्याकडे इतकीं वर्षे

मुंबईंत गिरणींत राबून पै पैसा शिल्लक टाकून सांठलेले होते. गहाणखत काळे सावकारांनीं पूर्ण करून घेतलेलें होतें आणि रोख रक्कम शिवरामला देण्यासाठीं सासऱ्यांना–बापटशास्त्र्यांना–चिठी दिली होती. अर्थात् आतां पैसे मिळाल्यासारखेच होते. गांवीं येतांच प्रथम देवाचा कौल वगैरे घेऊन व घरच्या चालू वहिवाटीप्रमाणें ज्या कुणा देवांना किंवा समंध–देवचारांना विडी, पान, नारळ, सुपारी अथवा कोंबडें, बकरें देणें अवश्य होतें तें सारें आटोपून आज सुमुहूर्तावर तो तिला भेटणार होता. धन्यांबरोबर त्यांच्या वाड्यांत जातांना तिला नुसतें ओझरतें भेटून डोळांभर पाहावें आणि संध्याकाळीं येतों असें सांगून पुढें जावें असें त्यानें योजिलें होतें.

दोघेही चालूं लागले. तोंच सावळाराम पलीकडच्या वाटेवर इकडे तिकडे पाहात रेंगाळत उभा असलेला पाहून शिवराम थबकून त्याला म्हणाला, “कां रे, थांबलास कां? लवकर लवकर गांवांत जा आणि अगोदर चाकरीच्या म्हाराला सांगून दरएक वाडीवर ताकीद करायला लाव.”

“मग आपण बरोबरच जाऊं ना! ताकिदीचें काय, चाकरीच्या म्हाराला सांगितलें कीं तो दोन घटकांत सारा गांव गोळा करून आणील—” सावळाराम म्हणाला.

“अरे पण नको! मी सांगतों तुला. पोलीस पाटलाचा मुलगा आहेस तूं हें तूं विसरतोस कसा? तुझा बाप आहे मुलखाचा भित्रा.– समज, इतक्यांत पोलीसबिलीस आला, आणि तुला त्यानें ह्या पाहुण्यांबरोबर पाहिलें तर? दिवस हे असे जिकीरीचे—”

“पोलीस येवो नाहीं तर पोलीसचा बाप येवो. मी त्याला थोडाच जुमानतों?”

“तूं नाहीं पण तुझा बाप जुमानतो ना! अरे आजच इतकें बळें बळें तुटेपावेतों ताणा कशाला? फुंकून फुंकून प्यावें, नाहीं तर तोंड भाजतें. माझें ऐक तूं सावळ्या!”—अशी सावळारामची समजूत घालून त्याच्या पाठीवर प्रेमानें थाप मारून त्याला वाटेला लावून शिवराम माघारा आला.

तो सदानंदला म्हणाला, "आपण आतां या वाटेनें जायचें."

"अरे पण तो येणार तर येईना कां होता आपल्या बरोबर? तूं त्याला नको कां म्हटलेंस?" सदानंदानें मंद पावलें टाकीत चालतां चालतां शिवरामला म्हटलें.

"अहो सापाचा पोर. त्याचा काय नेम?"

"पोलीस पाटलाचा मुलगा म्हणून?"

"तर हो! बाप पोलीस पाटील, साऱ्या गांवचा नष्ट खतरूड. पुरा पुरा सरकारचा बगलबच्चा. असें असतांना लेक उघड उघड चळवळींत पडतो आणि तरीदेखील तो बापाच्या घरांत टिकतो, हें कसें काय? राजा आणि हा दोघेही पाठोपाठचे भाऊ भाऊ. पण तो कुठें आणि हा कुठें? बापाचा गांवगुंडी कारभार आवडत नाहीं म्हणून राजा बापाशीं भांडून वैतागून मुंबईला निघून गेला, तो गेल्या तीन वर्षांत अजून गांवीं म्हणून आला नाहीं."

'राजाराम' हें नांव आठवून आठवून मनांत घोळवीत सदानंदनें विचारलें, "राजाराम नांव सांवळयाच्या भावाचें का रे? काय करतो तो मुंबईत?"

"मुंबईत पालीवालच्या गिरणींत कामाला असतो ना तो! आतां मुंबईत संप सुरू आहे म्हणे त्या गिरणींत देखील. मुंबईत बेकार बसून काय खायचें? म्हणून येणार असेल तो गांवीं."

"सांवळ्याचाच भाऊ तो?" त्यानें उपनांवाविषयीं मनांत शंका घेऊन शिवरामला विचारलें, "आपल्या पोलीस पाटलाचें आडनांव काय रे?"

"आडनांव देवळी. पण मुंबईत गेल्यापासून अलीकडे राजा देवळी काजरोळकर हें गांवाच्या नांवावरून आडनांव लावतो. देवळी म्हटलें कीं लोक नाक मुरडतात ना? भावणीचा पोर म्हणून त्याला ओळखीच्या झिलग्यापुढें शरमून खालीं मान घालावी लागते मग."

महिन्यापूर्वी त्या दिवशीं परळच्या सभेंत आपणाला निरुत्तर करून कामगारांत वर मान करून उजळ माथ्यानें बोलायला तोंड नाहींसें करून

सोडणारा तो लढाऊ कामगार आपल्या गांवचाच आहे, व तो सापाचा पाठलाग करणाऱ्या मुंगुसासारखा आपल्या मागोमाग गांवीं येतो आहे हें कळतांच सदानंदाचें चित्त जरा अस्वस्थ झालें.

" येऊं दे. तो आला तर त्याला बाजूला घेऊन त्याची समजूत मी घालीन. इथें मुंबई नाहीं, खेडेगांव आहे हें. लाल बावटेवाल्यांच्या आगलाव्या शिकवणीनें तरारलेला, जेव्हां तेव्हां पुढाऱ्यांना न जुमानतां हट्टानें संपावर धावणारा पालीवालचा बकाली कामगार नाहीं इथें; महात्माजींवर देवाप्रमाणें अढळ निष्ठा ठेवणारा, कॉंग्रेसच्या तिरंगी झेंड्याखालीं एकजुटीनें उभा राहून आमच्या हांकेसरसा कायदेभंगाच्या लढाईत उतरायची वाट पाहात असलेला अन्नदाता शेतकरी आहे हा!"

विचार करतां करतां उजव्या हाताचें पुष्पहारानें सजलेलें मनगट उचलून त्यानें त्या फुलांचा वास घेतला. त्या गांवच्या खेडुतांची जी अढळ निष्ठा कॉंग्रेसवर आणि महात्माजींवर होती, ती त्या फुलांच्या सुगंधाच्या रूपानें सभोंवारच्या वातावरणांत–साऱ्या कोंकणपट्टींत दरवळत असलेली त्याला जाणवली.

हाराचा वास घेत तो मनांत म्हणाला, " गरीब आणि श्रीमंत, जमीनदार–धनी–सावकार आणि कुळें, आपण सारे इथें एका जिवानें कायदेभंगाची लढाई लढायला उभे आहोंत. राजारामला म्हणावें, येतोच आहेस तर ये आणि त्या गोऱ्या रावणांची लंका जाळायला हिरीरीनें निघालेली ही आमच्या महात्मा रामाची रामसेना पाहा. म्हणजे तुलाही त्या सेनेचा सैनिक होण्याची उपरति होईल."

●

तेवढ्यांत शिवराम अंमळशानें मध्येंच स्वतःशीं म्हणाला, " राजाच्या गिरणींतला संप कधीं एकदां मिटतो नकळे! बाकी तो कांहीं लवकर मिटायचें मान दिसत नाहीं."

" हें तूं कशावरून म्हणतोस ? "

" लवकर मिटणार होता तर मग राजा कशाला मुलखांत आला असता ! मला माहीत आहे तो पालीवाल, आणि त्याचा तो मॅनेजर

गिरिधरलाल. गांधीबाबाच्या नांवावर मोठे देशभक्त म्हणून मिरवतात. पण वरच्या खादी कपडयांचा बगळ्याच्या पिसांसारखा ढवळा रंग तेवढाच बघून घ्यावा. तें वरचें खादीचें कांबरूण जरा ढकलून बाजूला सारलें कीं आंत काळा कोळसा. तोदेखील लोणारी कोळसा नव्हे, चांगला कठीण दगडी कोळसा. फसणारे फसतात त्यांच्या खादीच्या पोषाखाकडे बघून. पण खरें काय तें आम्हां गिरणींतल्या कामगारांना माहीत. "

बोलतां बोलतां शिवराम खाकरून थुंकला.

सदानंदला वाटलें, हा पालीवालच्या नांवानेंच थुंकला. इतका वेळ तो शिवरामला ताजें फुललेलें गेंदेबाज व सुवासिक गुलाबाचें फूल समजत होता. त्या फुलाचा वास अजूनही जरी दरवळत होता तरी सदानंदानें स्वतःला नकळत बेसावधपणानें सलगीचा हात त्या फुलाकडे नेला तोंच डहाळीचे कांटे त्याच्या हाताला बोंचले.

त्यानें शिवरामला विचारलें, " तूंदेखील मुंबईला गिरणींत कामाला होतास ना रे ? "

" होतों तर ! "

" कुठच्या गिरणींत ? "

" फटकीच्या गिरणींत कामाला होतों मी !

" फटकीच्या गिरणींत ? ही फटकीची गिरण कुठली रे ? "

" मुरारजी मिल ठाऊक आहे ? "

" होय. चांगलीच ठाऊक आहे ती. तिथल्या कामगारांनीं गेल्याच वर्षी संप केला होता; आणि तेव्हां मालकानें संप फोडायसाठीं सोलापूरचे भय्ये कामगार कामावर आणले होते. "

" तीच.–तीच फटकीची गिरण. आमचा संप फोडायला सोलापूरचे फितूर आले होते. ते फिरून आम्हांला फितूर होतील म्हणून गिरणीवाल्यानें त्यांना आल्यापासून गिरणीच्या आवारांत डांबून ठेवलें होतें. जेवणखाण, चहापाणी, न्हाणें धुणें, हगणें, मुतणें सगळें कांहीं गिरणींत. इतक्या फितुरांची घाण काय थोडी ?—"

"एकूण मुरारजीनें तुमचा कामगारांचा संप असा फोडला आणि गिरणी सुरू केली म्हणतोस?"

"मुरारजी संप कसला फोडतो? आमचा संप म्हणजे कांहीं मातीचें गाडगें नव्हतें असल्या चपराकानें फुटायला. फितूर आले म्हणून त्यांच्या हातून गिरणी कांहीं सुरू झाली नाहीं; पण गिरणींत फटकी मात्र सुरू झाली! फटकी होऊन फितूर पटापट मेले. तेव्हांपासून आम्हीं कामगारांनीं त्या गिरणीचें नांव ठेवलें आहे फटकीची गिरण."

"अस्सें! त्या गिरणींत कामाला होतास म्हणायचा तूं?"

"होय. आणि राजा देखील तिथेंच कामाला होता. त्या संपांत खोडकर म्हणून कमी झालेले कामगार आम्ही. राजा मग पालीवालच्या गिरणींत लागला."

"आणि तूं गांवीं येऊन शेती करूं लागलास. होय ना?"

"तर हो!" शिवराम उत्तरला. पण आपल्या धन्याला पुढें काय सांगावें याचा त्याला पेंच पडला. संपानंतर आपण आपल्या मैत्रिणीच्या—जमनाच्या ओढीनें गांवीं आलों हें बोलून दाखवायचा त्याला धीर होईना. तो विषय पालटण्याच्या इराद्यानें त्यानें पुढें म्हटलें, "मुंबईत गिरण्यांच्या संपांचा मोरे जोर आहे नाहीं आजकाल? राजानें परवांच्या पत्रांत लिहिलें होतें."

"काय—काय लिहिलें होतें राजानें?"

शिवराम पुन्हा पूर्वपदावर आला.

"नाहीं; पण हे कॉंग्रेसचे लोक म्हणवतात आणि असे दुतोंड्यासारखे कसे वागतात हो? खादीचा मोरे उदो उदो करून देशभक्त म्हणून मिरवायचें आणि स्वतःच्या गिरण्यांतून नफा खोऱ्यानें ओढण्यासाठीं आम्हां कामगारांची उपासमार करायची."

त्याला पालीवालविरुद्ध आणखीही जोरदार तक्रार करायची होती. पण तेवढ्यांत सदानंदाचें लक्ष समोरून ढोल वाजवीत काजरघाटी चढून येणाऱ्या खेडुतांच्या घोळक्यावर खिळलेलें पाहून तो थबकला. सदानंदानेंही त्याला कां म्हणून विचारलें नाहीं.

●

एक धट्टाकट्टा उमदा बकरा कपाळाला कुंकवाचा टिळा लावलेला व गळ्यांत खूरचांफ्याच्या फुलांच्या माळा घातलेला असा त्या घोळक्यांत एका मोकळ्या केंसाच्या, कुंकवाचा मळवट भरलेल्या सुंदर मुलीबरोबर डौलानें मिरवत चाललेला त्याला आढळला. बकऱ्याची ती मिरवणूक उजवीकडील काजऱ्याच्या राईकडे वळली.

तोंच शिवराम म्हणाला, "चला धनी! महाराजांच्या पायां पडूं व घाटी उतरायला लागूं." त्यानें वाटेच्या अगदीं लगतच डावीकडे उभ्या असलेल्या एका केंबळ्याच्या झोंपडीकडे पाहून हांक मारली, "महाराज! अहो महाराज!"

सुमारें पाऊणशेंच्या घरांत आलेला एक सडसडीत अंगकाठीचा, माळ-रानावरील गवतासारख्या दाढीमिशा बेहिशेबी वाढलेला, लंगोटीधारी गोरटेला म्हातारा शिवरामची हांक ऐकून झोंपडीबाहेर आला व शिव-रामकडे अर्थशून्य प्रश्नार्थक दृष्टीनें पाहूं लागला.

"कसली रे ही दिंडी चालली आहे शिवराम? कुठच्या जत्रेला चालले आहेत हे लोक?" सदानंदानें त्या शृंगारलेल्या बकऱ्याच्या मिरवणुकीकडे पाहात विचारलें. कोणत्या तरी देवाच्या नांवानें सोडण्या-साठीं लोक या बकऱ्याला वाजत गाजत नेत असावेत अशी त्याची कल्पना होती.

पण ती कुंकवाचा मळवट भरलेली मोकळ्या केंसांची तरुण मुलगी कशाला त्या बकऱ्यामागोमाग चालली आहे हें कोडें त्याला उलगडेना.

"ती मिरवणूक होय?" शिवराम त्या मिरवत चाललेल्या शृंगार-लेल्या बकऱ्याकडे व त्या मुलीकडे नजर टाकीत उत्तरला, "काजराईला बळी द्यायचा आहे तो बकरा. भावणीच्या नवसाचा बळी आहे तो.—"

"ही भावीण? ही नक्षत्रासारखी सुंदर पोर भावीण?" सदानंदानें आपल्या मनाला विचारलें.

तोंच झोंपडींतील तो म्हातारा आपल्या दाढीचे केंस उपटल्यासारखे करीत किंचित् ओठ चावीत त्या बकऱ्याकडे आणि लगेच शिवरामच्या

पाठोपाठ उभा असलेल्या सदानंदाकडे पाहून म्हणाला, "सत्याग्रही वीर सत्याग्रहाच्या लढाईवर लढायला चालला आहे तो. देशभक्त आहे. कसला जंगल सत्याग्रह करणार आहे कीं मिठाचा सत्याग्रह करणार आहे कोण जाणे! हार–तुरे–माळांनीं सजवून मरणघराकडे चालवलेल्या चारुदत्तासारखा कसा छान शोभतो नाहीं?"

कां न कळे; पण म्हाताऱ्याच्या मुखांतून वाग्बाण सुटला तो सदानंदाला न कळत त्याच्या अंतःकरणांत कुठेंतरी वर्मी जाऊन घुसला. तिठ्यावर गांवकऱ्यांनीं हारतुरे अर्पून नुक्ताच त्याचा सत्कार केला होता, ते हारतुरे त्यानें कुतूहलपूर्वक व शिवरामचा आग्रह म्हणूनही गांवाकडे येतांना जपून बरोबर आणले होते. हार त्याच्या उजव्या मनगटाला गुंडाळलेला होता आणि तुरा खिशांतून बाहेर डोकावून पाहात हंसत होता. तो तुरा त्यानें डाव्या हातानें लपवल्यासारखा खिशांत कोंबला, व हार घालून मिरवणारें उजव्या हाताचें मनगट कुणाच्या नजरेला येणार नाहीं इतक्या शिताफीनें आपल्या खादीच्या सदऱ्याआड अगदीं सहजगत्या स्वतःला नकळत दडविण्याचा प्रयत्न केला.

"आज तुझ्या गांवांत शिरोड्याच्या मिठाच्या कायदेभंगासाठीं सभा व्हायची आहे ना रे? कोण तो तुझा देशभक्त त्या सभेंत बोलणार आहे तोच का तो हारतुरे घालून काजराईकडे मिरवीत चालला आहे तो?" म्हाताऱ्यानें आपल्या रुपेरी भुंवया चढवीत किंचित् झुकत्या मानेनें पुन्हा एकवार त्या बकऱ्याकडे धांवता नेत्रकटाक्ष फेंकीत शिवरामला विचारलें. बोलतां बोलतां वाऱ्याच्या झुळकीसारखी त्याची नजर सदानंदाचा तोंडवळा गोंजारून जायला चुकली नाहीं.

शिवरामनें म्हाताऱ्याच्या त्या माथेफिरूपणाच्या शब्दांकडे दुर्लक्ष केलें. तें वारेमाप बाष्कळ बडबडणें त्या पंचक्रोशींतील साऱ्या लोकांच्या पूर्ण परिचयाचें झालें होतें. त्याला सर्वांनीं वेड्यांतच काढलें होतें. पण त्यांच्या मतें तो वेडा असला तरी देववेडा होता. कुणाला कांहीं त्रास नाहीं कीं कटकट नाहीं. खुषीनें कुणीं कांहीं आणून दिलें तर त्यावर किंवा त्या गांवांत आणि आजूबाजूच्या गांवांत भिक्षा मागून तो आपलें पोट

भरायचा. कुणीं कांहीं दिलें नाहीं, तर उपाशीही राहायचा. अशिक्षित खेडुतांना ही त्याची साधुत्वाची खूणशी पटे. एखादी चांगली गोष्ट करण्यापूर्वी लोक श्रद्धेनें त्याचा आशीर्वाद मागायला येत.

त्याचा आशीर्वाद हा असाच. कुणाला काय बोलेल याचा नेम नाहीं. लोकांनीं मग त्याच्या वारेमाप फटकळ उद्गारांचा आपल्या मनाशीं हवा तो अर्थ लावावा आणि तो अर्थ देवाचा शब्द मानून मार्गाला लागावें. आज गेलीं सहा सात वर्षें तो काजरघाटीवर त्या बाबा देसायांच्या पडक्या केंबळी मांगरांत येऊन राहिला होता.

"बाबदेवाला नारळ ठेवायचा आहे महाराज!" असें म्हणत शिवरामनें आपल्या पाटीवरील कांबळ्याच्या घडींतून एक नारळ काढून म्हाताऱ्यापुढें ठेवला. आतां काजरघाटी उतरून गांवांत जायचें, जातांना आपल्या मैत्रिणीला फारां दिवसांनीं भेटायचें. आपण तिच्यापाशीं पाटाचा शब्द टाकला तर ती आतां तरी खास नाहीं म्हणणार नाहीं अशा आशेनें व हुरूपानें तो बाबदेवाला नारळ ठेवायला निघाला होता. बाबदेव हा त्या वृंदावन शेताचा मयत धनी. मेल्यावर बाबा देसायाचा बाबदेव झालेला. त्याची मैत्रीण जमना त्या शेताचें कूळ. आणि ती शेतांतच झोंपडी बांधून राहिलेली. तिला बाबदेवानें आपल्या शब्दाला हो म्हणायची वासना द्यावी आणि सारें गोड व्हावें ही शिवरामची मनांतली इच्छा.

पण ही इच्छा उघड बोलून दाखवायचा धीर त्याला होत नव्हता. तो एकटा म्हाताराच तिथें असता तर त्याला त्यानें लेंकराच्या नात्यानें आपलें मनोगत सांगितलें असतें. पण आज त्याचा नवा धनी त्याच्या बरोबर होता. त्या धन्यादेखत त्यानें तें कसें बोलावें?

"हा तुझ्याबरोबर कोण आला आहे रे माळ घालून त्या बकऱ्याचा भाऊबंद?" असें विचारीत म्हाताऱ्यानें शिवरामच्या हातांतील नारळ घेण्यासाठीं हात पुढें केला.

"आमचे नवे धनी हे महाराज!" शिवराम प्रसन्न मुखानें उत्तरला.

"नवे धनी?" म्हाताऱ्यानें नारळ घेतां घेतां विचारलें.

“ होय महाराज ! आमच्या देसाईणबाईनीं यांना दत्तक घेतल्या-पासून आज पहिल्यानेंच हे गांवांत येत आहेत. ” शिवराम म्हणाला.

“ म्हणजे दोन बापांचा लेक तुझा नवा धनी आहे म्हणतात तो हाच का ? ” म्हाताऱ्यानें सदानंदाकडे न्याहाळून पाहात हातांतील नारळाची शेंडी काढीत विचारलें.

ते शब्द सदानंदाच्या कानांत तापलेल्या लोखंडाच्या सळईसारखे घुसले. “ दोन बापांचा लेक असली कुजकी खंवचट भाषा कशाला ? ” तो मनांत जळफळला. त्यांत त्याला आईबापांची आडपडद्याची निंदा जाणवली.

म्हाताऱ्याचे ते बोल ऐकून ओठांवर ओठ दाबीत शिवराम आंतल्या आंत क्षणभर हंसला. त्या गांवचाच शेतकरी तो; धन्यांच्या घरांतील सारे खांचखळगे आणि काळेंबेरें त्याला माहीत. परंतु आपल्या या नव्या धन्याला गांवांत पाय ठेवतांक्षणीं प्रथमच तसल्या गोष्टींनीं अपशकून करावा असें त्याला मुळींच वाटत नव्हतें.

बाबा देसायांच्या खुनाला प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष कारण झालेल्या साऱ्या शेतकरी कुळांची प्रामाणिक भोळी समजूत होती कीं, बाबा देसाई नऊ वर्षांपूर्वी त्याचा काजरघाटीवर खून झाल्यापासून तिथेंच समंध होऊन बसला आहे. तो नानापरीनीं नडतो या समजुतीनें त्या समंधाला संतुष्ट ठेवण्यासाटीं त्याला नारळ ठेवून गाऱ्हाणें करण्याची रीत कुळांनीं पाडली होती. बाबांच्या अशा एका खुनी कुळाचा शिवराम हा मुलगा. तो कधींही एखादी महत्त्वाची गोष्ट करण्यापूर्वी बाबा देसायांच्या नांवानें गांवकऱ्यांनीं त्याचा खून झाल्या जागीं नांदरुकीच्या झाडाखालीं दगड पुरून निर्माण केलेल्या बाबदेवाला नारळ सुपारी ठेवून नमस्कार करायला चुकत नसे.

“ देवाला भिणारा हा रे कसला तुझा धनी ? एकाऐवजीं दोन बापांचा लेक होऊन देखील त्यांतल्या एकाही बापाला हा मुलगा शोभत नाहीं. बाप कसे देवाला खाऊन आणि माणसांना तोंडीं लावून वर ढेकर देणारे निधड्या छातीचे धनी आहेत...” म्हाताऱ्यानें हातांतील नारळाची शेंडी पुरी उपटून टाकीत म्हटलें. त्याला वाटलें, सदानंदच बाबदेवाला नारळ ठेवतो आहे.

म्हाताऱ्याचे हे शब्द ऐकून सदानंदाच्या अंतःकरणाला मात्र जखमेवर मिठाचें पाणी शिंपडल्यासारख्या वेदना होऊं लागल्या. आपले जन्मदाते वडील धुतल्या तांदळासारखे सोज्वळ व पवित्र आहेत असा एकांगी हट्ट उराशीं बाळगण्याइतका तो अजाण, दुरभिमानी व हट्टी नव्हता. पण कांहीं झालें तरी आपल्या जन्मदात्या बापाला लोकांनीं नांवें ठेवलेलीं ऐकून घेण्याची त्याला अजून संवय नव्हती. दत्तक वडील बाबा देसाई यांच्या गाजून गेलेल्या कारकीर्दीचा इतिहास तर तो आज प्रथमच उघडून वाचायला सुरुवात करीत होता. तो इतिहास त्याला पूर्वी मुळींच माहीत नव्हता असें नाहीं. आबा मास्तरांनीं प्रसंगोपात्त लिहिलेल्या मनमोकळया पत्रांतून पर्यायाच्या भाषेंत खेडेगांवांतील जनतेचा खडतर जीवनक्रम कसा असतो याचीं लिहिलेलीं शब्दचित्रें त्यानें अनेक वाचलीं होतीं. वाचतांना त्याला त्या केवळ चित्तवेधक रम्य कथाशा वाटल्या होत्या. पण आज मोटारींतून तिठ्यावर उतरल्या क्षणापासून काजऱ्याच्या राईजवळ येऊन पोहोंचेपावेतों त्याला जीं विचित्र व विस्मयजनक दृश्यें शब्दांतून अथवा प्रत्यक्ष दिसून येत होतीं त्यावरून एक एक खूणगांठ त्याच्या मनाला पटत चालली होती कीं आबा मास्तरांनीं लिहिलेल्या 'लोककथा' या नुसत्या रम्यकथाच नसून सत्यकथाही आहेत.

अशाच एका गोष्टींत आबा मास्तरांनीं एका फटिंग म्हाताऱ्याचें शब्दचित्र रेखाटलें होतें. त्या गोष्टीच्या निमित्तानें खेडेगांवांतील सावकारांचा सावकारी पाश व जमीनदारी डावपेंच यमपाशालाही रेशमाप्रमाणें मऊ ठरविणारे कसे भयंकर असतात याचें ज्ञान सदानंदाला झालें होतें. त्या गोष्टींतील म्हातारा म्हणजे आपण आतां ज्याच्या झोंपडीपाशीं आलों आहोंत तोच हा म्हातारा होय असें त्या म्हाताऱ्याला प्रत्यक्ष पाहून सदानंदाला वाटलें.

परंतु गोष्टींत आबा मास्तरांनीं त्या म्हाताऱ्यावर उधळलेलीं गौरव-सुमनें हीं देवावर उधळलेलीं नसून रस्त्यावर हजारोंच्या पायांखालीं तुडवल्या जाणाऱ्या एखाद्या ओंगळ दगडावर उधळलीं असावीं असा त्याचा ग्रह झाला. तो त्या म्हाताऱ्याकडे पाहून आपल्या मनाशीं म्हणाला, " काय खुळे आहेत आबा मास्तर! ह्या पिसाट म्हाताऱ्यांत

काय चांगलेपणा दिसला त्यांना नकळे." तो तसाच शिवरामकडे वळून म्हणाला, "चल कीं रे शिवराम! नारळ कसला ठेवतोस? चल लवकर."

सदानंद ओघासरसें बोलून गेला मात्र, तों लगेच दुसऱ्याच क्षणाला त्याला जाणीव झाली कीं, दगडधोंड्याच्या देवांना भजण्यांत अर्थ नाहीं हें आम्हां सुशिक्षितांनाही पुरेपूर न पटणारें ज्ञान शिवरामसारख्या देवभोळ्या अशिक्षित खेडुताला कसें पटेल? त्यानें आपल्या विचारांचा ओघ बांध घालून चटकन वळवून घेतला, "देवाला नारळ ठेवायचा तो अशा पारोशानें कसा रे ठेवायचा? आंघोळ करून शुचिर्भूत होऊन मग नारळ ठेवला तर देव नवसाला पावेल."

"आमचा देव कांहीं तसा अडेलतट्टू नाहीं. आमची वहिवाटच आहे अशी किती दिवसांपासून चालत आलेली. गांवची घाटी उतरण्यापूर्वी आम्ही बाबदेवाची आठवण केली नाहीं ना कीं कोणता ना कोणता गोता आमच्यावर हटकून कोसळतोच. आम्हां अडाणी लोकांचें शास्त्र हें असें आहे. —चला महाराज, लवकर नारळ फोडून आम्हांला मोकळे करा." शिवराम सदानंदाच्या कुरकुरीकडे लक्ष न देतां म्हाताऱ्याकडे पाहून म्हणाला. धन्याशीं बोलतांना त्यानें स्वतःला अडाणी म्हणून नांव ठेवून घेतलें खरें; पण मनांतून मात्र तो म्हणत होता, कीं आमच्या गांवची चालरीत ह्या इंग्रजी शिकून आलेल्या नव्या उमेदवार धन्यांना गांवांत राहिल्याखेरीज काय कळणार?

"चला." असें म्हणून म्हातारा नारळ घेऊन त्या नांदरुकीच्या झाडाकडे जाऊं लागला. जातां जातां तो म्हणाला, "तुम्ही लोक खुळे कीं वेडे रे? हा देव चांगला तेव्हां खून होतांना म्हणे तुमच्या पायां पडला; सारी वतनवाडी झाली तरी लिहून देतों, पण मारूं नका म्हणून विनवूं लागला, तेव्हां तुम्हीं त्याला ठार मारलें. आणि आतां तो गेल्यावर त्याला भिऊन त्याच्या पायां पडतां, त्याला नारळ ठेवतां."

शिवराम तें ऐकून नुसता गालांतल्या गालांत हंसत होता. तो काय आणि दुसरा कोणी गांवकरी काय, त्या म्हाताऱ्याशीं बोलतांना खोलांत

कधींच कोणी शिरत नसे. चांगला ब्राह्मण देवाला नारळ ठेवायला मिळतो, तेवढाच त्या म्हाताऱ्याचा गांवकऱ्यांना खरा उपयोग होता.'

●

सदानंदाला हा साराच प्रकार अगदीं नवीन होता. त्याला मात्र म्हाताऱ्याची ती वायफळ बडबड स्वतःला नकळत नेम धरून बाण मारल्यासारखी सूचक वाटूं लागली. आपल्या वतनदारी मोटेपणाचा आपण आपल्या गरीब शेतकरी खेडुतांच्या आणि त्या निमित्तानें साऱ्या देशाच्या उद्धारासाठीं उपयोग करून घेणार अशी औदार्यपूर्ण स्वार्थत्यागाची सोज्वळ भावना तो आपल्या हृदयांत जतन करीत होता. तें आपलें मोठेपण चिखलांतून उगवलेल्या कमळाच्या चिखलानें बरबटलेल्या देठासारखें कलंकित आहे हें त्याला आज आपल्या वतनवाडीच्या गांवांत प्रवेश करतांना पहिल्याच पावलाला जाणवूं लागलें. त्या जाणिवेनें त्याचें अंतःकरण खरचटल्यासारखें झालें.

"पण कांहीं हरकत नाहीं. मी हें चिखलांत रुतलेलें कमळ महात्मा गांधींच्या आज्ञेप्रमाणें दरिद्रीनारायणाची सेवा करून त्या सेवेच्या गंगाजलानें धुऊन निर्मळ करीन आणि मग त्या कमळानें माझ्या देवाची पूजा करीन." तो बाबदेवावर आपली शीतळ छाया धरून तिष्ठत असलेल्या नांदरुकीच्या वृक्षाकडे पाहात आपल्या मनाशीं उद्गारला.

"असाच त्या सत्याग्रह्याला—" म्हातारा काजराईच्या राईपाशीं जाऊन पोहोंचलेल्या मिरवणुकींतून डौलानें मिरवत जाणाऱ्या त्या बकऱ्याकडे बोट दाखवून म्हणाला, "त्या बकऱ्याला तुम्ही आज ठार मारा आणि तो मेल्यावर त्याच्या नांवानें असाच एक धोंड्याचा बोकडदेव राईंत उभा करून त्याच्यापुढें नारळ फोडूं लागा."

बोलतां बोलतां म्हाताऱ्यानें अशा कांहीं विषण्ण पण जळजळीत चमत्कारिक नजरेनें सदानंदाकडे पाहिलें कीं, हा म्हातारा आपल्या या अभद्र वाणीनें माझें भविष्यच सूचित करीत आहे कीं काय असें सदानंदाला वाटावें.

म्हाताऱ्याचे ते उद्गार सदानंदाला ओंगळसे जाणवले; पण अगदीं ओझरते. तो वाग्बाण त्याच्या अंतःकरणाला वस्तुस्थितीच्या जाणिवेचे ओरखडे काढीत नुसता चाटून गेला. देवा-धर्मावर सदानंदाची श्रद्धा होती. पण तरीदेखील त्या म्हाताऱ्या वेड्या पिराचें बरळणें आकाशवाणीच्या मोलानें शिरीं धारण करण्याइतकी शिवरामसारखी अगर इतर अशिक्षित खेडुतांसारखी त्याच्या मनाची तयारी नव्हती.

नांदरुकीच्या पोकळ बुंध्यांतील ढोलींत शिरून नुकतीच पकडलेली बेडकी चघळीत पडलेलें गुबगुबीत आधेलें ( दिसायला मोठा पण निर्विषारी व निरुपद्रवी जातीचा एक साप ) पाळावर पडलेल्या नारळाच्या धब्बक्यानें भिऊन प्राणभयानें ढोलीबाहेर पडलें आणि झाडाच्या मुळाशीं पाऊलभर थर पडलेल्या वाळक्या पानांच्या पातेऱ्यांतून सरसर करीत निघून गेलें.

शिवरामचें तिकडे लक्ष गेलें. त्याला त्या जिवाणूचें नुसतें शेपूट वीतभर ओझरतें दिसलें. त्यानें ओठांतल्या ओठांत त्या जिवाणूच्या प्रार्थनापर कांहीं शब्द उच्चारीत डोळे मिटून त्याला हात जोडले. सदानंदानेंही त्या जिवाणूला पातेऱ्यांतून सरपटत जातांना ओझरतें पाहिलें. पण त्यानें त्याला शिवरामसारखे हात जोडले नाहींत. पायांजवळचा एक चांगला नारळाएवढा दगड उचलला आणि तो त्या जिवाणूवर फेंकून मारणार तोंच शिवरामनें तें पाहिलें व त्याच्या हातांतील दगड हलकेच काढून घेऊन दूर फेकीत म्हटलें, " आं हां ! त्याला मारायचें नाहीं. तो इतर किरडुवांसारखा साप नाहीं; बाबदेव आहे तो. नेहमीं या रानांत तो असाच पुष्कळदां आढळतो. बघावा तेव्हां बहुतकरून त्या नांदरुकीच्या ढोलींत सकाळीं दुपारीं असायचाच. पण कधीं कुणाला चावत नाहीं कीं कुणाच्या वाटेला जात नाहीं. "

म्हातारा तिरसटपणानें मधेंच म्हणाला, " तर तर ! मोठा गांधीवाला झाला आहे बाबदेव मरून आतां ! माणूस मेला आणि त्याचा हा असा साप—हा बाबदेव झाला आहे. "

बोलतां बोलतां कडवट चर्या करून म्हाताऱ्यानें शिवरामचें मनोगत पूर्ण व्हावें असें गाऱ्हाणें घातलें, आणि हातांतील नारळ नांदरुकीच्या

मुळाशीं बाबदेव होऊन बसलेल्या दगडाच्या शेजारीं पडलेल्या दुसऱ्या दगडावर आपटून फोडला. नारळांतील पाण्यानें त्यानें बाबदेवाला न्हाऊं घातलें, आणि त्याच दगडावर नारळाचीं अर्धुकें आपटून फोडून त्यांची खिरापत केली. खिरापतीच्या दोन फोडी प्रथम बाबदेवापुढें ठेवून तीनचार तुकडे इतर कीड–मुंगी–पाखरांसाठीं फेंकून दिले आणि बाकीची खिरापत थोडी सदानंदाला व बरीचशी शिवरामला दिली.

"हें काय महाराज? तुम्ही नाहीं घेत खिरापत?" शिवरामनें पशांतील खिरापतीची एक फोड तोंडांत टाकीत व अर्धी अधिक खिरापत प्रसाद म्हणून जमनासाठीं सद्र्याच्या खिशांत टाकीत विचारलें.

"मला खिरापत? मला रे कशाला खिरापत? नरकांत जाऊन पडायचेंच झालें तर ती वाट शोधीत जायला माझे डोळे अजून चांगले शाबूत आहेत कीं! नेहमींचें माहीत नाहीं तुला?" म्हातारा आपल्या झोंपडीकडे वळून सदानंदाकडे पाहात म्हणाला, "ए नव्या बाबदेवा! मी जातों. आतां बापाच्या जोडीला तूं दोन बापांचा लेक नवा बाबदेव होऊन केव्हां येऊन बसतोस पाहूं."

म्हातारा झोंपडीकडे निघून गेला. सदानंद कांहींच बोलला नाहीं. त्यानें त्याच्याकडे ढुंकूनही पाहिलें नाहीं. त्याच्या कपाळावर तिरस्काराच्या आंठ्या उमटल्या. तो आपल्या मनाशीं पुटपुटला, "काय खुळे आहेत हे गांवकरी लोक! ह्या वेड्या पिसाटाला साधू मानतात आणि..."

तोंच त्याची जीभ अडखळली. बाबदेवाविषयींच्या आठवणीनें त्याला पुन्हां बुचकळ्यांत पाडलें. शिवरामनें भोळ्या भावानें बाबदेवाला नारळ फोडून गाऱ्हाणें केलें आणि नांदरुकीच्या पोकळ बुंध्यांतून बेडकी पकडून खात बाहेर पडलेल्या सापाला भक्तिभावानें नमस्कार केला; या शिवरामच्या खुळचटपणाबद्दलही त्याला हंसूं येऊं लागलें. पण त्यानें तें मनांतल्या मनांत दाबलें. त्याला वाटलें, मयत बाबा देसाई कसे झाले तरी आतां आपले दत्तक वडील. ज्या बाबांच्या नांवावर त्याला एवढी मोठी दौलत लाभली होती त्यांच्या नांवानें नांदरुकीच्या झाडाच्या मुळाशीं मांडलेल्या दगडी बाबदेवाला–तो केवळ एक दगड आहे व दगडाला गंध,

फूल, नारळ, सुपारी वाहून त्याचा लोकांनीं देव केला आहे हें माहीत असतांनाही—त्याला दगड म्हणून हेटाळण्याचें धैर्य त्याच्या मनाला होईना. बांबा देसाई सापाचें रूप घेऊन त्या रानांत निरुपद्रवीपणानें हिंडतात फिरतात, असल्या गोष्टींवर त्याचा मनापासून विश्वास नव्हता. तरी देखील मनांत तो थोडा दचकलाच.

म्हातारा आपल्या झोपडीकडे निघून गेला. 'चल.' असें सदानंद शिवरामला म्हणत चालूं लागला.

"काजराईला नमस्कार करून नाहीं जायचें?" शिवरामनें दहा-पांच पावलें पुढें गेल्यावर वाटेला लागण्यापूर्वी विचारलें.

तेव्हां कुठें सदानंदाला भान आलें कीं आपण फोडलेल्या नारळाची खिरापत खाल्ली; पण मघांशीं जातांना त्या बाबदेवाला नमस्कार करायलाही विसरलों. त्या देवाच्या देवपणाविषयीं मनांत आदर वसत नसतांनादेखील वड, पिंपळ अथवा दगड, धोंडा कसलाही 'देव' दिसला कीं नमव मस्तक, जोड हात या पिढ्यान् पिढ्या रक्तांत भिनलेल्या गतानुगतिकत्वानुसार त्याचे हात त्याला नकळत बाबदेवासमोर जोडले गेले.

इतक्यांत काजऱ्याच्या राईतून बकऱ्याचें प्राणांतिक बेंब्रटणें व त्या बिचाऱ्या मुक्या प्राण्याचे अंतकाळींचे आर्तस्वर झांकून टाकणारा ढोलाचा ढम् ढम् आवाज त्या आसमंतात् दुमदुमूं लागला.

"बकरा बळी दिला वाटतें!" सदानंद त्या राईकडे पाहात मनांतल्या मनांत हळहळून शिवरामला म्हणाला.

"दिला वाटतें. चला, बघायचें आहे ना? पाहूं आणि काजराईला नमस्कार करून घाटी उतरूं लागूं." शिवराम म्हणाला.

सदानंदाला त्या एकंदर प्रकाराची मनांतून इतकी किळस आली होती कीं एका मुक्या जनावराच्या नरडीचें रक्त पिण्यासाठीं तहानेलेल्या त्या काजराई देवीचें—नव्हे त्या राक्षसिणीचें—दर्शन देखील नको असें तो मनांत म्हणूं लागला.

पण तें सारें मनांत. देशासारखा वेष आणि गुरूसारखा उपदेश घेतल्याखेरीज ह्या अडाणी खेडुतांच्या रांगड्या जगांत आपला निभाव लागणार नाहीं हें ध्यानीं घेऊन त्यानें आपली जीभ आवरली. तो शिवराममागोमाग काजऱ्याच्या राईकडे निघाला.

ते दोघे राईत काजराईपाशीं जाऊन पोहोंचतात तोंच बलिदानाचें कार्य आटोपून मंडळी माघारी गांवाकडे वळली होती.

"थांब रे शिवराम!" सदानंद संकोचपूर्ण वृत्तीनें शिवरामच्या खांद्यावरील कांबळ्याचें टोंक धरून हळूच ओढीत त्याला म्हणाला, "ती मंडळी जाऊं दे. तोंवर जरा थांब."

शिवरामला वाटलें, सोंवळा ब्राह्मण पडला—त्याला देवीसमोर बकरा मारलेला पाहवत नसेल; म्हणून मंडळी तो मारलेला बकरा प्रसाद म्हणून घेऊन राईपार होऊन घाटी उतरूं लागेतों शिवराम तिथेंच थबकला. दोघां तिघां गांवकऱ्यांनीं, गंगाराम देवळी पोलीस पाटलानेंही त्याला पाहिलें. पण त्याच्याबरोबर तो खादीधारी देशभक्त उभा असलेला पाहतांच तो तिकडे पाहिलें न पाहिलेंसें करून पुढें चालूं लागला. त्याला त्या खादी-धारी देशभक्ताची भीति वाटत होती असें नव्हे, पण—न जाणो साध्या कपड्यांतला एखादा पोलीस पाळतीवर आलेला आजूबाजूला कुठें एखाद्या झाडाझुडपाआड उभा असला आणि त्यानें आपल्या पोलिसी ब्रीदाला जागून पराचा पारवा आणि राईचा पर्वत करून कोतवालाला जाऊन सांगितलें तर?

म्हणून गंगाराम कांहीं बोलला नाहीं. आणि तो बोलला नाहीं म्हणून बाकीचे लोकही कुणी त्या दोघांना पाहून बोलले नाहींत.



अंमळशानें तेथील सारी गर्दी कमी झाल्यावर सदानंदानें काजराई देवीचें औपचारिक दर्शन घेतलें. बकऱ्याच्या रक्तानें न्हाल्यामुळें भयंकर व ओंगळ दिसणाऱ्या त्या देवीच्या मूर्तीकडे त्याला खरोखर पाहवलें नाहीं. पण केवळ शिवरामच्या समजुतीसाठीं तिकडे पाहिलेंसें करून त्यानें देवीला दोन्ही हात जोडले आणि तडक राईबाहेरचा रस्ता सुधारला.

" कशासाठीं रे हा बकरा तुम्हीं लोकांनीं देवीला बळी दिला आज ?" त्यानें मागाहून आलेल्या शिवरामला विचारलें.

" बकरा कशासाठीं बळी दिला ? " एवढें चांचरत बोलून शिवराम थांबला. आपल्या नव्या धन्यांना आपण आपल्याच तोंडानें खरें तरी कसें सांगावें आणि खोटे तरी कसें सांगावें असा पेंच त्याला पडला. खरें सांगावें तर बाबा देसायांच्या रंगेलपणाच्या घालमेली बोलून उजेडांत आणाव्या लागतात. घरांत सोन्यासारखी लग्नाची बायको असतांना केवळ देवस्थानच्या वहिवाटदारीच्या जोरावर देवसेवा करणारी भावीण हें अंगवस्त्र ठेवण्यांत बाबांना आणि तें पाहाणाऱ्या त्यांच्यासारख्याच इतर प्रतिष्ठितांना तेव्हां कांहीं लाज वाटली नाहीं आणि आजही वाटत नाहीं. खेडेगांवीं मोठ्या लोकांचें अंगवस्त्र हें एक भूषण असतें. पण शिवरामला मात्र संकोच वाटला कीं तुमच्या बाबांनीं भावीण ठेवली होती त्या चंद्रा भावणीची ही भाची असें आपण गरीब कुळानें कोणत्या तोंडानें त्यांना सांगावें ?

सदानंद पुन्हा म्हणाला, " सांग कीं ! आमच्या गांवची एक एक रीतभात काय आहे ती कळूं दे तरी ! "

" गंगाकाकीनें, ती पोरगी आजारी पडली आणि जगते कीं मरते असें झालें तेव्हां काजराईला नवस केला होता, त्या नवसाचा बकरा हा. "

" ही गंगाकाकी कोण रे ? "

" म्हणजे ? तुमची काकी नव्हे का ती ! "

सदानंद तें ऐकून क्षणभर विस्मयचकित होऊन स्वतःशीं हंसला. आई, बाप, भाऊ, बहीण, काकी, मामी, असलीं सावंतवाडीच्या सुंदर रंगीत लाकडी खेळण्यांसारखीं सुंदर दिखाऊ नातीं आपल्या देसायांना दत्तक जाण्यांतून एकदम कशीं निर्माण झालीं या विचारानें त्याला विस्मय वाटला व हंसू आलें. प्रथमच सासरीं जाणाऱ्या मुलीची सासरच्या नव्या जोडलेल्या नातेवाइकांशीं एकदिलानें वागतांना कशी तारांबळ उडत असेल याची त्याला त्या क्षणीं कांहींशी कल्पना आली. आपला उपरेपणा शिवरामसारख्या सामान्य कुळाच्या नजरेला येऊं नये यासाठीं ती गंगा-

काकी कुठची कोण हें माहीत नसतांही तिची अधिक विचारपूस करण्याचा मोह आवरून तो शिवरामला म्हणाला, "अस्सें! तो नवस कशासाठीं? ती पोरगी आजारी होती म्हणूनच कीं आणखी कांहीं कारण होतें?"

"नाहीं. पण अहो, हे लोक आपले वाडवडलांपासून चालत आलेले कुळाचार सोडतात, चालरीत सोडतात, देवधर्म सोडतात, आणि सुधारणा म्हणून भलतेंच कांहींतरी करतात. मग ठेंच लागून जीव जायची पाळी आली कीं आले देवाच्या पायापाशीं लोळत. देवाची चाकरी करायचें सोडून ह्या भावणी नायकिणी तुमच्या आमच्यासारखीं लग्नें करून संसार करायला लागल्या तर देव तरी त्यांना कसा बाधणार नाहीं हो? ज्यानें त्यानें आपली वाडवडलांपासूनची चालरीत कुळाचार राखून वागायला नको?"

"मग यांत काय चुकलें कुळाचार आणि चालरीत त्या भावणीच्या मुलीची?"

"चूक तिची एकटीची नाहीं; त्यांच्या साऱ्या घरादाराची चूक. आतां देव कोपला आणि घरादाराचा निर्वंस व्हायची वेळ आली तेव्हां डोळे उघडले."

"काय, काय झालें?"

"अहो, आपण भावीण होणार नाहीं, लगन करून संसार करणार असा हट्ट धरून बसली होती ना ती पोरगी! देवाच्या चाकरीसाठीं गांवांत आणलेली भावीण. आज तीन पिढ्या घराणें कसें आनंदांत नांदत होतें. त्याला ही पोरगी बट्टा लावणारी उपजली आणि देवळांतली भावीण व्हायची नाहीं असें म्हणून लगन लावायला निघाली. मग देवाची चूक तिच्या मावशीसारखी, बापसासारखी तिलाही लागली. ह्या बाबदेवाची चूक देखील निघाली ना तिला लागलेली. अगदीं पहिल्यानेंच ती फार आजारी पडली तेव्हां देव बोलला—"

"देव बोलला?"

"तर! भगलीची गोष्ट सांगत नाहीं मी. गांगेश्वराचा अवसर कांहीं केल्या आमच्या भगवान घाड्यावर मनाजोगें आंग धरीत नव्हता. तो

त्या दिवशीं शांतूच्या आजारीपणाबद्दल देवाला पडस्थळ घातलें तेव्हां एकदम असा कडकडून आला कीं, 'देवा शांत हो, देवा शांत हो' अशी त्याची मनधरणी करतां करतां नाना, मिराशी, कुळकर्णी यांना अगदीं पुरेवाट झाली ना! तडाक्यासरसें देवानें पडस्थळाचें कोडें सोडवून टाकलें. देव बोलला, 'बाबा देसायानें यांना देवसेवा करून सुखानें जगायचा मांड मांडून दिला तो ह्या पोरगीनें विसकटून टाकला. म्हणून बाबदेव कोपला आहे. त्याला प्रथम नारळ ठेवून त्याची माफी माग. नारळ ठेवून हात जोडून सांग कीं देवसेवा करायची सोडून चुकून आडवाट धरली ही माझी चूक झाली. मी माझा कुळाचार, माझा जातधर्म, माझी मेरमर्यादा मोडायची नाहीं. मी जन्मभर भावीण बनून देवसेवाच करीन.—"

तें ऐकतां ऐकतां सदानंदाच्या अंगावर तिटकाऱ्याचा कांटा उभा राहिला. त्याला इतका वेळ बाबदेवाविषयीं, आपणही त्याच कुळांतला म्हणून, जो तिरस्कार वाटत नव्हता तो ही भावणीची कहाणी ऐकून वाटूं लागला.

शिवराम पुढें म्हणाला, "मग पुन्हा देवाचे अवसर काढले, पुन्हा भावणीचें पडस्थळ घातलें, तेव्हां गांगदेवानें वाट दाखवून दिली तशी देवादेवचारांची समजूत त्या पोरगीसाठीं गंगाकाकीनें केली. इतकें झालें तरी शांतूला गुण पडेना. म्हणून मग पुन्हा गांगदेवाचा कौल घेतला. तेव्हां काजराईची समजूत करायची राहिलेली चूक आढळून आली. तेव्हां आज बकरा बळी देऊन तिची निभावणी करावी लागली."

"त्या भावणीला मूलबाळ कांहीं झालें नाहीं का?" सदानंदानें 'त्या बाबा देसायांच्या भावणीला' हे जिभेवर आलेले शब्द आपण त्याच बाबांचा दत्तक मुलगा असल्याच्या जाणीवेनें शरमून आंतल्या आंत गिळीत मोघम भाषेंत विचारलें.

"नाहीं ना! म्हणून तर ही बहीणभावंडें गांवाहून आणून तिला जवळ करावीं लागलीं. पण तीं काय विचारतां! तिचा भाऊ—आमचा शंकर गुंजन—इंग्रजी चार बुकें शिकलेला. पण जात ओळखीना कीं रीत

ओळखीना. आपला लागला भटाबामणासारखा वागायला ! भावणीच्या घराण्यांतले आपण आहों हें सांगायला लाजायचा. बहिणीशीं देखील यासाठीं भांडायचा. आणि त्यानें लगन केलें तेंदेखील असेंच बहिणीला न विचारतां, जातगोत बुडवून नायकिणीच्या पोरगीशीं केलें. कशी त्यानें ती शिरोड्याच्या खटपटे सावकाराच्या नायकिणीची पोरगी गांठली त्याचें त्याला माहीत. बापटशास्त्री देखील किती संतापले त्याच्यावर ! ”

“ बापटशास्त्री कां संतापले ? ती पोरगी कांहीं त्यांची नव्हे, आणि पोरगाही त्यांचा नव्हे. ”

“ बापटशास्त्री संतापले, ह्या बाबानें त्यांच्या भागिदाराच्या नायकिणीची पोरगी फितवली म्हणून. त्यांना झाला तरी त्यांत कमीपणा आहेच कीं नाहीं ? त्यांच्या भावणीचा नातू हा. ”

“ म्हणजे ? ”

“ म्हणजे काय ? तुमच्या बाबांची चंद्रा भावीण आणि तिचा मोठा भाऊ आमचा गंगाराम देवळी हीं बापटशास्त्र्यांचींच पोरें ना ? ठेवलेल्या भावणीचीं पोरें झालीं तरी तीं अशीं वागलेलीं कुणाला कशीं आवडतील ? भावणीचा पोरगा नायकिणीच्या पोरगीशीं लगन करतो म्हणजे तोही बाटला आणि तीही बाटली ! शंकरनें तरी काय दुसऱ्याची पोरगी अशी फितवायची ? ”

“ फितवली त्यानें ? ”

“ तर हो ! शिरोड्याची खटपटे सावकाराची ती सुंद्रा नायकीण काय साधी ? लोक सांगतात, कुणी बघील तर म्हणेल, ही राजाची राणी आहे. गडी माणसें वावरतात ना घरांत तिच्या ! गादी घालायला गडी, पिकदाणी उचलायला गडी, लुगडें चोळी धुवायला कुळवाडीण; काय साधी ती ? नशिबांत पोर नाहीं एवढेंच. म्हणून ती पोरगी तिनें पाळली. पोरगीसुद्धां काय देखणी होती म्हणतां ? नुसती दारांत उभी राहिली तरी वाटेनें जाणारे येणारे लोक तिला बघून लाळ घोटीत रेंगाळूं लागायचे. त्या नायकिणीनें तिची शेंस भरून तिला नायकीण करायची सगळी तयारी देखील केली होती म्हणे. आणि पोरगी

हट्ट धरून बसली कीं मला नायकीण करशील तर मी जीव देईन म्हणून. त्याच बाबाची शिकवण ती, शंकर देवळ्याची. आम्ही गांवच्या लोकांनीं पुष्कळ समजूत घालून पाहिली. तिथल्या माहुली देवीला कौल लावून विचारलें, तेव्हां देवीनेंही डावा कौल दिला म्हणे. तरी देखील त्या पोरीनें कांहीं आपला हेका सोडला नाहीं. ती नायकीण तर लगनाला होय म्हणेना. तेव्हां असली आई मेली असें समजून नेसत्या लुगड्यानिशीं ती पोर शंकरकडे आमच्या गांवांत आली ना! मग दोघेंही मुंबईला पळून जाऊन लगन लावून गांवांत आलीं आणि संसार करूं लागलीं. शंकरची बहीण आमच्या चंद्रा भावणीची भाची ताप येऊन मेली. देव बाधला. तिचें देखील शंकर लगन करणार होता म्हणे."

"मग त्या शिरोड्याच्या नायकिणीला तिचा देव नाहीं रे कसा बाधला?"

"नाहीं कसा बाधला? बाधला तर! ती नायकीण दुसरा दसरा उगवायच्या अगोदर तापसरीनें झिजून झिजून मेली कीं! औषधपाणी, डाक्तरी उपाय काय खटपटे सावकारानें थोडे केले? पशानें भरून पैसा खर्च केला त्यानें आपल्या नायकिणीसाठीं. मुंबईचा डाक्तर देखील आणला होता म्हणे. पण देवाच्या पायापाशीं चूक लागली तिची सोडवणूक डाक्तर आणि वैद्य तरी कशी करणार हो?"

देव आणि धर्म यांची अशिक्षित खेडवळ जीवनांत चाललेली ही ओंगळ विटंबना ऐकून सदानंदाला अगदीं शिसारी आली. त्या भरांत तो शिवरामला म्हणाला, "तुमचा देव अगदीं कठोर करडा दिसतो रे शिवराम?"

"करडा म्हणजे काय असा तसा? शंकरच्या बायकोची चूक तिच्या मावशीला बाधली ना, तशी इथें शंकरच्या घरादारालाही बाधली कीं! त्याचें लगन झाल्यावर ही एवढी एक पोरगी मात्र जलमली—"

"कोणती? आतां कोण नायकीण कीं भावीण होणार आहे ती?"

"होय. शांतू आमची. शंकऱ्याची पोरगी ती. जलमली आणि बाप मेला. आई मरतां मरतां कशीबशी पांच मिरग जगली आणि तीही

झिजून झिजून मेली. माझ्या पोरगीला मी जीव गेला तरी देवळांत घालायची नाहीं, भावीण करायची नाहीं असा तिचा हट्ट. असें कधीं चाललें आहे? देवाच्या सांवलीला जगायचें आणि देवाची चाकरी करीत नाहीं म्हणायचें! आमच्या देवाला असलें मुळींच चालत नाहीं. कसें हो चालेल?—त्याच आईची ही पोरगी. मग देवाची चूक तिला कशी लागणार नाहीं? तरी बरें कीं गंगाकाकीला तिची कींव आली. तिनें घाडयाकडून सगळ्या देवांना कौल लावून, गाऱ्हाणें घालून नीट विचारपूस केली म्हणून पोरगी हातीं लागली तरी. मोठी मायेची माउली. मूलबाळ नाहीं; एकटी वांट्याचें येईल तें उत्पन्न मीठभाकरी खाऊन हरि हरि म्हणत बसते. तिनें आधार दिला म्हणून ही पोरगी गांवांत जिवंत तरी आहे. नाहीं तर कुत्र्या–मांजरासारखी तडफडून मरायची पाळी होती हिच्यावर!"

देवाविषयीं अंधश्रद्धा सदानंदाच्या मनांत केव्हांच नव्हती. पण श्रद्धा मात्र होती. तीही ओसाड पडक्या देवळाच्या भिंताडासारखी ढांसळूं लागली. तो दगडधोंड्याचे अथवा तांबें, पितळ, चांदी, सोनें यांचे माणसानें घडविलेले देव मुळांतच मानीत नव्हता. महात्मा गांधी मानीत असलेला सत्यरूपी देव तो त्याचा देव होता. आपल्या अंतःकरणाच्या त्रिभुवनांत तो त्या देवाला जेव्हां पाही, तेव्हां त्याला सर्वत्र स्वच्छ, शीतल असा अमृतवर्षावासारखा सोज्वळ, दिव्य प्रकाश फांकलेला दिसे. त्रिभुवनांत ज्या ज्या ठिकाणीं अजाणपणा, अन्याय, विषमता यांचा काळोख असेल त्या त्या ठिकाणीं प्रवेश करून त्या अज्ञानाचें, अन्यायाचें व विषमतेचें निरसन करणें, माणसांना खरींखुरीं माणसें बनवणें हें विराट महत्कार्य महात्मा गांधींच्या प्रेरणेनें त्याला प्रतीत झालेला देव प्रेमळ सर्वमंगलकारी काळाच्या हातून सिद्ध करून घेतांना तीनत्रिकाळ दिसे.

पण आपल्या ह्या दत्तक घरच्या वतनवाडीच्या नव्या गांवीं येतांच त्याला ही देवांची एक निराळीच जात आढळून आली. किंबहुना जात पूर्वीचीच; कुठेंही गेलें तरी पळसाला पानें तीनच. त्याच्या जन्मगांवीं तरी यापेक्षां निराळें काय होतें? फरक असलाच तर तो डाव्या उजव्या-

इतका. कोणत्याही गांवीं जा. तसलींच कुळें, तसलेच धनी जमीनदार, तसलेच सावकार, तसलीच गांवकी, तसलीच गांवगुंडी; आणि रूढी, आचार, विचार, व्यवहार, नीतिधर्म, देवदेवस्थानें सारें कांहीं तसलेंच. चक्र फिरलें कीं चक्राचे दांतेही आपोआप त्या चक्राबरोबर फिरतात, तसे गांवगाड्याच्या चक्राचे हे दांते गांवोगांव असेच फिरतात. हें सदानंदाला लहानपणापासून कळत होतें पण वळत नव्हतें. त्याच्या डोक्यांत आज—तो आपल्या पांढरपेशा समंजसपणावर भरंवसून भारत-वर्षांतील सात लाख खेड्यांतील अशिक्षित पददलित दरिद्रीनारायणाच्या सेवेसाठीं कंबर कसून उभा ठाकला, तेव्हां—त्याच्या डोक्यांत प्रकाश पडूं लागला.

" खरेंच, कोटमाप हिंदी जनतेचें रक्तशोषण करणारें राक्षसी इंग्रज सरकार, खेडोपाडीं दंडेली करून गरीब शेतकऱ्यांचीं कोंबडीं, बकरीं लुबाडून मारून खाणारा त्या इंग्रज सरकारचा पोलीस, आणि काजराईच्या राईत बकऱ्याकोंबड्यांचे बळी घेत ठाण मांडून बसलेली काजराई देवी यांत अंतर काय आहे ? " तो आपल्या मनाला विचारूं लागला.

विचार करतां करतां तो मनांतल्या मनांत बाबदेवाला आठवून स्वतःशीं विषादानें हंसला. बाबदेवाच्या अवताराला कारण झालेल्या भूतकालीन घटनांचें आजवर स्वतःला माहीत असलेलें ओझरतें स्वरूप आठवूनच त्याला हंसूं येत होतें.

" माणूस केवळ जमिनदार आईबापांच्या पोटीं जन्माला आला कीं त्या पराक्रमावर त्या घराण्याकडे पिढीजाद चालत आलेल्या अफाट धनदौलतीचा आयतखाऊ धनी होतो. आणि मग ज्यांच्या जिवावर त्याची ती पिढीजाद दौलत इतकी वाढली, पिढ्यान् पिढ्या त्या दौलती-साठीं ज्यांनीं शेतांत रात्रंदिवस मरेमरेतों राबून हाडांचीं काडें आणि रक्ताची पांवळी केली, त्या गरीब कष्टाळू शेतकऱ्यांना पिळणुकीपायीं नाडून नाडून जीव नकोसा करून सोडतो. तरी बिचारीं भोळीं शेतकरी कुळें तो अरेराव मेल्यावर त्याच्या भीतीनें पुन्हा त्याचा देव बनवून त्याच्या भजनीं लागतात ! आयत्या पिढीजाद दौलतीच्या जोरावर उन्मत्त

होऊन माजलेला हा तालेवार जमीनदार क्रूर, मस्त माणूस आपल्याकडून कुळांच्या होणाऱ्या गांजणुकीमुळें त्राग्यानें जिवावर उदार झालेल्या कुळांच्या हातून ठार झाला, तरी पुन्हा तो देव होऊन पूर्वीसारखाच नव्हे, पूर्वीपेक्षां बळकट वज्रमांडी घालून त्यांच्या मानगुटीला असा येऊन बसतो. देव ! देव ! वाहवा रे देव ! ... ”

माणसानें निर्माण केलेल्या देवांविषयींचें थोतांड सदानंद आज अगदीं नव्यानेंच ओळखीत होता असें नाहीं. तसें पाहिलें तर त्याची स्वतःची सभोंवारच्या जीवनांत रूढ होऊन बसलेली देवा–धर्माविषयींची कल्पनाही त्याला सर्वस्वी मान्य होती असेंही नाहीं. असें असतांही तो रूढ देवा–धर्माला गतानुगतिकत्वानें जीवनांत शेवाळाप्रमाणें दाटून चिकटून बसलेल्या परंपरागत रूढीनुसार देवा–धर्माचें अस्तित्व सुजाणपणानें मना लान पटतांही मानी. आईबापें अवगुणी असलीं तरी जशी टाकतां येत नाहींत, तसा देवा–धर्माचाही माणसाला त्याग करतां येत नाहीं अशी त्याची परंपराग्रस्त समजूत होती.

पण त्या समजुतीला आज त्याच्यापुढें अचानक दत्त करून उभा राहिलेल्या भावणीच्या मुलीच्या प्रश्नानें जोराचा धक्का देऊन विचारलें, “ कां ? ”

सदानंद त्या प्रश्नावर स्वतःशींच निरुत्तर झाला. उत्तर त्याला सुचेना. तो लाजून रागावून स्वतःशीं म्हणाला, “ देव !— निराधार पापभीरू मुलीला ती माणसासारखी सन्मार्गानें वागूं इच्छिते म्हणून शासन करणारा, व त्या तिच्या अपराधाबद्दल एका बकऱ्यासारख्या निरपराधी प्राण्याचा बळी घेणारा, आणि शिवाय त्या पापभिरू सदाचारी मुलीला वेश्या बनवून जगाच्या बाजारांत देहाचें राजरोस दुकान मांडून बसवणारा हा आमचा देव ! आणि अशा देवांना आम्ही माणसांनीं भजायचें ! हे देव आमचें बरें भलें करणार !... ”

त्या कल्पनेसरसा सदानंद एकदम जोराची शिसारी आल्यासारखा मान किंचित् मागें काजऱ्याच्या राईकडे वळवीत थूः थूः थुंकला.

"शिवराम?" त्यानें हांक मारली.

"काय धनी?" वाटेच्या उजव्या बाजूला दूरवर पसरलेल्या वृंदावन शेतापाशीं येतांच त्या शेताचा रोमांचकारी पूर्व इतिहास आपल्या नव्या धन्याच्या आगमनाच्या निमित्तानें मनांत आठवणाऱ्या शिवरामनें चटकन् भानावर येऊन विचारलें.

"ती भावणीची पोरगी मला भेटेल का रे? कुठें असते ती? काय नांव तिचें?"

"शांतू नांव तिचें. भेटेल कीं ती! न भेटायला काय झालें? आतां पाण्याचा पालट आहे तिचा. हें डावीकडचें काजरकोंड शेत तिचें. शेताला पाणी लावायसाठीं थांबली असली पाहिजे ती. घरीं नसेल गेली. आत्तांच ती काजराईला नवस फेडायला आली होती कीं!—"

तोंच निरभ्र आकाशांत शुक्राची चांदणी चमकावी तशी त्या शेतांत पाटाच्या उंचवट्यावरील कुणग्यांसाठीं लाटीचें पाणी काढतांना शांता त्याला आढळली. तिच्याकडे पाहात हातानें पालवीत त्यानें हांक मारली, "ए शांतू! जरा इकडे ये."

शेताच्या मध्यभागीं वाटेपासून शेंदीडशें पावलें दूर एका आंब्याच्या मोठ्या झाडाच्या सांवलीखालीं शांता शेताचे वरचे कुणगे शिंपण्यासाठीं लाट काढीत होती. काजराईचा नवस फेडून आल्यावर शेतांत आजच्या कामाला लागतांना तिनें आपले मोकळे केंस बांधून घेतले होते. तिच्या कपाळावरचा कुंकवाचा मळवट मात्र होता तसाच शोभत होता.

शिवरामच्या हांकेसरशी ती लाट थोपवून लाटीच्या पायफळ्यावर कोळंब्याच्या दांडीच्या आधारें उभी राहून शिवरामकडे पाहूं लागली. दिसायला ती गोरी, नाकाडोळ्यानें सुंदर, शरीरबांध्यानें गोंडस व तारुण्यांतील उगवत्या वसंताच्या नवचैतन्यानें नटलेली होती.

'जमीनदाराच्या भावणीची मुलगी, ती सुंदर असणारच. ती आपल्या पिढीजाद वेश्याव्यवसायाच्या मूर्तिमंत नरकांत उतरायला तयार नाहीं,

त्या अर्थी ती सद्‌गुणी आणि शालीन असलीच पाहिजे...' अशा मनकवड्या, अमूर्त पण सोज्वळ कल्पनांच्या गरुडभराऱ्या मारीत त्या भावणीच्या मुलीला शोधूं लागलेल्या सदानंदाच्या मनाला लाटीच्या पायफळ्यावर उभी असलेल्या शांताच्या ओझरत्या दर्शनानें तिच्या रूपलावण्याची व त्याबरोबर तिच्या सद्‌गुणांचीही नकळत ओळख करून दिली.

तिला पाहून तो स्वतःशीं हळहळत उद्‌गारला, "अरेरे! इतकी गुणी, शालीन सुंदर पोरगी, तिला धीराचा आसरा देऊन सन्मार्गानें सुखाचें जीवन कंठायचा मार्ग दाखवायचा सोडून तिला हे लोक भावीण करूं पाहात आहेत. नाना गांवांत बसून काय करतात? हिच्यासारख्या अनाथ अपंगांना आसरा देऊन गांवगुंडांच्या तावडींतून तिला सोडविण्याची जबाबदारी त्यांच्यावर नाहीं काय? या लोकांचे जाणते पुढारी धनी ना मायबाप आम्ही?"

तोंच शिवरामनें शांताला पुन्हा हातानें पालवीत हांक मारली, "लाट जरा थांबव आणि इकडे ये लौकर."

शिवरामची ती साद ऐकून सदानंद आपल्या विचारतंद्रींतून खडबडून जागा झाला. तरीही त्याची नजर अजून लाटीच्या पायफळ्यावर उभी असलेल्या शांतावर औदार्यपूर्ण आतुरतेनें खिळली होती.

"कशाला?" तिनें लाटीच्या पायफळ्यावरून उभ्या उभ्याच हंसरी चर्या करून विचारलें, "तूंच ये कीं इकडे. रिकामाच आहेस ना?"

बोलतां बोलतां ती लाट थांबवून शेताच्या मेरेमेरेनें वाटेकडे येऊं लागली. शिवरामबरोबर असलेल्या पाहुण्यांना तिनें प्रथम ओळखलें नाहीं. म्हणून ती प्रथम शिवरामशीं चालढकलीच्या भाषेंत बोलून गेली. पण तेवढ्यांत तिनें सदानंदाला पाहिलें. आपल्या गांवचे नवे धनी देसाई आज मुंबईहून गांवीं येणार हें काल गांवांत चाकरीच्या महारानें दिलेल्या दवंडीवरून तिला माहीत झालें होतें. गांवचे एक धनी म्हणून तिला सदानंदाविषयीं राग अथवा लोभ कांहींच वाटण्याचें फारसें कारण नव्हतें. पण साऱ्या देशाच्या कोनाकोपऱ्यांत हिमालयापासून कन्याकुमारीपावेतों आणि कलकत्त्यापासून कराचीपावेतों स्वातंत्र्याच्या चळवळीचे वारे झंझा-

वाताच्या वेगानें वाहात होते; ते संजीवनीवारे पिऊन उत्तेजित झालेल्या पस्तीस कोटी भारतसंतानांपैकींच शांताही एक होती. मराठी सहा बुकें शिकलेली व वाचनाची फार आवड. तिला परिस्थितीमुळें आजवर जरी त्या स्वातंत्र्यसंग्रामांत भाग घेतां आला नव्हता, तरी तो संग्राम प्राणपणानें अहिंसाधर्मानें लढणाऱ्या देशभक्त वीरांविषयीं अलोट आदर तिच्या अंतःकरणांत वसत होता. काजरघाटीच्या माथ्यावर काजऱ्याच्या राईपाशीं तिनें शिवरामबरोबर येतांना सदानंदाला ओझरतेंच पाहिलें. आपण यःकश्चित् ' भावणीची ' पोर! गांवाची पिकदाणी! अशा थोरामोठयांकडे आपण धिटाईनें पाहिलें तर माजोरीपणानें देवाच्या पायरीला पाय लावल्या-सारखें होईल या संकोचपूर्ण भीतीनें तिनें ओझरतेंच पाहिलें होतें. गंगा-काकी आणि तिच्या पाठीशीं उभा असलेला सारा देवखुळा गांव यांच्या एवढ्या मोठया क्लेशकारक दडपणाखालीं दडपून गेलेली ती अनाथ पोरकी पोर त्या बळी देण्याच्या बकऱ्यामागोमाग मंडळीबरोबर काजराईकडे गेली, तेव्हां लोक त्या बकऱ्याबरोबर आपलाही काजराईला बळी देण्यासाठीं आप-णाला घेऊन जात आहेत इतकी हळहळ व इतकें दुःख तिला मनांतून वाटत होतें. तरी गेली ती देवाला भिऊन. हा निष्ठुर देव आपणाला शासन करायला उठला आहे, त्या शासनांतून आपली सुटका करून घेण्यासाठीं निरुपायानें भिऊन ती पुढें वाढून ठेवलेल्या वेश्याजीवनाच्या अग्निदिव्याला मोठया नाखुषीनें तयार झाली होती. परंतु सदानंदाला पाहातांच तिला क्षणभर पृथ्वीवर साक्षात् नवा दयाळू देव उतरल्यासारखें वाटलें.

स्त्रीजीवनसुलभ स्वाभाविक लज्जा आणि शिवरामच्या हांकेच्या निमि-त्तानें आपल्या नव्या उपकारी धन्यासमोर जाण्याची उत्सुकता, यांना आपल्या मनांत स्वैरपणें पण निरागस यौवनसुलभ लपंडाव खेळूं देत ती आतुर वृत्तीनें पण शेताच्या मेरेवरची अवघड निरुंद वाट ध्यानीं घेऊन सावधपणें चटचट पावलें टाकीत ते दोघे उभे होते तिकडे येऊं लागली.

सदानंदाचे उत्सुक नेत्रही कुतूहल व अनुकंपा या अंतरींच्या पवित्र दुहेरी ओढीनें शांताकडे वेधले होते. शिवरामही सदानंदापाशींच उभा

होता. पण त्याचें शांताकडे लक्ष नव्हतें. वाटेच्या उजव्या बाजूला झाडा-खालीं दिसणाऱ्या त्याच्या मैत्रिणीच्या झोंपडीकडे त्याचे डोळे ओढ घेत होते.

"जरा मिनिटभर थांबतां तुम्ही इथें? एक घाईचा निरोप सांगायचा आहे तेवढा सांगून येतों." तो जमनाच्या झोंपडीकडे ओढ घेऊं लाग-लेलें आपलें लोभी मन लपवीत सदानंदाकडे पाहून म्हणाला.

"थांबतों मी. जा, जाऊन ये तूं लौकर." सदानंद त्याच्याकडे ओझरतें वळून पाहिल्या न पाहिल्यासारखें करून म्हणाला.

समोरून शांता शेताच्या अरुंद मेरेवरून तोल सांभाळीत खालच्या मानेनें पण मधून मधून आकाशांतून नक्षत्रांनीं लुकलुकत सृष्टीकडे पाहावें तशी लाजऱ्या, चोरट्या परंतु पवित्र नजरेनें सदानंदाकडे पाहात लगबगीनें येत होती. तेवढ्यांत तिचें पायाखालील अरुंद मेरेकडे क्षणभर दुर्लक्ष झालें आणि मेरेचें तिच्या पायाखालचें ढेकूळ फुटून ती डाव्या बाजूवर कलंडली. पण शेतांत पडतां पडतां सावरली.

तिला अपघात झाला कीं काय असें वाटून सदानंद मनांत चुटपुटत शेतांतील मेरेवरून घाईघाईनें तिला सांवरण्यासाठीं जाऊं लागला. तो दहा पांच पावलें जातो न जातो तों एका लहानशा कलंडत्या दगडावर त्याचा डावा पाय पडून दगड उलटला. आणि—!

पायाला कांहींतरी जिवाणू कडकडून डसलें.

डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच सदानंदानें पायाला काय डसलें म्हणून खालीं वळून पाहिलें. तों डाव्या पायाच्या आंगठ्यांतून भळभळा रक्त वाहात असलेलें त्याला दिसलें. चावा घेऊन वळवळत बाजूला नागमोडें सरसर सरपटत जाणारें जिवाणूही दिसलें.

" शिवराम ! शिवराम ! " सदानंदानें कावऱ्याबावऱ्या नजरेनें मागें वळून शिवराम गेला होता त्या वाटेकडे पाहात हांक मारून म्हटलें, "शिवराम! मला साप डसला रे ! "

—आणि तो मटकन् खालीं बसला.

' साप डसला ' हे शब्द दोन कुणग्यांपलीकडच्या बांधापावेतों चालत आलेल्या शांताच्या कानीं पडले मात्र. ती एकदम शहारल्या अंगानें शेत तुडवीत धांवत घारीसारखी सदानंदापाशीं आली.

" साप डसला ग मला. " सदानंद बाजूनें वळवळत शेताच्या मेरेला असलेल्या भेगेंत शिरणाऱ्या जिवाणूकडे नजर वळवीन शांताला म्हणाला.

क्षणभर—फक्त क्षणभरच शांताच्या मनांत गोंधळ उडाला. दुसऱ्याच क्षणाला तिनें ओठावर ओठ दाबून त्या लपूं लागलेल्या सापावर नजरेची पाळत टेवून आपल्या नेसत्या लुगड्याचा पदर ओढून त्याच्या किनारीची चिंधी फाडली आणि लपणाऱ्या सापावरून नजर न ढळवतां घाईघाईनें सदानंदाचा तो दंश झालेला पायाचा आंगठा त्या चिंधीनें अगदीं करकचून आवळून बांधला.

" थांबा जरा, पाय अगदीं हलवूं नका. " असें म्हणत ती सदानंदाच्या पायाजवळचा दगड उचलून त्या साप लपत असलेल्या जवळच्या मेरेंतील बिळाकडे वळली. मेरेवर जोरानें दोन तीन लाथा मारून तिनें मेर मोडली. त्या आवेशांत मेरेवरच्या काटेऱ्यांतील एक कांटा आपल्या पायांत बोचून मोडला हेंही तिच्या ध्यानीं आलें नाहीं. पायांत रुतलेलें गवताचें कुसूं उपटून फेकावें तसें तें काटेरें तिनें तिकडे न पाहातांच उपटून फेकून दिलें, आणि बिळांत लपलेल्या सापाची वीतभर शेपटी बिळाबाहेर वळवळत होती ती दोन्ही हातांनीं घट्ट पकडून त्या सापाला खस्कन् ओढून बाहेर काढलें. तो काळ संतापून फुत्कारत उलटून तिला डसायला पाहूं लागला. पण त्याचें वर्म तिला माहीत होतें. तिनें त्याला दोन्ही हातांनीं शेपटीकडे घट्ट पकडून उंच हात करून आपल्या डोकीसभोंवार सात आठ वेळां गरगर गरगर फिरविलें आणि जोराजोरानें त्याला मेरेवर दोन तीन वेळां आपटलें. त्यासरशी त्या सापाच्या मस्तकाच्या व अर्ध्या करवळाच्या चिंध्या चिंध्या झाल्या. त्याच्या रक्ताचे तीन चार शिंतोडे तिच्या नेसलेल्या साडीवर उडाले त्याचेंही तिला भान नव्हतें.

तिनें त्या सापाची छिन्नविच्छिन्न झालेली फणा उलटून लक्षपूर्वक पाहिली. तेथील दहाच्या आकड्याखालीं तिला दोन रेघा दिसल्या.

"दोन पेटक्यांचा होता काळ! गावला म्हणून बरें झालें." असें म्हणत तिनें तें अखेरच्या मरत्या धुगधुगीनें निर्जीव हालचाल करणारें सापाचें मढें उचलून मेरेवर आडवें टाकून ठेवलें. लगेच ती सदानंदापाशीं आली व त्याच्या पायापाशीं मेरेवर ओल्यांत बसून त्याचा पाय उचलून गुडघ्यावर घेऊं लागली.

"हें काय करतेस?" सदानंदानें विचारलें.

शांता त्याला शांत राहण्यासाठीं हातानें खुणावीत त्याच्या आंगठ्याला त्या सापाच्या दंशानें झालेल्या जखमेवर ओंठ ठेवून रक्त शोषून घेऊं लागली. ती एक दोन तीन वेळां लागोपाठ रक्त शोषून चुळा थुंकली.

"इथें कुणीच कसें शेतांत दिसत नाहीं या वेळीं?" असें स्वतःशीं म्हणत तिनें सभोंवार पाहिलें व वर मान करून वाटेच्या पलीकडील बाजूला लागून असलेल्या शेतांतील झोंपडीकडे पाहात मोठ्यानें हांक मारली, "शिवराम! ए शिवराम! जमना! ए जमना! कुणीतरी लवकर इकडे या कीं रे!"

नदीकांठच्या शेताच्या बांधावर गुरांसाठीं ओली चार कापीत असलेली जमना शांताची हांक ओळखून वर बांधावर येऊन उभी राहिली आणि हांक मारून विचारूं लागली, "काय ग शांतू? कशाला हांक मारतेस?"

"चार कापायची ठेवून इकडे लौकर ये कीं जरा. यांना हा बघ काळा डसला आहे." शांता जमनाकडे केविलवाण्या नजरेनें पाहात हातानें तिला जोरजोरानें पालवीत म्हणाली.

तोंच जमनाच्या गोठ्यांतलें गाईचें वासरूं हंबरूं लागलें. त्याला जमनाची हांक ओळखतां आली. वासरामागोमाग गायही हंबरली.

वासराचें एकसारखें हंबरणें ऐकून जमना कांहींशी कावली. शांताची हांक आणि वासराची हांक या दोन्ही हांकांत वासराची हांक तिच्या

कानाला अधिक कळकळीची वाटली खरी, पण म्हणून काय साप डसलेल्या माणसाला वांचविण्यासाठीं शांतानें मारलेली हांक तिला डावलतां येईल ?

" गप्प बस कीं ग जरा. इतका जीव कां घालवतेस बेंबट्न बेंबट्न ? वाघ खायला आला कीं काय? आल्यें. थांब जरा." असें त्या वासराला प्रेमानें दटावीत जमनानें हातांतील ओल्या चारीचा घांस तसाच खालीं टाकला, आणि घाईघाईनें ती शांता उभी होती तिकडे जाऊं लागली.

शिवराम देखील जो जमनाच्या झोंपडीचें दार बाहेरून कडी लावून बंद केलेलें पाहून खट्टू मनानें दारापाशींच 'ही कुठें गेली' असें मनाला विचारीत उभा होता, तो देखील जमनाचा शब्द ऐकून त्या वासरासारखाच आनंदित झाला. शांताची हांक त्यालाही ऐकूं गेली होती. पण केवळ शांताच्या हांकेला तो धांवून गेला असें नाहीं. 'हा बघ यांना काळा डसला आहे' हे शांताचे शब्द ऐकून तो एरव्हीं देखील आपल्या धन्यांना साप डसला कीं काय या भीतीच्या धक्क्यासरसा धांवून गेलाच असता. तशांत जमना त्या हांकेला धांवून येत असलेली जेव्हां त्याला समजली, तेव्हां तर त्याच्या पायांत नवा जोम आला. त्याची जमना त्याला दोन आठवड्यांनंतर आज प्रथमच दिसणार होती. तिला पाहण्यासाठीं आशेनें उत्सुक झालेल्या त्याच्या नजरेंत आज नव्या उत्साहाचे अमृताचे झरे खळखळून वाहूं लागले होते. आज तो नेहमींच्या जमनाला भेटणार नव्हता; आपल्या मयत जीवश्च कंठश्च मित्राच्या विधवा बायकोला भेटणार नव्हता; तो तिच्यासाठीं आज भरलेला कुंकवाचा करंडा हातीं घेऊन आपल्या नांवरशीनें तिच्या ललाटीं त्या कुंकवाचा टिळा लावण्यासाठीं आनंदाच्या उतावळेपणानें बेहोष झालेला तिचा प्रेमिक 'आपल्या' जमनाला भेटणार होता. तिला तो इतके दिवस आपल्या अंतःकरणाच्या अगदीं आंतल्या कप्प्यांत जतन केलेलें गोड गुपित आपल्या सुवासानें सभोंवारचें वातावरण सुगंधमय करून सोडणाऱ्या ताज्या उमललेल्या चमेलीच्या कळीसारखें बहरलेलें तिला उघड करून सांगणार होता.

जमना आणि शिवराम दोघेंही एकमेकांकडे पाहात शांता उभी होती त्या बांधापाशीं येऊन पोहोंचलीं. तीं एकमेकांकडे दुरून पाहात उजव्या

गालानें डाव्या गालाशीं हंसावें तशीं हंसलीं. दोघांच्याही हास्यांतील माधुरीची चव अवीट होती खरी; आणि दोघांनाही ती अवीटच वाटली.

पण अमृताचीही माधुरी फिकी पाडणाऱ्या आपल्या एकमेकांच्या मधुर हास्यांतील माधुरीच्या चवींत दोन हंसऱ्या गालांमधल्या अंतरा-इतकेंच अंतर आहे याची दोघांनाही जाणीव नव्हती.

जमनाचें अंतःकरण आज जाईजुईच्या ताटव्यावरील उमलत्या फुलां-सारखें प्रफुल्ल होतें, याचें कारण तिच्यासाठीं रावबा विचारे आज भरल्या कुंकवाचा करंडा घेऊन तिला आपल्या नांवरशीचें कुंकू लावायला येणार होता. चार दिवसांपूर्वींच त्याचा तसा निरोप आला होता. जगांत कुणालाही आपल्या आयुष्यांतील ही आनंदाची बातमी कळण्यापूर्वी ती आपण आज आपल्या जिवाभावाच्या पाठीराख्या–द्रौपदीच्या श्रीकृष्णाला–कळवणार असें ती आज पहांटेपासूनच मनांत योजीत होती. सकाळींच नानां-बरोबर आपल्या नव्या धन्यांना आणण्यासाठीं मोटारीच्या रस्त्याच्या तिठ्यावर गेलेल्या शेतकऱ्यांच्या घोळक्यांतून शिवरामलाही जातांना तिनें पाहिलें होतें. तो माघारा जातांना आपणाला भेटल्याखेरीज जाणार नाहीं अशी तिची खात्रीच होती. तो येईल तेव्हां त्याला आपल्या गाईचें अगदीं ताजें दूध काढून प्यायला देणार अशा बेतानें ती गाईला पान्ह-वणाकरितां म्हणून मुद्दाम आज इतक्या लौकर बांधावर ओली चार कापण्यासाठीं गेली होती. नाहींतर रोजची तिची वेळ प्रहरभर दिवसाला गुरावांसरांचा गोठ्यांतला सारा कामधंदा आटोपल्यावर चारीला जायची.

पण आज पंधरा दिवसांनंतर त्या दोघांची गांठ पडली ती अशा चमत्कारिक स्थितींत कीं नुसता उजवा गाल डाव्या गालाकडे पाहून हंसला. त्यापेक्षां अधिक कांहीं बोलण्याचा धीर त्या प्रसंगीं कसा होणार!

तीं दोघें जवळ येऊन पोहोंचतात तोंच शांतानें भित्र्या जागरूक नजरेनें पुन्हा एकवार मागें वळून सदानंदाच्या जखमी पायाकडे पाहिलें. सर्पदंशानें डाव्या आंगठ्याला झालेल्या जखमेंतून पुन्हा रक्त भळभळ वाहूं लागलें होतें. तें पाहून शांता कोंबडीनें पिलाला पंखाखालीं घेण्या-साठीं झेंप टाकावी तशी झेंप टाकून सदानंदापाशीं गेली आणि पुन्हा त्या जखमेला ओठ टेकवून रक्त शोषून थुंकूं लागली.

शिवराम आणि जमना या दोघांनाही तें पाहून आश्चर्य वाटलें कीं ही भरवणीची पोर पूर्वी कधीं नव्या धन्याच्या ओळखी–देखीची देखील नाहीं, आणि ती इतकी जिवावर उदार होऊन धन्याचें मरणदेखील झालें तरी आपणावर ओढवून घेण्याच्या तयारीनें त्याच्या आंगठ्याच्या जखमेंतलें विष आपल्या तोंडानें शोषून घ्यायला कशी तयार झाली ?

शांतानें सदानंदाच्या पायाच्या जखमेंतून शोषून घेतलेल्या रक्ताच्या तीनचार चुळांवर चुळा थुंकीत त्या दोघांना म्हटलें, " यांना अगोदर घरांत न्यायला हवें. जरा हात लावा. जमना ! तूं यांचा एक हात धर आणि शिवराम तूं दुसरा धर. त्यांना घेऊन माझ्या घराकडे चला. माच्यावर गोणपाट असेल. खुंटीवर धोतर, लुगडें, कांबळें काय मिळेल तें घेऊन त्या गोणपाटावर घाला आणि माच्यावर त्यांना निजवा. मी वर जाऊन जाना धनगर तरी मांगरांत भेटतोसा बघत्यें." ती सभोंवार घारीसारखी शोधक नजर फेंकीत खिन्न वृत्तीनें म्हणाली, " रोज या वेळीं इथें वरच्या आडथ्यांत शेळ्या राखतांना भेटतो. पण आज वेळेला हवा तेव्हां मात्र नेमका भेटायचा नाहीं."

सापाच्या विषावर रामबाण उतारा देणारा त्या गांवांत पहिल्या प्रतीचा वैद्य शिवनाक महार आणि त्याच्या खालोखाल अथवा तितकाच चांगला वैद्य काजराईच्या राईमागें मांगर बांधून राहिलेला जाना धनगर. शांताचा इतर लोकांप्रमाणेंच सापाच्या विषावरील उताऱ्याच्या बाबतींत धनगर वैद्यापेक्षां महार वैद्यावर अधिक भरंवसा. शिवनाक महाराचें घर जरा दूर महारवाड्यांत होतें खरें. पण तो रोज या वेळीं तिथून जवळच्याच आपल्या शेताला पाणी द्यायला येतो हेंही शांताला माहीत होतें. एकदां तिला वाटलेंही कीं आपण तिकडे जाऊन तो शेतांत भेटतोसा पाहावा. परंतु दुसऱ्याच क्षणाला तिच्या मनानें तिला नको म्हटलें. तिला माहीत होतें आणि साऱ्या गांवालाही माहीत होतें कीं देसायांनीं नुकताच दुखवलेला तो जहरी साप आहे; पोटांत दावा धरून बसला असेल. केव्हां कसा डसेल याचा काय नेम ? आठ पंधरा दिवसांपूर्वीच नानांनीं त्याला सड्यावरचा देसायांच्या खरींतला वरंडभर गोंडा ( रानगवत ) चोरून

कापल्याबद्दल गुराला झोडपावें तसें निर्दयपणानें स्वतः त्याला शिवून पायांतल्या पायतणानें झोडपीत आपल्या वाड्यापावेतों आणलें होतें. आणि तिथेंही गड्याकडून त्याचे दोन्ही हात त्याच्या पाठीमागें उरफाटे घट्ट बांधून त्याला झोडपलें होतें. इतका आपला छळ करणारा हा नाना धनी–त्याचाच मुलगा हा नवा धनी–शांताला वाटलें, शिवनाक महार झाला तरी माणूस आहे. तो स्वतःला डसणाऱ्या सापाच्या पोराला दूध कां म्हणून पाजील?– म्हणून ती त्या वाटेला गेली नाहीं. ती पदराच्या टोंकानें ओठाला लागलेले रक्ताचे डाग पुशीत व पुन्हा पुन्हा तोंडांत लाळ साठवून चुळा थुंकीत जाऊं लागली.

"कुठें जातेस?" सदानंदानें सर्पदंशामुळें होणाऱ्या भयंकर वेदनांमुळें तापलेल्या रेतींत पडलेल्या मासळीसारखें तळमळत शांताकडे आपली केविलवाणी निस्तेज नजर वळवून विचारलें.

"मी येत्यें वैद्याला घेऊन. वैद्य चांगला आहे झाडपाल्याचें औषध देणारा. विलायतेहून आलेला डाक्तर काय करतो त्याच्यापुढें? औषध दिलें कीं हां हां म्हणतां विष उतरेल. भ्यायला नको कांहीं. मी ही अशी याच पावलीं येत्यें." असें सांगून शांता झपझप पावलें उचलीत घाटी चढूं लागली.

"अगोदर औषध तूं घे. नाहींतर माझ्यासाठीं तूं फुकट—" पुढचा 'मरशील' शब्द सदानंदाच्या ओटांतला ओठांतच विरला. एकदम सर्पदंश झाल्या जागीं जखमेंत तापलेली सुई खुपसावी तशा वेदना होऊं लागल्यामुळें त्याच्या मुखावाटे शब्द उमटेना.

जमना आणि शिवराम तें ऐकून एकमेकांकडे पाहून पारध्याच्या नजरेनें पाठमोऱ्या शांताचा मार्मिक पाठलाग करीत गालांतल्या गालांत हंसलीं.

सदानंदाचें अर्थात् तिकडे मुळींच लक्ष नव्हतें. 'बरें' म्हणून मान हेलावीत शांता झपझप घाटी चढूं लागलेली देखील त्याच्या ध्यानीं आली नाहीं. आपण एक पाऊल या जगांत आणि दुसरें पाऊल मृत्यूच्या

जगांत टाकून असहाय पडलों आहोंत हें ओळखून कल्पनामय भीषण भविष्याशीं तो प्राणपणानें झगडण्यांत गढून गेला होता.

शिवरामनें त्याला दोन्ही हातांचा आधार देऊन उभें केलें. पण धड उभें राहण्याइतकी ताकदसुद्धां त्याच्या पायांत नव्हती. शेवटीं त्याला पाठुंगळीला घेऊन शिवराम जमनामागोमाग तिच्या झोंपडीकडे चालूं लागला.

●

शांता घाटी चढून धनगराच्या मांगराकडे वळणार तोंच त्या म्हाताऱ्या ब्राह्मणाच्या झोंपडीसमोर आंगणांत शिवनाक महार बसलेला तिला आढळला. पूर्वीचा त्याचा आणि देसायांचा हेवादावा कांहीं मनावर न घेतां ती त्याला म्हणाली, "शिवा! अगदीं देवानें धाडल्यासारखा भेटलास. चल, अगोदर ऊठ आणि तुझ्या नव्या धन्यांना औषध दे."

"कां, काय झालें?" शिवनाक उजव्या हाताच्या आंगठ्यानें डाव्या तळहातावरची चिमूटभर तंबाकू चुरून कुड्याच्या पानांत विडी गुंडाळीत म्हणाला.

"अरे त्यांना काळा डसला कीं!"

"काळा डसला? बाब्रदेव डसला वाटतें?" म्हातारा शिवनाकाकडे पाहून भुंवया चढवीत तर्कटला, "जा! तुझ्या नव्या धन्याला वांचवायला जा. तुला पुन्हा सज्यावरून पायांतल्या पायतणानें मारीत झोडीत आणायला धनी हवा ना तुला? तर मग जा लौकर. मेला बिला तर मग तुला पायतणानें कोण मारील रे?"

शिवनाकानें साप चावल्याचे शब्द शांताच्या तोंडून ऐकले मात्र आणि त्याच क्षणीं हातांतील अर्धी गुंडाळलेली विडी तशीच फेंकून देऊन कांबळें खांद्यावर टाकून तो उठला.

## विषाचा मळा पिकला !

शिवनाकाच्या औषधी उपायांनीं म्हणूनच सदानंदाला त्या दिवशीं जीवदान मिळालें. ताबडतोब औषध दिलें गेलें आणि उपचारासाठीं सर्पदंशाच्या जखमेवर लावण्याकरतां जमना, शिवराम व शांता यांनीं आपल्या घरचीं पाळलेलीं कोंबडीं आणून दिलीं, म्हणून सदानंद हातीं लागला. लगेच शिवरामनें जाऊन देसायांच्या घरची डोळी आणून तिच्यांतून त्याला मग देसायांच्या वाड्यांत पोंचविलें.

शिवराम, जमना, शिवनाक यांच्याप्रमाणें गांवांतील देसायांचीं व इतर आणखी कितीतरी शेतकरी कुळें सदानंदाचा—त्या आपल्या नवीन गांव-धन्याचा—जीव बचावण्यासाठीं आपापल्या परीनें झटलीं होतीं. आणखी कितीतरी लोकांनीं आबा मास्तरांबरोबर सदानंदाच्या उपचारासाठीं घरचीं कोंबडीं पाठविलीं होतीं. तितकीं अर्थातच लागलीं नाहींत; उरलीं तीं ज्यांचीं त्यांना आबा मास्तरांनीं लगोलग परत केलीं.

एवढें आटोपायला दुपारचे बारा वाजले. देवाचा चौघडा झाला.

सदानंद डोळींतून एकदांचा घरीं जाऊन पडला. मंडळीनें त्याला पोंचविलें. आतां त्याला निश्चित गुण पडूं लागला असें पाहून धन्याच्या समाचारासाठीं देसायांच्या वाडयांत जमलेली मंडळी दुपारीं बाराच्या चौघडयाला आपापल्या घरीं गेली. आबा मास्तर व शिवराम हे दोघे मात्र सदानंदाच्या उशाशीं बसले होते.

आणि शिवनाक महार वैद्य देखील वाड्याबाहेर खळयाच्या कोंपऱ्यांत महारापोरांनीं उभें राहाण्याच्या कट्टयावर जिवाच्या जतनेनें धन्यांच्या जिवावर जागता पाहारा करीत बसला होता. नाना आल्याखेरीज जाऊं नकोस असें त्याला देसाईणबाईचें सांगणें होतें.

याच कट्टयावर त्यानें नानांकडून भर उन्हांत तिष्ठत त्यांच्या पायांतल्या पायतणाचा मरेमरेतों मार खाल्ला होता व आपल्या आईबापांचा उद्धार

त्यांच्या तोंडून ऐकला होता. त्या गोष्टीला कांहीं पुरे पंधरा दिवस लोटले नव्हते.

तो प्रसंग शिवनाकाच्या स्मरणांत अजून अगदीं ताजा होता. आज या चमत्कारिक घटनेनें त्याच आठवणीला नवे जोमदार अंकुर फुटून ती पालवीनें आणि फुलांनीं बहरूं लागली.

शिवनाक आपल्या मनाशीं समाधानाचे उसासे सोडीत कट्ट्यावर बसला होता. " आतां नानांचा माझ्यावरचा सारा राग दूर होईल. माझ्या हातून देवानें धाकट्या धन्यांचा जीव वांचवला; केवढें थोर नशीब माझें! नाना मला आतां तोंडभर दुवा देतील. माझ्याकडची सड्यावरची कासाची जमीन काढून घेणार नाहींत, भातशेताचे चार कुणगे आहेत ते काढून घेणार नाहींत..."

तेवढ्यांत पिराजी धांवत पळत आला. शिवनाकानें त्याला विचारलें, " काय रे पिऱ्या! कशाला आलास इतका धापा टाकीत ? "

" भावणीची शांतू कशीतरीच करत आहे. डोळे काय गरगर फिरवते, हात काय वेडेवांकडे टाकते, आणि बडबडते काय; भगवान गांवकरानें तुला आत्तांच्या आत्तां बोलावलें आहे. म्हणाला, असशील तसा ये अगोदर. सापाचें विष बाधलें म्हणतो तिला; विखारलेल्या रगताची चूळ गेली वाटतें तिच्या पोटांत. पोलीस पाटील, भगवान घाडी, तो एक पट्टेवाला शिपाई कोण न कळे आणि बिरजे पोलीस जवळ बसले आहेत." पिराजी म्हणाला.

बापलेकांची ती कुजबूज ऐकून जवळच्या पडवींत सदानंदाच्या उशाशीं बसलेला शिवराम व तिथें अव्यवस्थित पडलेल्या सामानाची आवराआवर करून म्हाराच्या विटाळाचे कपडे आवरीत जागा जरा बेणी करीत असलेली जमना, दोघेंही बाहेर आलीं. त्यांच्या मागोमाग आबा मास्तरही सदानंदानें सांगितल्यावरून चौकशी करण्यासाठीं बाहेर आले.

" काय, काय झालें रे पिऱ्या ? " शिवरामनें विचारलें.

" भावणीची शांतू कशीशीच करते आहे. भगवान घाडी म्हणतो तिला सापाचें विष चढलें आहे. बाबदेव तिला बाधतो आहे असें कायसेसें तो देवाला विचारून सांगत होता. " पिऱ्या म्हणाला.

" कोण ? कोण सांगत होता ? सैतान घाडी ? " आबा मास्तरांनीं बाहेर जाऊन रागानें त्या महार बापलेकांकडे पाहून विचारलें. भगवान घाड्याला ते चांगला ओळखीत होते. गांवांतल्या निढावलेल्या गांव-कुठारांपैकीं घाडी हा त्या गांवचा–देवाचा एक पिढीजाद ढालगज वतनदार मानकरी होता. उत्पन्न बेताचेंच. पण मिशीला तूप लावून देव-देवस्की करीत माजलेल्या तरण्या पोळासारखा गांवांत मीपणानें हिंडायचा. गांवचा 'देवरुषी' तो; कोंबड्या–बकऱ्यांचे व नारळ–गूळ–साखरेचे नवस देवाला लोकांकडून पटवून देणारा देवांचा दलाल. म्हणूनच आबा मास्तरांनीं त्याचें नांव सैतान घाडी पाडलें होतें.

" कोण कोण जमले आहेत रे तिथें ? " जमनानें उत्सुकतेनें पुढें होऊन कान टवकारून विचारलें. कांहीं क्षणांपूर्वीं आंत सदानंदाचे कपडे आवरीत असतांना जीवाभावाच्या मोलाचें वाटणारें रावबाचें गोड नांव तिला पिऱ्याच्या तोंडून ओझरतें ऐकूं आलें होतें, तें पुन्हा कानीं पडावें म्हणून ती कान टवकारून उतावळ्या आशेनें उभी होती.

" पोलीस पाटील, भगवान घाडी, तो पट्टेवाला बेलीफ, ब्रिरजे पोलीस असे कोणकोण जवळ बसले आहेत तिच्या. " पिराजी उत्तरला.

' पट्टेवाला बेलीफ ' हे शब्द कानीं पडतांच जमना लाजाळूसारखी मनांतल्या मनांत लाजत गालांतल्या गालांत हंसली. उजव्या हाताचा आंगठा कांहींशा बेभान स्थितींत तोंडांत घालून ती कांहीं क्षण तशीच शांताच्या घराच्या दिशेकडे पाहात उभी होती.

" म्हाराच्या विटाळाचे कपडे व्हाळावरून धुऊन आण " असें देसाईणबाईनीं सांगितलें. जमना अधिक कांहीं न बोलतां हंसतमुखानें व प्रसन्न वृत्तीनें रावबा विचाऱ्याचें नांव मनांत घोळवीत आंत जातां जातां म्हणाली, " जारे शिवा ! तूं जा अगोदर तिकडे आणि शांतूला औषध-पाणी दे. बहुतेक सापाचेंच विष बाधलें असेल तिला. "

" होय तर ! वीखच बाधलें असलें पाहिजे तिला. तिच्या टाळ्याला कुठेंतरी बारीक फोड फुटकुळी असेल म्हणून वीख बाधलें असेल. " असें म्हणत शिवनाक पिराजीबरोबर तिकडे निघाला.

शिवनाकाच्या तोंडचें वाक्य पुरें होण्यापूर्वींच आंतून पडवींतून सदानंद्राची क्षीण हांक आबा मास्तरांना ऐकूं आली, " मास्तर ! "

आबा मास्तर हाताच्या खुणेनें सर्व मंडळीला गप्प राहायला सुचवीत घाईघाईनें आंत गेले.

शिवराम मात्र एकटाच तिथें कांहींशा सुन्न चित्तानें स्वतःशीं विचार करूं लागला, " जमनानें जातांना माझ्याकडे पाहिलें देखील नाहीं. पण गालांतल्या गालांत हंसली. कुणासाठीं हंसली ती ? माझ्यावर ती रागावली असेल का ? सकाळीं भेटल्यापासून नेहमींसारखें मनमोकळेपणानें तिच्याशीं बोललों नाहीं म्हणून ? " हे अस्थिर विचार त्याच्या मनांत हेलावत होते.

" आतां घरीं जातांना तिला भेटेन आणि सगळें सांगेन तेव्हां ताळ्यावर येईल ती. " तो जणूं काय आपण जमनाच्या प्रेमानें रंगून गेलों आहों तशी जमनाही आपल्या प्रेमानें रंगून गेली आहे असें गृहीत धरून मृगजळाच्या नदींत पोहत होता.

तोंच त्याला घरांतून देसाईणबाईचे शब्द ओझरते ऐकूं आले. " न्हाळावरून कपडे धुऊन लवकर ये ग जमना ! आज जेवायला इथेंच राहा. घरीं नको जाऊंस. "

शिवराम तें ऐकून मनांत म्हणाला, " आतां जातांना न्हाळावरूनच वळण घेऊन जातों म्हणजे ती भेटेल. "

जमनाला देसाईणबाईंचे शब्द ऐकून पेंच पडला कीं यांचा शब्द आतां मानावा तरी कसा आणि मोडावा तरी कसा ? रावबा विचारे आज दुपारीं आपल्याकडे आल्याखेरीज राहायचा नाहीं अशी तिची खात्रीच होती. तिला केळवण करणारीं कोणी गांवांत नव्हतीं म्हणून. आणि पाटाच्या लग्नाच्या वेळीं कुणी कुणाला केळवण करीत नसतें हेंही खरें म्हणून. नाहींपेक्षां तो दिवस तिच्या केळवणाचा. लवकर एकदां काम आटोपून घरीं केव्हां जाईन आणि रावबासाठीं चांगलें जेवण केव्हां करीन असें तिला मनांतून होऊन गेलें होतें.

पण हें मनांतलें हितगुज तिला देसाईणबाईंना थोडेंच सांगतां येतें ? ती प्रसंगावधानपूर्वक वेळ मारून नेण्यासाठीं उत्तरलेली शिवरामला

ऐकूं आली, "गोठ्यांत गाईची पाडी आजारी पडली आहे. तिच्या औषधपाण्याचें बघायला सकाळीं ह्या घोळांत मुळींच फावलें नाहीं. आतां हें काम आटोपल्यावर घरीं जायला हवें मला. माझें वाढून ठेवलेंत तर सांजच्या वेळीं येऊन घेऊन जाईन."

शिवराम तें ऐकून मनांत म्हणाला, "कशाला पण? आज दुपारीं न सांगतांना जेवायलाच जाईन हिच्या घरीं..." बोलतां बोलतां त्यानें आपल्या नेसलेल्या पंचाच्या टोंकाला सकाळीं बाबदेवाची खिरापत तिच्यासाठीं मुद्दाम जपून बांधून ठेवली होती ती उगीचच हाताळून पाहिली.

असें शिवराम जिभेवर जमनाचें नांव घोळवीत आंत गेला. तों सदानंद आणि आबा मास्तर त्या भावणीच्या पोरगीबद्दलच बोलत असल्याचें त्याला ओझरतें ऐकूं आलें.

शिवनाकानें शिवरामला सांगितलें तें आंत सदानंदाला सहज ऐकूं गेलें. शिवराम जवळ येऊन विचारण्यापूर्वीच तो आबा मास्तरांना म्हणाला, "जा मास्तर! शिवाला सांगा, अगोदर देवळाकडे जा आणि त्या मुलीला नीट औषधपाणी काय तें कर. कुणाची कोण ती, आणि माझ्यासाठीं तिनें आपला जीव असा धोक्यांत घातला! तिची काळजी अगोदर घ्यायला हवी. —जा. सांगा त्याला."

शिवराम तें ऐकून 'शिवनाक गेला देखील' असें सांगत पडवीच्या दाराशींच थबकून उभा राहिला. सकाळीं घाटी उतरून येतांना सदानंदाला सर्पदंश झाला तेव्हां त्याला धरून जमनाच्या झोंपडीकडे नेतांना त्या दोघांच्या मनांत जी एक नाजुक कल्पना सदानंद व शांता यांच्या बाबतींत अंकुरली होती, त्या कल्पनेच्या अंकुराचें रोप चांगलें वाढून जुनावून आतां कळ्यांच्या बाजाला येऊं लागलें होतें.

महाराच्या शिवाशिवीचे कपडे बदलून झाले. आतां सदानंद सकाळीं आल्यापासून झोंपला होता ती पडवींतील जागा शुद्ध करून घेण्यासाठीं सोंवळ्यांतली धाबळी नेसून, तुळशीची मंजिरी आणि गोमूत्रानें भरलेलें फुलपात्र हातीं घेऊन पडवीकडे येऊं लागलेल्या देसाईणबाई सदानंदाच्या तोंडचे उद्गार ओझरते ऐकून ओटीच्या दरवाजाच्या आंतच थबकल्या.

त्या मुकाटपणें उभा असलेल्या शिवरामकडे त्यानें आपणाकडे पाहावें या हेतूनें पाहात होत्या.

कांहीं क्षण वाट पाहून अखेर देसाईणबाईंनीं आंतून शिवरामकडे पाहात हळूच शू: शू: आवाज केला. शिवराम भानावर येऊन तिकडे वळून पाहूं लागला. तेव्हां त्यांनीं त्याला आंत येण्यासाठीं हळूच हातानें खूण केली.

तो धनिणीच्या बोलावण्यासरसा आंत गेला. त्यानें ओळखलें कीं देसाईणबाई आतां सदानंद आणि शांता यांच्या जमूं घातलेल्या लाग्याबांध्याबाबत आपणाला विचारणार. तसें कांहीं विचारलें तर काय सांगायचें याचाही आराखडा आंत जातां जातां त्यानें आपल्या मनाशीं मुक्रर करून ठेवला. " या कानीं तुळस, या कानीं अंबाबाई. मला कांहीं माहीत नाहीं. "

●

दुपारीं बारा वाजण्याचा सुमार.

शिवनाक देवळाच्या आवारांतून मनांत देवाचें नांव घोळवीत आवारासभोंवारच्या गडग्याचा आडा ओलांडून भावणीच्या घराकडे जाऊं लागणार तोंच त्याला पळीपंचपात्रीचा किणकिण आवाज आणि त्याबरोबरच शंभो ऽ ऽ ऽ हा शब्दही ऐकूं आला. तो जागच्या जागींच थबकून देवळाकडे पाहात स्वत:शीं उद्गारला, " महाराजांची पूजा झाली वाटतें. "

इतक्यांत काजरघाटीवर देसायांच्या मांगरांत राहाणारा तो म्हातारा ब्राह्मण संगमनाथाच्या देवळांतील रोजची पूजा, आरती वगैरे आन्हिक आटोपून रोजच्या नियमाप्रमाणें देवाला एकवीस प्रदक्षिणा घालण्यासाठीं सभामंडपांतून बाहेर आला.

" महाराज ! " शिवनाकानें हात जोडून हांक मारली. पण लगेच तो मनांत भ्याला. प्रदक्षिणेच्या वेळीं म्हारड्याचा शब्द कानीं पडल्यामुळें महाराज चिडणार तर नाहींत ना ?

परंतु शिवनाकची वेळ चांगली होती. म्हातारा त्याच्यावर चिडला नाहीं.

म्हातारा ‘ चल ’ म्हणून त्याच पावलीं भावणीच्या घराकडे शिवनाकाच्या पुढें चालला. त्याला पाहून शांताच्या घरीं जमा झालेले लोक माणसाची चाहूल लागतांच शेतांतून रानांत पळ काढणाऱ्या कोल्ह्यांसारखे तिथून भुरुभुरु पसार झाले.

“ काय, मरायचें आहे कीं जगायचें आहे ? ” म्हाताऱ्यानें शांताला जवळ जाऊन विचारलें.

“ तुम्हीं जगवलें तर जगायचें आहे; मारलें तर मरायचें आहे. ” शांता कुशीला वळत उद्‌गारली.

शिवनाक तेवढ्यांत औषध तयार करून पानांतून गुंडाळून घेऊन आला. तो पुढें येऊन म्हणाला, “ हं ! हें औषध आतां घेशील तूं पाण्यांत कालवून ? ”

शांतानें अशक्तपणाचे उसासे टाकीत मान वळवून शिवनाकाकडे पाहिलें आणि उजवा हात पुढें केला.

“ उठशील का ? कीं हांक मारूं कुणाला तरी ? ” असें म्हणत शिवनाकानें गंगाराम देवळ्याच्या घराकडे तोंड करून हांक मारली, “ तारू ! ए तारू ! ”

शांता उठून बसण्याचा प्रयत्न करीत हातानें नको नको म्हणाली. तिला म्हाताऱ्यानें उठूं नकोस असें हातानें खूण करून सांगितलें.

“ मग तुम्ही देतां एवढें तिला पाण्यांत कालवून ? ” शिवनाकानें पानांत गुंडाळून आणलेली वाटलेल्या झाडपाल्याच्या औषधाची गोळी पुढें करीत म्हाताऱ्याला विचारलें.

“ नको नको. शिवा ! महाराजांना कां त्रास उगाच ? मी उठतें– ”

म्हातारा शांताचा अशक्त, क्षीण आवाज ऐकून तिला नजरेनें दटावल्यासारखें करीत हातानें खुणावून पुन्हा अंथरुणावर पडायला सांगत शिवनाकाला म्हणाला, “ ती तिथें कोपऱ्यांत करटी पडली आहे ती घे आणि औषध कालवून हिला पाज. ” शांतानें महाराच्या हातचें औषध प्यायला नाखूष असल्याची भावना चर्येवर दाखविली. ती त्याच क्षणीं ध्यानीं घेऊन म्हातारा पुढें म्हणाला, “ गाढव पोरगी ! जग तूं अजून

पाहिलें नाहींस. आम्ही भटांब्राह्मणांनीं, थोरामोठ्यांनीं, सावसावकारांनीं, खोत–देसाई–कुळकर्णी–मिराशांनीं तुम्हांला औषध नाहीं पाजायचें, विष पाजायचें. आणि त्या विषावर उतारा या अशा म्हारामांगांनीं द्यायचा." तो तसाच शिवनाकाकडे वळून म्हणाला, "अरे, खोळंबलास कां? जा ती करटी घे आणि तिच्यांत औषध कालवून हिला पाज. आजच्या मुहूर्तावर तुझ्या हातानें ह्या साऱ्या काजरोळी गांवाचें म्हारगोंदें होऊन जाऊं दे."

म्हाताऱ्याचा आदरयुक्त दरारा त्या गांवच्या अशिक्षित कुळवाडी–महार–चांभारांवर फार होता. शिवनाकानें मुकाट्यानें कोपऱ्यांतली करटी उचलून घेतली आणि वाटून आणलेलें औषध तिच्यांत तयार करून तें शांतापुढें धरीत म्हटलें, "हें घे. घुट्कन् पिऊन टाक. पाराभऱ्याच्या आंत गुण पडेल. कांहीं भिऊं नकोस. मरायची नाहींस तूं. मेलीस तर मी जिम्मेदार."

शांतानें नाखुषीनें पण म्हाताऱ्याला भिऊन शिवनाकाच्या हातून ती औषधाची करटी घेतली आणि वेडेंवाकडें तोंड करीत औषध पिऊन टाकलें.

"धाकट्या धन्याचें कसें आहे रे?" तिनें पदरानें तोंड पुशीत अंमळ हुशारीनें विचारलें.

"बरें आहे आतां." शिवनाक कांबळ्याचा लाटा उचलून खांद्यावर टाकीत जाण्याच्या तयारीनें उभा राहून म्हणाला, "जाऊं आतां? जरा जाऊन शांतूला बघून येतों असें धाकट्या धन्यांना सांगून मुद्दाम आलों, पिऱ्यानें आणलेला निरोप ऐकून." शिवनाक म्हाताऱ्याकडे वळून म्हणाला, "बाकी महाराज! आमच्या गांवावर आतां आमच्या देवाची कृपा आहे म्हणायची. नवे धनी अगदीं मायबापासारखे आहेत. नाहींतर कुठली कीड–मुंगीसारखी भावणीची पोरगी, तिची इतकी जिवाच्या जतनेनें काळजी करणारा धनी आमच्या गांवाला आजपोंतर कधीं मिळाला होता?"

"थांब, जरा थांब. थोडया सबूरीनें घे. सापाचें पोर आहे तें. तुमच्या बाबा देसायाचा मुलगा आहे तो. त्याच्या दाढेंत विष आहे कीं

नाहीं हें नुसतें वरवर बघून कसें कळणार रे ?" असें अद्वातद्वा बोलत म्हातारा पंचपात्रींतील पाणी संध्येच्या पळीनें पळी पळी वाटेवर टाकीत घराबाहेर पडला.

●

आज जमनाची देखील खात्रीच होती कीं आज माझा रावबा कितीही कामें असलीं तरी आकाशपाताळ फोडून देखील आपल्याकडे यायला विसरायचा नाहीं.

आपण आज दुपारीं येत असल्याचा निरोपही रावबानें जमनाची मैत्रीण व शिवरामची वडील विधवा बहीण सावित्री त्याला लिंगडाळ वाडींत हरिबा देवधराकडे कांहीं कामासाठीं गेलेली भेटली, तिच्या हातीं जमनाला पाठविला होता. जमना देसाईणबाईच्या घरचे कपडे वहाळावर धुतांना सावित्री तिला भेटली. तिनें निरोप सांगितला. मग काय ? जमनाचें मन सोनेरी पंखांच्या अत्चपळ पिंगाण्यासारखें अमूर्त, कल्पनारम्य अशा आज उद्यां वांट्याला येणाऱ्या संसारसुखाच्या आकाशांत भराऱ्या मारूं लागलें.

त्या पिंगाण्याचे पंख पहिल्याच भरारीला आडोशाला आपटून चुरल्यासारखे झाले खरे. तिच्या रावबा बिचाऱ्याला आज लिंगडाळवाडीला जाण्याचें प्रयोजन जेव्हां तिच्या शेजारणीकडून समजलें तेव्हां अगदीं पहिल्या क्षणीं तिनें आपल्या दूरच्या नात्यांतील पण नात्यापेक्षांही मित्रत्वाच्या आपुलकीनें जवळचे असलेल्या आबा मास्तरांवर डावपेंचांनीं ही घोरपड आणल्याबद्दल बापटशास्त्र्यांना मनोमन लाख शिव्या मोजल्या. रावबा बिचारे बेलीफ देखील तिचा प्रियकर व आज उद्यांचा तिचा कुंकवाचा आधार नसता तर त्यालाही शिव्याशाप द्यायला तिनें कमी केलें नसतें.

कुणाच्याही कामांत कसलीही मुळींच चालढकल न करण्याचा जमनाचा स्वभाव. देसाईणबाईचे कपडे तर ती रोज इतके स्वच्छ धुवायची कीं देसाईणबाईनीं ते पाहून कौतुकानें म्हणावें, परीट झक मारतात आमच्या जमनापुढें ! —पण आज रावबाच्या स्वागतासाठीं उतावीळ

झालेल्या जमनानें ते कपडे कसेबसे चालढकलीनें व्हाळाच्या पाण्यांत खळबळून चुबकून काढले आणि पिळून सावित्रीकडे देऊन म्हटलें, "एवढे देसायांच्या घरीं पोंचते करशील ? बाईनीं विचारलें तर म्हणावें जमनाला व्हाळावरच थंडी भरून आली. म्हणून कपडे माझ्याकडे देऊन ती घरीं गेली."

आपण येतांना देसाईणबाईना संध्याकाळीं वाढलें अन्न नेण्यासाठीं यायचें कबूल केलें आहे हें जमनाला तेवढ्यांत आठवलें. ती कपडे घेऊन जाऊं लागलेल्या शेजारणीला हांक मारून म्हणाली, "सावित्री ! इकडे बघ, म्हणावें दिवेलावणीच्या अगोदर ताप उतरला तर मी येईन तिकडे, नाहींतर उद्यां सकाळीं येईन म्हणावें."

सावित्री तें ऐकून मानेनें हो म्हणत हंसली. जातां जातां ती पुन्हा चार पावलें मागें वळून जमनाला हातानें खुणावीत जवळ बोलवून म्हणाली, "आणि देसाईणबाईनीं जर जमना औषधपाणी कुणाचें घेते आहे म्हणून विचारलें तर रावबा विचाऱ्याचें म्हणून सांगूं ना ?"

जमना हंसत हंसत सावित्रीच्या खांद्यावर लडिवाळपणानें एक चापट मारून घरच्या वाटेला लागली.

घरीं जातांना तिचें मन असें कानांत वारा शिरलेल्या वासरासारखें भरारत चाललें होतें कीं तिच्या पायाखालून एकदां एक जिवाणूं वळवळत गेलें, सांकवावरून जातांना सांकवाच्या एका बांबूच्या कांबेला तिचा पदर अडकून फाटला व त्या कांबेच्या बेळानें तिच्या उजव्या कुशीला ओरखडे निघून रक्त आलें, तरी त्याची तिला दादही नव्हती. घरीं जातांना तिची गाय व त्या गाईचें वासरूं दोघेंही चारीसाठीं ओरडून ओरडून घसा कोरडा करीत असलेलीं तिला ऐकूं आलीं. पण आज रावबा विचारे येणार, त्याच्या उठाबशीची म्हणजेच आपल्या पाटाच्या पुण्याहवाचनाची तयारी करण्याच्या नादांत तिला गाय कुठची आठवते आणि वासरूं कुठचें आठवतें !

घरीं जातांक्षणीं तिनें घरांत कालची शिल्लक असलेली चार गाय-वासराला घातली आणि जीव म्हणून जतन करून ठेवलेली पेंड काढून

फोडून गाईसाठीं चांगलें आंबोण तयार केलें. तिचा रावबा विचारे— तिचा इष्काचा सरदार देवा—धर्माला स्मरून तिच्यावर नवरेपणाचा हक्क गाजवून तिला सुखी करण्यासाठीं येणार. त्याच्यासाठीं ती सकाळीं न काढलेली गाईची धार काढणार होती.

आपला शिवराम तांबे धन्यांना घेऊन लिंगडाळच्या तिठ्यावरून माघारा येईल तेव्हां त्याला आवडणारें गाईचें ताजें दूध त्याला प्यायला द्यायचें या हेतूनें तिनें आज सकाळीं मुद्दाम गाईची धार काढली नव्हती. पण योगायोगच असा विचित्र कीं शिवराम तिला भेटला तो धन्यांना साप चावल्याच्या मरणघाईत ! त्याला ती गाईचें धारोष्ण दूध काढून केव्हां प्यायला देईल ?

शिवरामच्या वांट्याचें तें दूध आज जमनाच्या हातून रावबा विचाऱ्याच्या मुखीं लागणार होतें.

गाय आणि वासरूं यांना रानांत लावून आपलें आंगधुणें, स्वयंपाक-पाणी वगैरे सारीं कामें जमनानें भिंगरीच्या चालीनें चट चट आटोपलीं. मग तिला थोड्या दिवसांपूर्वीं रावबानें आणलेलें हिरवें लुगडें ती नेसली आणि त्या लुगड्याच्या रंगाला शोभेशी मुद्दाम रावबानेंच शिवून घेतलेली आभाळी रंगाची चोळी तिनें अंगांत घातली.

चोळीलुगडें आणून चांगले दोन आठवडे लोटले होते. पण आज-पावेतों तें चोळीलुगडें नेसून घराबाहेर पडण्याचा धीर जमनाला झाला नव्हता. तिला दोन महिने गेले होते हें एकट्या तिला माहीत; आणि पाटाची घाई करतांना तिनें हळूच गोड कारण सांगितलें म्हणून रावबाला तरी माहीत. जगाला त्यांतलें काय माहीत असणार ? आधीं मुळीं जमना आठ नऊ वर्षांपासूनची विधवा. शिवाय कासोट्याची इतकी खंबीर कीं तिच्याकडे वांकडा डोळा करून पाहाण्याची गांवांतील मी मी म्हणणाऱ्या गुंडांचीही छाती नव्हती. गांवचे लोक थोडेच उठल्या सुटल्या संशय घेऊन कावळ्याच्या नजरेनें तिच्या पोटाकडे दुर्बिण लावून पाहात बसले होते !

तथापि आज जमना त्या गांवगुंड कावळ्यांनाही भिईनाशी झाली होती. चोळीलुगडें घरांत आलें त्या दिवशींच रावबानें तिला तें नेसण्यासाठीं आग्रह केला होता. आणि ती तें नेसली नाहीं म्हणून तिच्यावर तो तेव्हां रागावलाही होता. तो त्याचा सारा राग आज धुऊन काढायचा अशा उमेदीनें जमना स्वयंपाकपाणी आटोपल्यावर तें चोळीलुगडें नेसली.

त्याच दिवशीं पाटाचें नक्की ठरवल्यावर रात्रीच्या वेळीं रावबानें बळें बळें ती नको नको म्हणत असतां मुद्दाम विकत आणलेल्या कुंकवाच्या डबींतलें कुंकूही तिच्या कपाळाला लावलें होतें.

पण तो दिवस वेगळा आणि आजचा दिवस वेगळा. आज रावबा आला कीं त्याला नवें चोळीलुगडें नेसून कुंकू लावलेल्या शुभ कपाळानें वाढायचें, हंसून खेळून त्याच्याशीं वागायचें, असे मनोरथांचे रम्य मनोरे रचीत जमनानें त्या दिवसापासून अडगळीसारखी देवाच्या कोनाड्यांत पडलेली ती कुंकवाची जस्ती डबी घेऊन उघडून तिच्यांतील कुंकू कपाळाला लावलें. आरसा तिच्या घरांत नव्हता. तिचा नवरा रघुनाथ राणे फांशी गेला त्या दिवशीं दुःखाच्या भरांत तिनें रघुनाथकडून तिला एकदां मुंबईंत मिळालेला आरसा अडगळींत टाकून दिला होता. तो कुठें आहे हें तिला नक्की आठवत नव्हतें.

ती बोटावर कुंकू घेऊन तशीच मागील दारीं परसांत गेली, आणि गोठ्यापाशीं गुरांना पाणी पाजण्याची बादली भरलेली होती त्या बादलींत रूप पाहून नीट कुंकू लावलें. ओक्या ओक्या कपाळावर कुंकवाची टिकली लावतांना तिला तिच्या मनोराज्यांत कुठून तरी दुरून–थांगपत्ता नाहीं इतक्या दूरच्या अवकाशांतून बिनआवाजाचे उद्गार ऐकूं आले, “कुणाची ग नावरस ही जमना! तूं आपल्या कपाळावर कोरते आहेस ती ? रामजीच्या रघूच्या मागें तूं मला बाबा मानीत आलीस आणि मी तुला लेक मानीत आलों. त्या तुझ्या ह्या मानलेल्या बाबाच्या–सदबा मेजाऱ्याच्या–घरादाराची जप्ती करणाऱ्या बेलिफाची बायको होते आहेस तूं ? ”

मनाविरुद्ध कांहीं झालें अथवा ऐकूं आलें कीं चट्कन दोन्ही कानांवर हात ठेवून तिथून पाय काढायची जमनाची खोड होती. कुंकू लावून

ती तशीच मनांतल्या मनांत किंचित् दचकल्यासारखी दोन्ही कानांवर हात ठेवून माघारी घरांत येतां येतां स्वतःशीं उद्गारली, " आतां रावबा आला म्हणजे त्याला सांगतें. कशाला करतो असली चाकरी कसायासारखी आम्हां शेतकऱ्यांच्या मानेवरून सुरी फिरवायला ? आम्ही हें एवढें एक शेत घेऊन घरीं केलें तरी त्यांत सोनें पिकवूं. धरती–माता देईल तें राजादेखील देणार नाहीं. उगीच शेतकऱ्यांचे शिव्याशाप घ्यायचे, त्यापेक्षां जळो ती चाकरी !..."

रावबा नोकरी सोडायला नाराज असला तर आपण कसें रुसून रागावून त्याला नोकरी सोडायला लावायची याविषयींचे बेत मनांत चितारीत तिनें ओसरी झाडून रावबासाठीं माच्यावर स्वतःच्या पांघरण्याच्या नव्या कांबळ्याची बैठक घातली. बाहेर अंगणांत सकाळीं सदानंदाला औषधोपचार करण्याच्या भरांत केरकचरा पडला होता तो झाडून साफसूफ केला. सदानंदाच्या पायाला सर्पदंशावर उतारा म्हणून शिवनाकानें लावलेलीं मरून पडलेलीं कोंबडीं त्यानें जातांना दूर फेकून दिलीं होतीं त्यांतली एक तिचीच कोंबडी कुत्र्यानें हुडकून आणून फाडून अंगणांत झाडाखालीं टाकली होती. त्या कोंबडीसभोंवार कोंबडीचीं पिलें आपली आई मेल्यामुळें चिव चिव असा आक्रोशाचा टाहो फोडीत नाचत होतीं. जमनानें ती उचलून पलिकडे शेतांत फुटलेली मेर बांधण्यासाठीं उकरलेल्या खड्डयांत टाकून वर माती लोटली आणि त्या कोंबडीच्या पिलांना मागीलदारच्या पडवींत नेऊन टोपलीखालीं झांकून ठेवलें.

स्वयंपाकपाणी वगैरे सारें अगदीं मनाजोगें आटोपून जमना बराच वेळ ओसरीवरच्या माच्याच्या एका कोपऱ्याला बसली होती. नेहमीं ती त्या माच्यावर ऐस पैस बसायची. किंवा दमून भागून आली तर गोणपाटाची शिवलेली उशी मानेखालीं घेऊन रेलायची. पण आज त्या शेजेची असली अमर्यादा करायची नाहीं; आज घरधनी घरीं येणार आहे, असें मनाला दटावीत व माच्यावर झोंपण्याची घरधन्याची मानाची जागा मोकळी सोडून ती माच्याच्या कोपऱ्यावर बसली होती.

बराच वेळ झाला तरी रावबा आला नाहीं म्हणून मनांत जरा हिरमुसली होऊन दरवाजांतून अंगणांतील झाडाच्या सावलीकडे पाहात

ती म्हणाली, "दिवस पारभर मावळायला गेला, तरी याचा पत्ता नाहीं! गंगारामनें, त्या भगवान घाडयानें सकाळच्या बकऱ्याच्या मेजवानीसाठीं बळेंच धरून ठेवलें असेल त्याला. आतां याला बोलवायला कुणाला पाठवूं?"

असें मनाशीं बोलत बोलत पदराच्या टोंकानें कपाळाचें कुंकू पुशीत ती शिवरामच्या घराकडे गेली. शिवराम कांहीं घरीं नव्हता. सावित्रीचा बाबू नुकता शाळेंत जायला निघाला होता. त्याच्यापाशीं तिनें निरोप सांगितला, "हें बघ, जातांना पोलीस पाटलाच्या घरीं जा. तिथें नीट विचार, रावबा विचारे आहे का?—त्याला म्हणावें जमनामावशीनें तुला घरीं येऊन जायला सांगितलें आहे. कासार्ड्याहून तुझ्या घरून निरोप घेऊन माणूस आला आहे म्हणावें." जमना म्हणाली.

"बरें." म्हणून बाबू शाळेंत गेला.

"शिवराम भेटला होता?" सावित्रीनें जमनाला विचारलें.

"नाहीं. सकाळीं भेटला तेवढाच. पण बोलायला वेळ कुठें मिळाला? किती वेळ मी त्याची वाट बघत होतें. काल गांवाहून आल्यापासून मला भेटला नाहीं. भेटला म्हणजे त्याला विचारणार आहें, इतका कां विसरलास?" जमना उद्गारली.

"कांहीं बोलूं नकोस त्याला."

"कां? बोलूं कां नको?"

"तुझ्या पाटाची गजाल त्याच्यापाशीं अजून बोलली नाहींस वाटतें तूं?"

"नाहीं बोलल्यें. म्हणून तर त्याला रावबाच्या पंगतीला जेवायला बोलावलें होतें. कां आला नाहीं नकळे."

"त्याला वाईट वाटलें असेल, तूं आतां पाट लावून तुझ्या घरीं जाणार आणि मग आपणाला गांवांत 'येरे, जारे' करून आपली माये-ममतेनें विचारपूस करणारें कोणी नाहीं म्हणून."

"कां, शिवराम कांहीं म्हाणाला?"

"नाहीं. पण मीच त्याला जेव्हां म्हटलें जमना आतां पाट लावून जाणार आहे म्हणून, तेव्हां एकदम आभाळाच्या सावलीनें झांकल्यासारखें गोरेंमोरें तोंड केलें त्यानें."

इतक्यांत आबा मास्तरांनीं हांक मारलेली जमनाला ऐकूं आली. त्यासरसा त्या दोघींचा तो विषय तेवढ्यावरच राहिला.

आबा मास्तर आलेले पाहून जमना मनांतल्या मनांत ओशाळली. त्यांच्या घरावर जप्ती नेणाऱ्या रावबाची ती बाईल होणार होती !

आबा मास्तरांच्या तोंडून त्यांच्या घरादारावर आज जप्तीचा नांगर कसा फिरला तें जमना व सावित्री या दोघींनींही जेव्हां ऐकलें, तेव्हां त्यांना नुसतेंच वाईट वाटलें नाहीं; अतिशय राग आला.

चांगले दोन तास आबा मास्तर त्या दोघींना आपली शोककथा सांगत होते आणि अंतःकरणांत पेटलेला सर्वनाशाच्या संतापाचा वणवा आपल्या दुःखाश्रूंनीं विझवीत धुमसत मुसमुसत होते.

" देव पाहून घेईल त्यांना. " असें वैतागानें उद्‌गारत ते सदानंदाच्या समाचारासाठीं देसायांच्या घरीं निघून गेले, तेव्हां दोन घटका दिवस मावळायचा उरला होता.

गढूळ पाण्यांत प्रतिबिंब पाहावें तशी जमना आबा मास्तरांच्या शोककथेनें तळापासून ढवळून निघालेल्या आपल्या गढूळ मनोवृत्तींत आपलें आणि रावबाचें गढूळलेलें, सांकळलेलें प्रतिबिंब पाहात घराकडे परतली. रावबा आला असला तर आपण घरांत नाहीं असें पाहून नवऱ्याच्या ऐटीनें रागावेल ह्या भीतीनें ती घाईघाईनें बोलतां बोलतां मधेंच दचकून उठून सावित्रीच्या घराबाहेर पडली, तेव्हां सावित्रीचे नागिणीच्या फुत्कारासारखे शब्द तिच्या कानीं आले, " मी जीव गेला असता तरी असल्या माणसाची बाईल झाल्यें नसत्यें. बेलीफ झाला म्हणून काय झालें ?—शेतकरी ना तूं ? कर्जाच्या पैशाचें शेण खाऊन त्या कर्जांत बायको मिळवायची ती मिळव म्हणावें खुशाल. म्हणून काय तेवढ्यासाठीं कुळांच्या घरादारावरून नांगर फिरवायला सावकाराचा लेकावळा होशील ? "

ते शब्द जमनाच्या जिव्हारीं झोंबले. " रावबा थोडासा चुकला हें तर खरेंच. पण—" ती म्हणाली, " यांनीं तरी इतकी कशाला पाखडायची

त्याच्यावर आग ? माझ्या रावबाला मी बोलेन, मी रागावेन. मलादेखील असल्या गोष्टी मुळींच आवडत नाहींत. आतां येऊं दे त्याला..."

असली अघोरी चाकरी सोडल्याखेरीज मी तुझी बाईल व्हायला तयार नाहीं अशा उत्तराचें तीक्ष्ण शस्त्र तिनें मनांत क्षणभर परजलें व दुसऱ्या क्षणाला त्या शस्त्राच्या पात्याचें तिखट पाणी पाहून ती भ्याली. तें शस्त्र भयचकित कांपऱ्या अंतःकरणानें बाजूला टेवीत ती स्वतःशीं म्हणाली, "चाकरी सोडल्याखेरीज माझ्या अंगाला हात लावशील तर आई–बहिणीच्या अंगाला हात लावशील अशी आण घालून मी त्याला..."



सूर्य अस्ताला गेला. मावळत्या सोनेरी सूर्यकिरणांनीं उजळून निघालेले वाटेवरचे झाडांचे शेंडे सूर्यास्तामुळें त्या उजाळ्याला मुकून जमनाच्या खट्टू होऊं लागलेल्या मनासारखेच खट्टावलेले दिसत होते. मनांतल्या बऱ्यावाईटाच्या, सुखदुःखाच्या संधिप्रकाशांत गोंधळल्यासारखी जमना त्या मावळतीच्या संधिप्रकाशांतून घराकडे चालली.

ती नदीवरच्या सांकवाच्या तोंडाशीं आली तेव्हां तिच्या भाजलेल्या मनाला उगीचच भय वाटलें, हा सांकव मोडून मी व्हाळांत पडायची नाहीं ना ?

तिनें सांकवावरून जातांना पायाखालीं नदीच्या पात्राकडे सहज पाहिलें मात्र, तों नेहेमीं या उन्हाळ्याच्या दिवसांत क्षीण संथ प्रवाहानें वाहणारी ती मरतुकडी नदी तिला गिळून टाकण्यासाठीं जबडा पसरून टपलेल्या अक्राळ विक्राळ मगरीसारखी वाटली.

तशीच भीत भीत ती सांकव ओलांडून पैलतीराला गेली. तों समोरून तिला शिवराम येतांना दिसला. तो तिच्याजवळून चालला होता; पण तो नेहेमींसारख्या प्रसन्न वृत्तीनें तिच्याशीं बोलण्याच्या मनस्थितींत नव्हता.

त्यानें आपल्याशीं बोलावें म्हणून ती उत्सुकतापूर्ण आशेनें हंसऱ्या मुखानें त्याच्याकडे पाहूं लागली. मनांत गुदगुदल्या होत म्हणूं लागली, "यानें माझ्याशीं अगोदर बोलावें."

पण शिवराम तिच्याशीं कांहीं न बोलतां लांडग्याच्या लचकेतोडीनें जायबंदी झालेल्या दीनवाण्या बकऱ्यासारखा खिन्न मनानें खालीं मान घालून चढूं लागला. चढून जातां जातां त्यानें सद्र्याच्या खिशांतली खिरापत काढून नदींत फेंकली.

शेवटीं जमनानेंच अधीर होऊन त्याला विचारलें, "कां रे? कुठें गेला होतास?"

शिवराम त्यावर कांहीं उत्तर न देतां नुसती होय नाहीं अशी दोन-तीनदां मान हलवीत सांकवावर क्षणभर रेंगाळला.

तिन्हीसांजांची वेळ रात्र वाट चालत असल्याचें सांगूं लागली.

या अशा कातरवेळीं शिवराम काजरघाटीच्या रानांत यायचा तर सकाळीं रानांत चरायला सोडलेलीं गुरें शोधून वर आपल्या मांगरांत नेऊन बांधण्यासाठीं.

"घां? पाडीबिडी चुकली कीं काय परवांसारखी पुन्हा?" जमनानें शिवरामकडे पाहात विचारलें.

अंतःकरणांत माजून राहिलेल्या दुःखमय भावनांच्या तुंबळ युद्धाकडे क्षणभर बळेंच कानाडोळा करीत शिवराम घोगऱ्या स्वरानें म्हणाला, "पाडी नाहीं चुकली—"

"तर?"

डोळ्यांत तरळूं लागलेलीं आंसवें आंतल्या आंत गिळण्याची शिकस्त करीत शिवराम उद्‌गारला "पाडी नाहीं चुकली, माझी गाय चुकली होती."

"मग? सांपडली नाहीं? शोधायला येऊं?"

"नको, सांपडली."

"मग? डगरीवरून पडून पायबीय मोडला कीं काय तिचा? कुठें आहे ती? मांगरांत नेऊन बांधलीस?"

"मला नाहीं सांपडली; वाघटाच्या जबड्यांत सांपडली! इतके दिवस तिच्यासाठीं जिवाचें रान केलें तें सारें फुकट!"

तेव्हां कुठें जमनाच्या डोक्यांत थोडा प्रकाश पडला.

. तो डाव्या हातानें डोळे पुशीत सांकवावरून जाऊं लागला. तेव्हां ती त्याला म्हणाली, " अरे ! जाऊं नकोस. थांब. इकडे ये जरा. "

" कशाला ? " असें विचारीत शिवराम तिच्याकडे पाहून थबकला.

" सकाळीं तूं म्हणालास माझ्या कानांत येऊन, तें संध्याकाळीं मला काय सांगणार होतास ? सांग ना ! "

" सांगणार होतों तें सारें संपलें आतां. "

जमना थरारत्या अंतःकरणानें सांकव चढून जाऊन त्याचा हात आपल्या हातीं धरीत म्हणाली, " असें काय करतोस रे ? चल माझ्या घरीं. "

" तुझ्या घरीं ? कुठें आहे तुझें घर ? वाघटाच्या जबड्यांत सांपडलेल्या गाईला घर आणि गोठा असतो ? सोड माझा हात. " असें तोंडानें म्हणत पण दुबळे आढेवेढे घेऊन तिच्याबरोबर चालत शिवराम म्हणाला, " आपण आतां आजपासून एकमेकांपासून दूर दूर राहायला हवें. आतां तूं दुसऱ्याची बाईल. माझ्यासारख्या परक्या माणसाला रावबा आपल्या बायलेची आठवण कशी करूं देईल ? रघुनाथ माझा जुळ्या भावापेक्षांही अधिक जवळचा मित्र होता. म्हणून तो मेल्यावर देखील त्याच्या बायकोवर आपलेपणानें मायेममतेचा हक्क सांगत होतों.— "

" तो हक्क तुझा अजूनही माझ्यावर आहे शिवराम !—" तोंच जवळच्या आंब्याच्या झाडावर कोकिळा कुहूऽकुहूऽ करूं लागली. तिकडे जमना निमअंधाऱ्या अवकाशांतून नजर टाकीत शिवरामला म्हणाली, " ऐक. देव बोलतो आहे कोकिळेच्या तोंडानें. मी खोटें नाहीं सांगत तुला. चल, घरीं चल आणि तुला आज इतकें वाईट कां वाटतें तें अगदीं काळीज उघडें करून मला सांग. नाहीं सांगशील तर आण आहे तुला माझ्या गळ्याची ! "

शिवराम पुन्हा गहिंवराची नवी लाट कंठीं दाटून आल्यासारखा मेरेवरच्या वाटेवर रेंगाळत उभा राहिला. उजव्या हातानें तिला हलकेंच जा, जा, असें सांगत तो जोराचे हुंदके देत पुन्हां मागें वळूं लागला.

" नाहीं ना ऐकत माझें तूं ? माझ्या गळ्याची आण मोडून जाणार ना ? जमनाच्या मुडद्याची पाऊलवाट करून त्या वाटेनें आपल्या घरीं जायला तुला फावेल ? इतका धीर होईल तुला ? जा तर. जा, आज जमना मेली, तिच्या नांवानें घरीं जातांना नदींत बुडी मारून जा ! माझें नको ऐकूं. " एवढें बोलून जमना धडधडत्या उरानें डोळ्यांना पदर लावीत आपल्या झोंपडीकडे वळली. कुणीतरी आपलें अंतःकरण कांटेऱ्या कुंपणावरून फरफटत ओढल्यासारख्या वेदना तिच्या मनाला होऊं लागल्या. पावलागणिक ऊर वाढत्या हबक्यानें धडधडूं लागला. हुंदक्यांच्या पुराला नव्या जोरदार हुंदक्यांचा मोठा लोंढा येऊन मिळाला. जातां जातां तिनें मुसमुसत आशेला आलेल्या रडव्या दृष्टीनें एकवार मागें वळून पाहिलें. तों शिवराम हळू हळू पावलें टाकीत मागाहून येतांना तिला आढळला. मग तिनें मुद्दामच मागें वळून न पाहातां झप झप पावलें उचलीत झोंपडी गांठली.

तिनें झोंपडीचें दार उघडलें तेव्हां शिवराम तिच्या उजवीकडे दोन हातांवर पागोळ्यांखालीं येऊन उभा होता. तिनें त्याला पाहूनही न पाहिल्यासारखें केलें आणि दाराची कडी काढली. पडवीच्या जळमटलेल्या कोनाड्यांत कडू तेलाची समई होती. तिच्यांतील वात डाव्या हाताच्या बोटानें तिनें पुढें सारली. वातीचा गुल चिमटीनें चुरडून टाकून तिनें समईजवळची आगपेटी घेऊन एक काडी शिलगावली आणि समई पाजळली. समईच्या प्रकाशांत शिवराम आंत येऊन दाराच्या पाठीमागें उभा असलेला तिला आढळला.

" उभा कां तूं ? इतकें अगदीं परक्यासारखें आज तूं कां वागतोस रे ? बैस ना माच्यावर. "

शिवराम माच्याच्या एका कोपऱ्याला बसून जमनाकडे केंविलवाणा पाहात उद्गारला, " आतां परक्यानें तुझ्या घरांत परक्यासारखेंच आपली पायरी ओळखून वागायला हवें जमना ! परका रोजच्यासारखा, घरच्यासारखा वागूं लागला तर त्याला आतां तूं घरांत थारा द्यायची नाहींस. देशील ? — "

शिवरामच्या त्या सूचक शब्दांतील सूचक अर्थ ध्यानीं घेऊन बावरलेल्या हरिणीच्या नजरेनें जमना टकटक पाहूं लागली.

" तुमचें ठरलें होतें तर माझ्यापाशीं तरी तूं बोलायचें होतेंस. मी तरी तुझ्या वाईटावर टपलेला माणूस नाहीं एवढें तुझ्या ध्यानीं यायला हवें होतें. " शिवराम म्हणाला.

" होय. तेवढें माझें चुकलें खरें. मी कां चुकलें आणि कशी चुकलें हें सांगून काय करायचें आहे ? पण गेला पंधरवडाभर तूं तरी कुठें होतास रे गांवांत तुला सांगायला ? तूं गांवीं असतास, भेटला असतास तर तुझ्यापासून मीं कांहीं चोरून ठेवलें असतें असें तुला वाटतें ? माझीं माणसें मेल्यापासून या भकास उघड्या जगांत मला तुझ्याशिवाय दुसरा कुणाचा रे आधार आहे ? मी एकदां जिवाला कंटाळून जीव द्यायला निघालें होतें—आठवतें तुला ? माझीं माणसें फांशीं गेलीं त्या दिवशीं वैतागून जीव द्यायला निघालेल्या या जमनाला वांचवायला तूंच आडवा आलास ना ? आणि मला तेव्हां जगवून फिरून या दुःखानें भरलेल्या जगांत हे असले कष्ट उपशीत जगायला लावलेंस. कां जगवलेंस तूं मला तेव्हां ? मी मेलें असतें तर काय जग बुडालें असतें ? आणि आज जरा कुठें या दुःखानें रखरखलेल्या जगांत निवाऱ्याची सावली मिळवायला बघतें आहें, अशा वेळीं तुला दुःखांत पाहून सुखाच्या वाढल्या पानावर बसायला मला तरी बरें वाटेल कां रे ? तूंच सांग. सारा जन्म इतके हाल भोगल्यावर देखील आज मी जरा सुखाच्या सावलीला बसूं नये असें का तुला वाटतें ? "

" तसें वाटायला मी तुझा कोणी दावेदार का आहें जमना ? "

" दावेदार असतास तर माझ्या मनाला तेवढें लागलें नसतें. बकासुरासारखा टाळा पसरून मला गिळायला बसलेल्या या अक्राळविक्राळ भयाण जगांत मायेममतेचा आधार असा एकटा तूंच असतांना असें बोलतोस म्हणून इतकें वाईट वाटतें. " जमना डोळ्याला पदर लावून हुंदका देत उद्गारली.

" खरें हें ? " जमना त्या प्रश्नासरशीं आपल्या नजरेला नजर भिडवूत अगतिकतेनें पाहूं लागलेली पाहून शिवराम म्हणाला, " जगांत तुला तुझा मायेममतेचा माणूस एकटा मीच ? देवाला आठवून सांग. "

" एकटा तूंच. " हुंदके गिळीत जमना उद्गारली.

" रावबापेक्षांही ? "

" होय. " जमना जोराचा हुंदका देत पुन्हा पदरानें डोळे पुशीत उद्गारली, " तूं काय विचारतोस तें मला कळलें. हें बोलायला अगदीं साताजन्मांच्या दावेदारासारखा आजच कां रे येऊन तूं माझ्यापुढें उभा राहिलास ? दूध नाहीं तर नाहीं, ताकाचें पाणी पिऊन तरी मी दुःखांतला जीव सुखांत घालीन म्हणतें ते देखील तुला पाहावत नाहीं का रे ? चांडाळा! तसें तुझ्या मनांत होतें तर इतके दिवस कां दांतखिळी बसल्यासारखा गप्प होतास—? " पुढें तिच्या तोंडावाटे शब्दच उमटेना इतका जोराचा गहिंवराचा लोंढा तिच्या कंठीं दाटून आला.

" मी गप्प होतों, कारण मला बोलायला तोंड नव्हतें. तुला आणि मला, दोघांनाही उभा जन्म जिवाला जीव देऊन सुखांत काढतां येईल अशी कांहीं तोड सांपडेना म्हणून—बोललों तर रागावणार नाहींस ना तूं ? "

" नाहीं रागावणार. बोल. " जमना उजव्या गुडघ्यावर उजव्या तळहाताच्या आधारानें मान टेंकीत एक उसासा सोडून म्हणाली.

" तसें पाहिलें तर, जमना! आपण दोघेंही एकाच जात्यांत उभा जन्म भरडलीं जात आहों. नाहीं का? या इथें बसून आपण बोलतों आहों त्या ह्या एका शेतापायींच आपण किती हाल भोगतों आहों बरें ! आम्हां कुळांना—माणसासारखीं माणसें आम्ही असतांना आम्हांला माणसांसारखें जगूं द्यायचें नाहीं अशा हट्टाला पेटून देसाई धनी आमच्या हात धुऊन पाठीला लागला तो ह्याच शेतापायीं. ह्याच शेतापायीं माझा बाप फांशीं गेला, तुझा नवरा फांशीं गेला, तुझा लहानगा शंकर बळी पडला, आणखी कित्येकांचें तुझ्यामाझ्यासारखेंच समूळ वाटोळें झालें आहे ह्या शेतापायीं. आत्तां मला तूं एक आठवण दिलीस तशी मी एक आठवण देतों. रघूच्या बाराव्याचा तो दिवस आठवतो तुला ? याच व्हाळावर त्या

तिथें, पलिकडे वाळूंत फणसाच्या झाडाखालीं बाराव्या दिवशीं पिंडाला कावळा शिवेना तेव्हां मीं रघूला काय शब्द दिला तो तुला आठवतो?" जमना अश्रूंनीं डबडबून आलेल्या नजरेनें पाहूं लागली तेव्हां त्या दुःखमय आठवणीच्या आंचेनें होरपळल्यासारखी चर्या करीत तो पुढें म्हणाला, "कावळा नुसता काव काव करीत, पिंडाकडे पाहात फणसाच्या खांदीवर बसला होता. त्याला हांक मारून मीं तेव्हां वचन दिलें कीं,—जमनाला मी जगांत उघडी पडूं द्यायचा नाहीं. ज्या शेतापायीं जमनाच्या उभ्या संसाराचा असा मांडव झाला त्या शेतांतून जमनाला बाहेर जाऊन वण-वण फिरायला मी लावणार नाहीं.—असें मी बोललों, तेव्हां कावळा पिंडाला शिवला. आठवण आहे तुला?"

जमनाच्या नेत्रांतून त्या आठवणीसरशा मुसळधार पावसाच्या सरी-सारख्या अश्रुधारा घळघळ वाहूं लागल्या. त्या अश्रूंनीं तिच्या दोन पावलांमधली पायांखालची पायरीची वीतभर जागा भिजून ओलीचिंब झाली.

"खोटें नाहीं सांगत मी." तो म्हणाला.

जमना उसासत मान डोलवीत उद्गारली, "खोटें नाहीं म्हणत मी. मेलें तरी मी तुला खोटा नाहीं म्हणायची. पण मग तूं इतके दिवस यांतलें अवाक्षर देखील माझ्यापाशीं कां रे बोलला नाहींस?"

"मी बोललों नाहीं,—अगोदर बोललों नाहीं याचें कारण तेव्हां माझ्या मनांत तसला कसलाच विचार नव्हता. रघुनाथ मला माझ्या वडील भावासारखा—त्यापेक्षांही माझा आवडता मित्र होता. मित्राच्या पश्चात् त्याच्या बायकोला कांहीं उणें पडूं द्यायचें नाहीं, आपण जगांत अपंग आहों असें वाटूं द्यायचें नाहीं एवढेंच मी म्हणें. तुला खरेंच सांगतों जमना!—" तेवढ्यांत माथ्यावर कैंबळ्याच्या वळचणींत पाल चुकचुकली.

तो पालीकडे क्षणभर नजर टाकून म्हणाला, "सत्य, सत्य, सत्य. मी बोललों तें अगदीं खरें आहे. माझ्या बायकोनेंही कधीं संशय घेऊन तुम्ही जमनाची इतकी काळजी कां घेतां असें कधीं विचारलें नाहीं. उलट ती मला सांगायची, जमना रंडकी आहे. दांव्याला उपाशी डांबून

पडलेली गरीब गाय आहे ती. रघू मेला या दुःखाची आठवणही आपण तिला होऊं देतां कामा नये. नाहीं म्हणायला मरतांना बरीक तिनें माझा हात हातीं घेऊन सांगितलें.—"

तोंच शिवरामला महापुरासारखा शोकाचा अनावर हुंदका आला. त्या लोंढयांत त्याच्या जिभेवरचे पुढील अपुरे शब्द पार वाहून गेले. तो दोन्ही हाताच्या पशांत तोंड व डोळे झांकून घेऊन ओकसाबोकशी रडूं लागला.

"काय सांगितलें तुला साळूनें मरते वेळीं सांग मला." जमनानें दोन्ही हातांच्या तळव्यानें डोळ्यांतील अश्रूंचा पावसाळा निपटीत पायरीच्या टोंकाकडे सरकत वर मान करून शिवरामकडे पाहात विचारलें, "सांग मला. काय म्हणाली मरतांना साळू ?"

साळूच्या आठवणीवर विराजित झालेला तोच प्रश्न तिचे शोकविव्हल डोळे विचारीत होते. पावन होण्यासाठीं तीर्थावर चाललेल्या यात्रेकरूंसारखे कान त्याच प्रश्नाचें उत्तर ऐकण्यासाठीं व्याकूल आतुरतेनें टवकारले होते. तिचा उजवा हात तोंच प्रश्न विचारीत प्रश्नचिन्हाच्या पवित्र्यांत शिवरामकडे ओळंबला होता. तिचें शरीर आणि मनही जणूं काय सहस्रमुखांनीं त्याच प्रश्नाचा हरिजागर करीत त्याच्याकडे ओढ घेऊं लागलें होतें.

शिवराम कांहींच बोलत नाहीं असें पाहून जमना अधिकच खिन्नावली. गहिंवरल्या घोगऱ्या स्वरांत ती त्याला पुन्हा म्हणाली, "बोलत कां नाहींस तूं शिवराम ? बोल. सांग ना. माझी साळू मरतांना मला काय म्हणाली तें सांग. माझ्या गळ्याची आण आहे तुला न सांगशील तर. नाहीं सांगितलेंस तर मी मरेन हं ! मग ह्या जमनाला तूं मुकशील—खरेंच सांगतें मी. तूं नाहीं सांगितलेंस तर मी खरोखरच—खरोखरच मरून जाईन. मग माझी जमना मेली म्हणून रडत बसलास तरी काय होणार आहे ? —नाहीं सांगत तूं मला ?"

"नाहीं." शिवरामनें मानेनें सांगितलें. थोडा वेळ स्तब्धपणें स्वतःशीं कसला तरी विचार करून तो म्हणाला, "त्या गोष्टी आज

बोलायच्या नाहींत आतां. बोलायची ती वेळ निघून गेली. आतां मी मरेपावेतों ती गजाल बोलायचा नाहीं, आणि तूंही विचारतां नये. असें बघ, आपलें तान्हें पोर मेलें म्हणजे मसणांत नेऊन खळगा खणून मातींत नाहीं गाडीत त्याला ? तशीच ती गोष्ट आतां आपण मनांत खळगा खणून त्या खळग्यांत उभा जलमभर गाडून टाकली पाहिजे. नाहीं तरी आतां आपण एकमेकांपुरतें एकमेकांना मरायलाच हवें. उद्यां परवां, तुझा पाट लागल्यावर तुला रावबा बरा माझ्याशीं नेहेमींसारखें बोलूं चालूं देईल ? "

" कां देणार नाहीं ? आपण काय कुणाची चोरी केली आहे ? पाटाचा नवरा आजचा उद्यांचा. पण जिवाचा मित्र तूं माझा जन्माचा आहेस. तें नातें आपणाला कसें तोडतां येईल ? "

इतक्यांत आंत स्वैपाकघरांत कसला तरी भांडें पडल्यासारखा आवाज झाला. फुटक्या ढोलकीसारखा तो आवाज ऐकून जमनाला वाटलें, चुलीवरचें दुधाचें गाडगें तर मांजरानें पाडलें नाहीं ? ती तशीच उठून अंधारांतून आंत गेली. तों खरेंच, चुलीवरचें दुधाचें गाडगें सांडून मांजर पळून गेलें होतें. सकाळचें शिवरामच्या वांटणीचें तें दूध राव-बाच्या मुखीं न लागतां असें सांडून गेलें !

जमनानें तें पाहिलें पण तिकडे फारसें लक्ष दिलें नाहीं. ती तशीच अंधारांतून चुलीपाशीं दिवादेखील न लावतां बाहेर आली व झोंपडीच्या दाराबाहेरील ओट्यावर दाराशींच जाऊन कपाळ धरून बसली.

" जमना ! आपलें तें नातें आपणांला तोडतां आलें नाहीं तरी आतां तोडलेंच पाहिजे. त्याखेरीज गत नाहीं. " असें उद्‌गारत शिवराम घराकडे जाण्यासाठीं म्हणून झोंपडीच्या दाराकडे वळला.

" कुठें चाललास ? " जमनानें वर मान करून त्याच्याकडे पाहिलें व त्याला अडवण्यासाठीं उजव्या हाताचा आडसर त्याच्यापुढें आडवा धरीत विचारलें,

" जाऊं दे मला. " शिवराम तिचा हात हळूच उचलून बाजूला करीत आंगणांतल्या पायरीवर पाय टाकीत म्हणाला.

" देवाघरच्या भाकितांच्या—ललाटलेखांच्या गोष्टी असतात ह्या, नाहीं रे शिवराम ? हेंच तूं अगदीं पूर्वीं जर बोलला असतास तर किती रे चांगलें झालें असतें ! निदान आज तें मुळींच कांहीं न बोलतास आणि जमना मेली असें समजून तिचें नांवदेखील विसरला असतास तरी बरें झालें असतें. "

" म्हणून तर सावित्रीनें दुपारीं ती बातमी सांगितल्यावर मी तुला आज भेटायचें टाळीत होतों. " शिवराम आपल्या नेहेमींच्या लकबीप्रमाणें विचाराच्या भरांत जिभेच्या टोंकानें वरचा ओठ ओलावीत म्हणाला. तोंच घाटीच्या वाटेवरून चूड घेऊन कोणीतरी येत असल्याचा भास त्याला झाला. तो दोन पावलें पुढें जाऊन वाकून पाहूं लागला. जमनाकडे वळून पाहात तो म्हणाला, " मावशी कशाला येते आहे इकडे ? शेतांत गुरें शिरलीं कीं काय ? "

" कोण ? सावित्री आली ? " जमना दोन्ही हातांनीं भरभर पदर हातीं घेऊन गालावरचे आंसवांचे ओघळ पुशीत आपल्या आणि शिवरामच्या त्या प्रसंगावर पडदा टाकीत उठून मान दुरावून पाहूं लागली.

" धनी तसा धन्याचे बैल ! दिवसा आणि रात्रीं देखील आपले गांवावर चरायला मोकळे सोडलेले. गुराच्या गळ्याला दावें म्हणून लावायचें नाहीं. दोन कुणग्यांतील भात खाऊन फस्त केलें त्या बैलानें ! तरी शांतूला मी सांगत होतों मुळांतच, कीं तूं शेत करूं नको. हे लोक शेतांत तुझी मान कांहीं वर होऊं द्यायचे नाहींत. असें स्वतःशीं रागारागानें बडबडत एका हातांत तागाच्या जोख्यांची चूड आणि दुसऱ्या हातांत बारीकशी काठी घेऊन सावित्री पुढें आली.

" काय ग सावित्री ? " जमनानें अंगणांतल्या आंब्याखालीं जाऊन सावित्रीला हांक मारली.

" कोण जमना ? "

" कुठें निघाली होतीस इतक्या रात्रीची ? "

" अग ह्या गुरांनीं भावणींच्या शेताचा खाऊन खाऊन कसा फडशा पाडला आहे बघ ना ! "

" आज शिरलीं पुन्हा गुरें शेतांत ? " जमना उंच मान करून दूरवर पाहात म्हणाली.

" तो घाड्याचा पाडा आणि धनगराकडे पोसायला दिलेला बैल, अगदीं मुलखाचे चोरटे आहेत. पुरुषभर उंचीचे गडगे देखील कसे अलग उडून जातात.—"

इतक्यांत जमनाच्या झोंपडीच्या मागच्या बाजूला गुरांची चाहूल लागली.

" गाय सुटली वाटतें ! " असें म्हणत जमना तिकडे वळते तोंच एक रेंडा तोंडांत केळीचा कोंवळा कासंब्रा धरून चघळीत चाललेला तिला आढळला.

" मेल्या ! फटकी भरली तुझ्यावर ! " अशा शिव्या हासडीत जमना वळचणीचें दांडकें घेऊन त्या रेड्यावर धावली. तोंच रेडा मारक्या नजरेनें एकवार तिच्याकडे पाहून पळत सुटला.

" काय माजला आहे ! कसा पट्टीचा चोर आहे ! जसा पोलीस-पाटील तसा त्याचा रेडा ! म्हार एकदां मारून कां खात नाहींत त्याला ? " जमना अधिकच संतापून उद्गारली.

" थांब. मी त्याला शेताबाहेर पिटाळून येतों. " असें म्हणत शिवराम जमनाच्या हातांतलें दांडकें घेऊन रेड्यामागें धांवला.

" अरे ही चूड घे ना ! अंधारांतून जाशील, आणि—"

तोंच घाटीच्या वाटेवरून जमनाच्या झोंपडीकडे येणाऱ्या शिवा महाराचा आवाज ओळखून सावित्री बोलायची थांबली. ती जमनाला हातानें गप्प राहाण्याची खूण करीत आपणच पुढें चालली.

शिवा महार स्वतःशींच बोलत होता, " अरे पोलीस पाटील झाला म्हणून काय झालें ? गांवचा राजा असला तर आपल्या घरचा. आमच्या पोराच्या अंगाला हात कां म्हणून लावावा त्यानें ? आम्ही गरीब भिकारडे पडलों म्हणून ?..."

" दुनिया ही अशीच आहे बाबा ! थोरामोठयांची श्रीमंतांची दुनिया आहे ही. या दुनियेंत आम्ही गरीब हे पानपाचोळ्यासारखे ! धनगर बकरीं

वरीसभर जतन करून पाळतो तो या तालेवार लोकांना गौरीगणपतीच्या किंवा मोहरमच्या सणांत कापून खायला मिळावें म्हणून. नाहींतर आज घाड्यानें भावणीसाठीं बकरा बळी दिला तसें बळी कापतां यावें म्हणून.”

बोलत बोलत उस्मान आपला चुकलेला नवा बैल शोधण्यासाठीं घाटी चढून गेला. शिवा जमनाच्या झोंपडीकडे आला.

●

“ काय झालें रे शिवा ? ” सावित्रीनें अंगणाच्या तोंडाशीं येऊन विचारलें. “ आज अगदीं खळ्या खणणाऱ्या वाघासारखा ह्या वाडींत फिरतो आहेस ! आहे काय तुझ्या मनांत ? ”

सावित्रीचें बोलणें मनावर न घेतां शिवनाक आपल्याच विचाराच्या तंद्रींत म्हणाला, “ सारा देश पेटला आहे म्हणावें, गांधीबाबांच्या हांकेनें खडबडून जागा झाला आहे. देशभर लोक आपल्याच बऱ्या भल्यासाठीं कायदे मोडतात, दारू बंद पाडतात, ते सगळे गाढव ! आणि हा एकटा आला दीडशहाणा गांवाच्या नाकावर टिच्चून दारूचें दुकान चालवणारा ! दारू पिऊं नको म्हणून पोरें दुकानावर उभीं राहून लोकांना हात जोडून सांगत होतीं म्हणून काय तीं गुन्हेगार ? तो देवळांतला देव जागा असेल, मेला नसेल तर पाहून घेईल. माझ्या पोराच्या थोबाडींत मारतोस ? हात झडतील तुझे. कुसून कुसून किडे पडून मरशील ! ”

अंधारांत शिवाचा चेहेरा जरी जमना, सावित्री यांना दिसत नव्हता तरी त्याच्या संताप पेटलेल्या शब्दानें त्याच्या कोपलेल्या मनाची त्या दोघींनाही कल्पना आली.

“ काय रे, काय झालें ? मारामारी झाली देवळाकडे ? सभेंत झाली ?—” सावित्रीनें विचारलें.

“ अग ! त्या गंगारामानें माझा पिऱ्या, उस्मानचा म्हमद्या हीं शाळकरी पोरें आबा मास्तरांबरोबर दारू गुत्याजवळ उभीं राहून हात जोडून गयावया करून त्या पट्टेवाल्या कुत्र्यांना बाबा दारू पिऊं नकोस म्हणून सांगत होतीं तर पोरांचें कौतुक करायचें राहिलेंच. पोलीस पाटील मारक्या रेड्यासारखा आपला पुढें घुसतो आणि पोरांच्या फाड फाड

थोबाडींत मारतो. रावबा बेलीफाचा जीव चालला होता अगदीं, आणि त्या हवालदाराचा. म्हणावें दारू पिऊन घरादाराचें वाटोळें तुमच्या होईल कीं आबा मास्तरांच्या ?—मोठा आला बेलीफ. सकाळीं आबा मास्तरांच्या घरादारावरून नांगर फिरवतांना बापट सावकाराकडून लांच खाल्ली असेल, त्या पैशाची दारू प्यायला आला गुत्यावर. दारूपायीं म्हणावें सगळें वाटोळें होऊन धुळींत तूं बसशील कीं आबा मास्तर ? बायकापोरें अन्नापाण्यावांचून भिकारडीं, नागडीं–उघडीं जगभर भीक मागत तुझीं फिरतील कीं त्याचीं ? आणि पाट लावणार आहे म्हणे आतां पाट ! चांगला मुहूरत शोधून काढलास म्हणावें पाट लावायला. ”

आपल्या अंतःकरणावर कुणींतरी पेटत्या आगीचा फोपाटा फुंकल्यासारखें जमनाला तें ऐकून वाटलें. तिनें नकळत अंधारांत कपाळाला हात लावीत शिवाला विचारलें, “ कुणीं केली दारू प्यायसाठीं मारामारी ? रावबा बेलिफानें ? ”

“ होय. रावबा बेलिफानें. तो आणि तो हवालदार सखाराम बिरजे. काय साले एकापेक्षां एक रावण मातले आहेत गांवांत ! गांवांत बंदोबस्त राखायला आला आहे म्हणे. बंदोबस्त राख म्हणावें. पण हें काय ? नव्हे, आबा मास्तर सभेंत बोलला तो काय गांवाला आग लावायला कीं गांवाला सुखी करायला ? ज्याचें जळतें त्याला कळतें. सावकार घरदार, गुरें-ढोरेंदेखील खाऊन बसला तरी माणसानें हायसुद्धां म्हणूं नये ? ”

मला वाटलेंच होतें संध्याकाळीं आबा येऊन सांगूं लागला तेव्हां, कीं याचा राग कांहीं आतां आवरायचा नाहीं. किती तापट ! किती तापट ! मी त्याला बाबापुता करून सांगितलें कीं आपला पडता काळ आहे. मातीच्या गाडग्याला तांब्याच्या भांड्यानें धडक दिली तरी गाडगें फुटणार आणि गाडग्यानें भांड्याला धडक दिली तरीही गाडगेंच फुटणार. बापट सावकार आणि पोलीस पाटील आंतून आहेत एक. आबा पडला सरकारी नोकर. आधींच पोलीस पाटलानें त्याच्याविरुद्ध चहाडखोरपणा चालविला आहे म्हणे. आपला हात दगडाखालीं मिळालेला. आपण कशाला इतकें ह्या चोरांच्या डोळ्यावर येईल असें काँग्रेसच्या

कामांत वागायचें ? आतां बघशील तूं; आबाला चाकरीवरून काढायला ते कमी करायचे नाहींत. वेळीं पकडून तुरुंगांतसुद्धां पाठवतील त्याला. तो सखाराम ब्रिरजे पोलीस जांवई होऊन बसला आहे ना पोलीस पाटलाचा ? मला कांहीं हीं बऱ्याचीं लक्षणें दिसत नाहींत."

"पोलीस आणि पोलीस पाटील झाला म्हणून काय मामलेदार लागून गेला, कीं कलेकटर कीं, मुंबईचा गवरनर ? म्हणावें गांधीबाबाचें नांव घेऊन चळवळीच्या वणव्यांत गांव पेटला तर तुम्ही पोलीस, पोलीस पाटील, बेलीफ, सावकार, खोत, मोरे एकाहून एक राव जरी मिरवत असलां तरी ती आग कशी विझवणार ? असे विझवायला पुढें तर या, कीं पेटत्या रानांत आगींत होरपळणाऱ्या सशासारखे भाजून, जळून तुमची चिमटीभर रखा होते कीं नाहीं बघा !" बोलतां बोलतां शिवा महार हातांतील दांडा आवेशासरसा जवळच्या आंब्याच्या झाडाच्या बुंध्यावर आपटून पच्कन् थुंकला.

"बरें शिवराम आहे इथें ?" शिवनाकानें थोडा वेळ थांबून राग जरा थंड झाल्यावर जमनाच्या झोंपडीकडे पाहात हांक मारली, "शिवराम ! ए शिवराम !"

"ओ !" शिवरामनें शेताबाहेर पळून जाणाऱ्या पोलीस पाटलाच्या रेड्याच्या पाठीवर हातांतील दांडक्यानें एक खासा रट्टा लगावीत ओ दिली.

"अरे, इकडे ये जरा बाबा !" शिवनाक तिकडे पाहात म्हणाला.

शिवराम माघारा जमनाच्या झोंपडीकडे येऊं लागला. झोंपडीजवळ येतां येतां तो हातांतलें दांडकें वळचणीला टाकीत म्हणाला, "चांगलें पेकाट मोडून टाकणार होतों. बघ तर कसा पक्का चोर तो हरामखोर. पोलीस पाटलाचा रेडा धन्याच्या सवाही हरामखोर !"

जमनाचें तिकडे लक्ष नव्हतें. दारू गुत्यावरच्या मारामारींत आपला रावबा पोलीसपाटलाच्या आणि पोलिसांच्या बाजूनें सामील आहे हें शिवाच्या तोंडून कळतांक्षणीं तिचें मन पराकाष्ठेचें खट्टू झालें होतें. "आणि असल्या माणसाशीं उद्यां माझा पाट लागल्यावर सारा जलमभर असेंच चालायचें ना ? हा उद्यां माझ्या कुंकवाचा आधार होणार आहे

हें निराळें. पण हा असा आपल्या आडदांडपणानें साऱ्या गांवाचा वैरी होणार आणि मग माझे गांवकरी मला वैऱ्याची बाईल म्हणून माझी सावली देखील घेईनासे होतील..." अशा विचारांच्या डोंगराएवढ्या भयंकर वादळी लाटा तिच्या अंतःकरणांत उसळूं लागल्या.

"हें बघ शिवराम! मी मुद्दाम तुला रात्रींचा शोधीत आलों. आहेस तरी कुठें रे तूं? तिकडे देवळाकडे काय वणवा पेटला आहे; आणि तूं आपला इकडे रमतो गमतो आहेस! हें बघ, सावळ्यानें सांगितलें आहे कीं असशील तसा उठून अगोदर लिंगडाळीला जा आणि आबा मास्तरांच्या आईची काय गत झाली आहे ती पाहा. सदबाचें तर सकाळपासून डोकेंच फिरलें आहे. मानेवर समंध बसल्यासारखा पिसाळून गांवभर बापट सावकाराच्या आणि हरबा देवधराच्या नांवानें शिव्या देत हिंडतो आहे. फौजदाराचा बेत चालला आहे, त्याला खुळा ठरवून खुळ्याच्या इस्पितळांत धाडण्यासाठीं ही पिडा देवगडांत कोतवालाकडे पाठवून द्यायची. आबा हा असा इकडे गुरफटला आहे. पांच महिन्यांच्या तान्ह्या पोराला कुशींत घेऊन बिचारी त्याची आई काय रे करील? पोराच्या तोंडचें घोटभर दूध त्या मांगांनीं काढून घेतलें रे! मी जाऊन आलों मघाशीं. साळू आहे आजारी. अंगावर नाहीं दुधाचा टाक फुटत. आणि तशांत हे वनवास. भुकेनें सोन्यासारखें पोर कसें केंकटतें आहे. कानांनीं ऐकवेना आणि डोळ्यांनीं बघवेना. शेजारीं देखील कुणाकडे टाकभर दूध नाहीं हवें तर."

"म्हणजे?" शिवरामनें चिडक्या, कणखर आवाजांत आंधारांत ओठ किंचित् चावीत विचारलें.

जमना आणि सावित्री एकमेकींकडे टकमक पाहूं लागल्या.

"अरे, सांगतों काय तर? सदबानें घरांत बायकोच्या, सुनेच्या अंगावरच्या रुप्याच्या वाकी, मासोळ्या आणि आपल्या कमरेंतला रुप्याचा करगोटा देखील, सावकारानें खाऊन काय किडूक मिडुक शिल्लक होतें तेवढें विकलें आणि नातवाला दूध मिळावें म्हणून फौजदाराची म्हैस विकत घेतली. म्हशीची पुरी किंमत देखील फिटली नाहीं रे अजून!

त्यासाठीं रोज येऊन फौजदाराच्या घरांत मजुरीनें राबतो आहे. ती म्हैस देखील काय त्या लांडग्यांनीं मारून खावी?" जमना अंग शहारल्यासारखें करून पाऊलभर पुढें सरत त्याच्याकडे प्रश्नार्थक नजरेनें पाहूं लागली. तें पाहून तो तिला म्हणाला, "अग! पोराच्या दुधासाठीं सदबानें घेतलेली म्हैस देखील जप्तींत धरायची या सावकारांनीं? ही एवढी गायित्री तरी जप्तींत धरूं नको. माझा पोर दुधासाठीं उपाशी मरेल असें म्हणून सदबा त्या रावबा विचाऱ्याच्या पायां पड पड पडला. पण उरफाट्या काळजाचा कसाब ना तो? गोठयांत शिरून म्हैस वासरू सोडून हाकवून घेऊन गेला. —"

शिवा महाराच्या तोंडचें वाक्य पुरें झालें नाहीं तोंच त्याला वाघाच्या डरकाळीसारखे जमनाच्या झोंपडीकडे येणाऱ्या माणसाचे शब्द ऐकूं आले, "अरे ए म्हारड्या! पोलीस पाटलाच्या नांवानें बोंब मारतोस काय? तुझे दांतन् दांत पाडून टाकीन. माझ्या बायलेकडे चुगली करायला आलास काय?..."

रावबा विचाऱ्याचा जळफळाट त्यानें जमनाच्या भिडेमुळें ऐकून घेतला. पण पुढें त्यानें जी आई, माई, बहिणीवरून शिव्यांची लाखोली वाहिली ती ऐकून मात्र शिवाचा राग अगदीं अनावर झाला. तो हातांतला दांडका सरसावीत, दांत, ओठ चावीत म्हणाला, "नीट माणसासारखा बोल. माझ्या आईचें नांव काढशील तर इथल्या इथें ह्या दांडक्यानें चेंचून ठार मारीन. मग फांशीं गेलों तरी चालेल."

पूर्वींपेक्षां दुप्पट जोरानें शिवावर पूर्वींपेक्षां घाणेरड्या, कानांनीं ऐकवणार देखील नाहींत अशा शिव्यांची लाखोली वाहात रावबा विचारे हातांतील काठी घेऊन शिवावर धावून जाऊं लागला. तेव्हां इतका वेळ कसा बसा राग आंवरीत उभा असलेला शिवराम पुढें होऊन रावबाचें काठी धरलेलें मनगट घट्ट पकडून म्हणाला, "खबरदार! इथें मारामारी करायचें काम नाहीं. याद राखून ठेव. काजरोळी गांव आहे हा."

एवढें बोलतां बोलतां शिवरामनें रावबाच्या हातांतील काठी हिसकून घेऊन फेकून दिली. तेवढ्यांत रावबा संतापाच्या भरांत शिवरामवर सापा-

सारखा उलटला. तो त्याचा गळा पकडून दाबणार तोंच जमना व सावित्री दोघीही चिडलेल्या नागिणींसारख्या पुढें झाल्या आणि दोघी दोन बाजूंनीं रावबाचा डावा उजवा हात पकडून हिसकीत शिवरामला मोकळा करीत रावबावर उखडल्या. जमना म्हणाली, "सोड त्याला. काय माणूस आहेस कीं कोण आहेस रे? चल आंत."

जमना रावबाच्या दंडाला धरून त्याला आपल्या झोंपडींत घेऊन गेली. आंत जातांच तिनें रागारागानें धाडकन झोंपडीचें दार लावून घेत रावबाला म्हटलें, "नीज त्या माचावर. चिप पडून राहा! इतका पिऊन तरी कशाला आलास? दुपारच्या जेवणाची देखील शुद्ध राहिली नाहीं ना तुला दारूच्या नादांत?"

झोंपडीबाहेर सावित्री शिवरामचा हात धरून त्याला आपल्याबरोबर चालवीत म्हणाली, "चल रे घरीं. मरेनात तीं तिकडे दोघें. काय वाटेल तें करूं देत! दुपारपासून उपाशी आहेस तूं. घांसभर खा आणि अगोदर लिंगडाळीला जा. जाऊन ये बघूं माझा बाबा तो! आबाचें डोकें आज नाहीं आहे ठिकाणावर. माझ्या मावशीला आणि तिच्या पोराला इकडे घेऊन ये. म्हणावें तूं आपली इकडे ये. कांहीं काळजी करूं नकोस. मग बघूं आपण सावकाराचें काय करायचें तें. चल रे शिवा! चल."



सावित्री शिवरामचा हात धरून त्याला आपल्याबरोबर ओढीत नेऊं लागली. शिवराम कसाबसा ओढाळ गुरासारखा तिच्याबरोबर चालत होता खरा. पण पावलें रेंगाळत पडत होतीं तरी मन जमनाच्या झोंपडी-पासून दूर जायला तयार नव्हतें. अनेक दिवस जीवाभावाच्या जपणीनें शेत पेरून त्याची मशागत करावी. तें शेत उफाड्याला येतें न येतें तोंच पाण्याची आटाआट होऊन तें शेत करपून जळूं लागावें तसा आपल्या नव्या संसाराच्या मनोरथांचा चुराडा झालेला आज त्याला आढळला. जमनाच्या आग्रहामुळें तो तिच्या झोंपडींत आला. आणि इतक्या वेळांत त्याला आशा वाटूं लागली होती कीं मरूं लागलेल्या शेतांतल्या पाटाचें

पाणी पुन्हा वाहूं लागलें आहे; शेत पुन्हा ताजें टवटवीत होऊं लागलें आहे. जरा मागस पिकेल इतकेंच काय तें. पण इतकी मेहनत घेतल्या-सारखें शेत पिकून अन्नाचें अमृत आपल्या ओठीं लागणार; मेलेल्या, जळलेल्या शेतांतली माती कांहीं आपल्या तोंडांत पडणार नाहीं...

अशी आशावेल शिवरामच्या मनांत तेवढ्या एका प्रहराच्या अवकाशांत जोमानें पालवूं लागली होती. तोंच रावबा विचारे तिथें आला. आपल्या वैरी कमनशिबानें हा माजलेला रेडा आपल्या शेतांत ऐनवेळीं आणून सोडला; हा रेडा आतां ती वेलही खाऊन टाकणार आणि तें शेतही खाऊन टाकणार. अशा संभाव्य भीतीनें तो मनांतल्या मनांत अगदीं चूर होऊन गेला होता. आपलें काळीज तोडून हा रावबा पळवून नेत आहे आणि आपण त्याला आळा घालूं शकत नाहीं—पण कां नाहीं ! जमनाला जर कां आवडलें तर रावबा काय माझ्या एका लाथेला पुरायचा नाहीं.

पण जमनाला आवडलें तर ! तिला तें आवडणार होतें तर तिनें त्याला घरांत बोलावून कशाला नेलें असतें ? आणि दार लावून कशाला घेतलें असतें ?...

अशी विषण्ण विचारांची पृथ्वीप्रदक्षिणा शिवरामच्या अंतःकरणांत ध्वनिलहरीपेक्षांही अथवा वाऱ्यापेक्षांही अधिक वेगानें सुरू होती. होय नाहीं असें मनांत म्हणत तो एवढ्या वेळांत त्या अंधारांतून पांच सहा पावलें दूर गेला असेल नसेल तोंच जमनाच्या झोंपडींतून शब्द त्याच्या कानीं आले.

" कुठें रमला होतास इतका वेळ ? भावणीच्या बकऱ्याच्या सागुतीच्या आशेनें घुटमळत होतास ना गंगारामाच्या दारूच्या गुत्त्यांत ? "

शिवराम, सावित्री व शिवा महार या तिघांनाही जमनाचे ते शब्द ओझरते ऐकूं गेले. पण सावित्री आणि शिवा यांनीं ते एका कानानें ऐकले आणि दुसऱ्या कानानें सोडून दिले. शिवराम मात्र आसुसलेल्या अधाशी कानाची मधमाशीची जीभ करून जमनाचा तो एकेक शब्द मधासारखा आतुरतेनें निपटून घेत होता.

तोंच झोंपडींतून कोरड्या मेघासारखा रावचा कडाडलेला त्याला ऐकूं आला. " धगड घेऊन बसली होतीस घरांत ? असला छिनाल-पणा करतेस काय ?... "

ते शब्द शिवरामच्या कानीं पडले मात्र व आधींच चिडलेल्या सर्पाच्या शेंपटीवर मारेकऱ्याचें पाऊल पडतांच तो सर्प झटक्यासरसा त्याच्यावर फुत्कारत उठावा तसा शिवराम आपला हात सावित्रीच्या हातांतून सोडवून घेण्यासाटीं तिच्या हाताला हिसडे देत जमनाच्या झोंपडीकडे जोराची ओढ घेऊं लागला.

" मरूं देत ते तिकडे. एकमेकांच्या नरडीला डसूं देत. तूं कशाला त्यांत मन घालतोस ? जमना खंबीर आहे. त्याला पुरून उरेल ती.— " तरीही शिवराम तिकडे ओढ घेऊं लागला तेव्हां दोन्ही हातांनीं त्याचा हात घट्ट पकडून त्याला आवरीत सावित्री म्हणाली, " डोचकें बिचकें फिरलें नाहीं ना तुझें ? नसत्या कलागती विकत घेऊन भांडत बसायचें आपलें काय अडलें आहे ? जमनाला तिच्या अळवाची खाज चांगली माहीत आहे. कशीं झालीं तरी तीं आतां नवराबायको. घटकेंत भांडतील आणि फिरून घटकेंत एक होतील. मधीं तोंड घालणारे मात्र तोंडघशीं पडतील. "

शिवरामचें मन तिकडे कोणत्या अर्थानें ओढ घेत होतें हें सावित्रीला काय माहीत ? शिवराम तिच्यापाशीं आपली ती मनांतली आशा अजून कधींच बोलला नव्हता. कुणीं बापाच्या नात्यानें आपलें मेलेलें तान्हें मूल हातीं घेऊन मसणांत जावें तसा तो मुकाटपणें अंतःकरणांतल्या अंतःकरणांत आक्रोश करीत सावित्री व शिवा यांच्याबरोबर निघून गेला.

जमनाच्या झोंपडींतली कटकटीची आग अधिकाधिक धुमसूं लागलेली त्याला जाणवूं लागली होती. पण अग्निकुंडांत आपलें शरीर जळत असतांना आनंदी राहणाऱ्या विदेही जनकाच्या स्थितप्रज्ञतेनें तो तो सारा मनस्ताप धीरानें सहन करीत चालला होता.

●

" काय ? काय बोललास पुन्हा बोल ! धगड करणारी भावीण नायकीण ही जमना काय?'' पायरीच्या टोंकावर बसून बोलणारी जमना जणूं काय

रावबानें पेटते निखारे अंगावर फेकल्यासारखी चिडून एकदम उठून उभी राहात म्हणाली, " शुद्धीवर आहेस तूं ? कुणाला बोलतोस ? भावणींचें घर वाटलें हें तुला ? "

" भावीण काय अधिक असते तुझ्याहून ? "

जमना शिकाऱ्यावर झडप घालायला तरारून उभी राहिलेल्या वाघिणी-सारखी रावबासमोर धगधगत्या नजरेचे भाले त्याच्यावर उगारून ताठ उभी राहिली.

" भावीण रांड तुझ्यासारखी फसवीत तरी नाहीं. काय असेल तें उघड उघड बोलते. " तो तिच्या नजरेला आपली तारवटलेली नजर निर्धोकपणानें भिडवून म्हणाला, " एका वेळीं किती नवरे करणार होतीस तूं ? "

" किती करणार होत्यें ? दोन, तीन, चार किती करणार होत्यें सांग बघूं ? "

" शिवराम कोण तुझा ? " जमनाचें वर्म आपल्याला नेमकें सांपडलें आहे या खुनशी अहंकारानें बेताल होऊन रावबानें विचारलें, " त्याला घरांत घेऊन भावणीसारखा चघळपणा करीत होतीस–तो कोण तुझा ? "

" यजमान माझा तो. " जमना आवेशानें दांतांखालीं ओठ रक्त येईतों जोरांत चावीत उद्गारली, " मग काय म्हणणें आहे तुझें ? "

" काय म्हणणें आहे ? " असें विचारीत रावबा मुठी आंवळून जमनावर झडप घालणार तोंच तिनें त्याला उजव्या हातानें जोरानें दूर ढकलून दिलें. त्या प्रसंगीं सुचलेल्या सावधपणानुसार ती तशीच वेळ आली तर अंगणांत बाहेर जातां यावें अशा बेतानें लोटून घेतलेल्या पडवीच्या दाराच्या एका फळीला घट्ट पाठ देऊन व दुसऱ्या फळीला हात देऊन उभी राहिली. आज दुपारपासून रावबाविरुद्ध कानीं येणारे सारे बोभाटे तिनें मूग गिळून सहन केले होते. त्यांत तिला अपमान जाणवत होता; माणुसकीला पारखा होऊं लागलेल्या रावबाचा क्रूर पशु-पणा जाणवत होता. ती इतका वेळ सावित्री, शिवराम, शिवा यांच्याशीं जरी बोलत होती तरी मनांतून ती स्वतःला भेडसावीत समोर

जबडा पसरून उभी असलेल्या उद्यांच्या संसाराच्या भीषण परिस्थितीशीं जिवावर उदार होऊन जोहाराच्या केशरी पवित्र्यांत लढत होती.—तेवढा एक बंध जर तिला रावबाच्या नशिबाशीं जखडून बांधून ठेवणारा नसता, तर बाकीचे मायेममतेचे, आपुलकीचे, प्रेमाचे सारे बंध तिनें एका झटक्यासरसे तटातट तोडून टाकले असते. पण तो एक बंध—कमलाच्या तंतूपेक्षांही कोमल पण वज्राच्या आघातानें न तुटणारा असा तो अपत्यबंध—तिच्या गर्भाच्या पाळण्यांत झोपीं गेलेलें रावबाचें दोन महिन्याचें लेकरूं म्हणजेच त्या आईचें तें लेकरूं रडून गांगरून तिच्या ठायींच्या आईपणाला विचारीत होतें, "कुठें चाललीस? आई! तूं कुठें चाललीस? मला कडेवर घेऊन तूं नदींत उडी मारून जीव देणार? मला ठार मारणार तूं?... देवानें विचारलें तर हें कुणाचें पोर मारलें म्हणून सांगशील? आणि रावबा तरी तूं भांडल्यावर तुझ्यावर सूड घ्यायचा थांबेल का? हिनें माझें पोर पोटांतल्या पोटांत ठार मारलें असें नाहीं सांगणार?"

आपल्या त्या गर्भस्थ बालकाचे ते दीनवाणे उद्गार मनाच्या माय-कानांनीं ऐकून ती पुन्हा पुन्हा अब्रूच्या भीतीनें व अपत्यवत्सलतेच्या मोहानें मनाला समजावून सांगत होती, "काय करायचें? देऊं नये पण उखळांत डोकें दिलें. आतां मुसळाच्या घणघण तडाख्यांनीं डोकें फुटतें असें कुणाला सांगायचें?—आणि लोक काय म्हणतील मला? तें कांहीं नाहीं. माझ्यासाठीं नाहीं तरी माझ्या ह्या पोरासाठीं मला रावबाची बाईल झालेंच पाहिजे. अब्रूसाठीं देखील वेळीं मी नसत्यें झाल्यें त्याची बाईल. जीव दिला असता व्हाळाच्या कोंडींत जाऊन. नाहींतर तशीच राहिलें असतें. आणि लोक मला सुटारू म्हणाले असते तरी काय माझ्या केळी तुटणार होत्या? माझ्या पायावर मी उभी राहाणार. मी कष्ट करणार; मी पोट भरणार. इथें नाहीं तर मुंबईला जाऊन गिरणींत काम करून पोट भरलें असतें. कुणाला जुमानलें नसतें. पण हें पोर—याची जतन करायला मी चुकल्यें तर देव काय म्हणेल? मी एक मरेन. पण ह्या पोटांतल्या जिवाला माझ्या चुकीसाठीं कां म्हणून मारूं मी? मी काय पोरांना मारून खाणारी लांवसट आहें? लांवसट देखील लोकांच्या

पोरांना मारून खाते; आपल्या पोरांची ती आईच असते.—नाहीं. असें भलतें सलतें कांहीं करून चालायचें नाहीं..."

जाळें घेऊन उडून जाणारी पक्षीण जाळ्यांत पाय अडकून गुरफटली.

" बाजारबसवी छिनाल रांड. मला लबाड, शिंदळ कोल्हीसारख्या हुलकावण्या दाखविते. " रावबा एक पाय पडवींतल्या जमिनीवर आणि एक माच्याच्या कोंपऱ्यावर अशा पवित्र्यांत उभा राहून दांत ओंठ चावीत आकुंचित विषारी नजरेनें जमनाकडे पाहात म्हणाला, " रांडे ! नुसता कुंकवाला आधार हवा होता तुला. रावबाच्या जिवावर ह्या शेताची मालकीण होऊन रावबाच्या डोळ्यांत धूळ फेंकीत त्या धगडाची शेज सजवायची होती.—"

ते हलाहलापेक्षांही दाहक अभद्र शब्द जमनाला कानांनीं ऐकवेनात. ती कानांत बोटें घालून तें अभद्र श्रवण टाळण्याचा प्रयत्न करीत, मरण-तडाख्यानें घायाळ झालेल्या नागिणीनें मरतां मरतां निर्वाणीच्या त्वेषानें फणा आपटावी तशी कळकळून उद्गारली, " मेल्या ! मांगा ! जीभ झडून पडेल तुझी. किडे पडतील तुझ्या तोंडांत. पापाच्या नुसत्या आठवणीलाही भिऊन वागणाऱ्या ह्या जमनेला अशा ओंगळ शब्दांनीं बोलून छळतोस ? कुठें फेडशील हें सारें ? बस्स् ! जा. चालता हो माझ्या घरांतून. आजपासून जमना तुला मेली आणि तूं जमनाला मेलास. हो चालता माझ्या घरांतून, काळें करून.—नीच. "

" कां ? ठिकाणाचे पैसे हातीं आले म्हणून ?—"

ते पैसे परत टाक असें बोलण्यापुरताही अवकाश रावबाला न देतां जमना त्याच क्षणीं रागानें सणाणत आंत जातां जातां म्हणाली, " पैसे ! पैसे ! ठिकाणाचे पैसे ! "

" होय, पैसे. ते चिंचारे नाहीं लागून लेले. आण माझे पैसे. " रावबा तोऱ्यांत म्हणाला.

जमना अंधारांतूनच सुटलेल्या तीरासारखी झोंपडीबाहेर येतां येतां दरवाजांतून नोटांचें भेंडोळें कचऱ्यासारखें रावबाच्या आंगावर फेकून देत आवेशाच्या भरांत उद्गारली, " आग लागली तुझ्या पैशांना.

अशी पैशाच्या मोलानें मिळायला जमना कांहीं देवळाकडची भावीण नायकीण नव्हे !" ती मटकन् पायरीवर बसून दोन्ही हातांनीं तोंड झांकून घेत जोराचे हुंदके देत उद्गारली, "सोन्यासारख्या उभ्या जिवाची ओंवाळणी जमनानें तुझ्यावर केली त्या जमनाचें असें पैशानें मोल करतांना तुझ्या जिवाला कांहीं लाज वाटायला हवी होती."

रावबा तिच्या बोलण्याकडे लक्ष देण्याऐवजीं तिनें अस्ताव्यस्त फेंकल्या-मुळें त्या पडवीभर उधळल्या गेलेल्या नोटा गोळा करण्यांत गढून गेला होता.

जमना मुसमुसून ओक्साबोकशी रडत जोराजोरानें हुंदके देत होती.

सर्व नोटा गोळा करून झाल्यावर त्या मोजून खिशांत कोंबतां कोंबतां तो जमनाकडे पाहून कुचेष्टापूर्वक हेटाळणीनें म्हणाला, "तुझ्यासारख्या एक सोडून दोन रांडा पोशीन या पैशांत. तूं काय समजलीस ? घरांतून चालता हो म्हणतेस काय ? मला तरी काय करायचें आहे तुझ्याशीं ? असल्या तुझ्यासारख्या पैसा असला कीं एक सोडून छप्पन मिळतील." त्या उद्गारासरशी जमना जिवाच्या आकांतानें कळकळून दुःखातिशयानें टाहो फोडण्यासाठीं पारध्याच्या हातून जखमी झालेल्या पक्षिणीसारखी टाळा पसरून आक्रंदूं लागली. तें ऐकूनही त्याच्या मनाला द्रव फुटला नाहीं; खंत वाटली नाहीं. तो उलट कुरुंदी पाषाणाहूनही कठिण हृदय करून उद्गारला, "रांड नाहीं तर कोण तूं माझी ? मीं कांहीं तुझ्याशीं पाट लावलेला नाहीं. पण माझ्या पोराची आई मात्र तुला केली आहे. कोण तुला माझी बायको म्हणतें पाहूं बरें ?" तो खुनशी लांडगेनजरेनें तिच्याकडे पाहात पडवीचें दार उघडून बाहेर पडला. जातां जातां तो पुन्हा अंधारांतून मागें वळून पाहात म्हणाला, "उद्यां पोराची आई झालीस कीं मग रावबा तुझा कोण तें जगाला सांग आणि ही जमना आपली कोण हें रावबाही जगाला सांगेल. मग नाक कुणाचें कापलें जातें पाहूं."

रावबा निघून गेल्यावर जमना जगबुडीच्या प्रळयांत सांपडल्यासारखी पायरीच्या टोंकावर बसली होती. त्याच जागीं सरीसरींनीं अश्रूंचा पाव-साळा सुरू झाला होता.

" पैसा ! पैसा ! पैशाच्या धुंदीवर बायकोला रांड म्हणायला धजणारा हा हैवान... " असें खालच्या दांताच्या कवळीनें खालचा वरचा ओंठ अधूनमधून चावीत व जोरानें दांतखिळी आवळून अंग शहारल्यासारखें करीत तिनें नेसलेल्या हिरव्या लुगडयाकडे पाहिलें. अंगांतील त्या नव्या आभाळी रंगाच्या चोळीकडे क्षणभर तृतीय नेत्र उघडून जगाला जाळूं पाहणाऱ्या शिवरुद्राप्रमाणें मनोभंग झालेल्या मानिनीच्या संतप्त व्याकूळ शापनजरेनें पाहात तिनें हाताच्या एका झटक्यासरशी अंगांतील चोळी टर्‌कन फाडून दूर फेंकून दिली. तशीच नेसलेल्या लुगडयाकडे सूडभावनेनें पाहात ती वाघिणीच्या झडपेनें आंत निघून गेली. घरांत आंत सगळीकडे अंधार होता. त्या अंधारांतून तिनें पुढें जाऊन खुंटीवरचें दुपारीं सोडून ठेवलेलें जुनेर ओढून घेतलें व डाव्या हातानें नेसलेलें हिरवें लुगडें फेडून पायांखालीं तुडवून दरवाजाबाहेर ओसरीच्या पडवींत फेंकून देऊन ती तें जुनेर वेढून घेऊन बाहेर आली.

क्षणभर—फक्त क्षणभरच तिचा जीव तें चोळी लुगडें चुरमडून गुंडाळून हातीं घेतां घेतां कळकळला. तोंच दुसऱ्याच क्षणाला पुन्हा महिषासुरमर्दिनी तिच्या अंगांत संचारली. तिनें कोनाड्यांतील समईवर ती फाटकी चोळी धरून पेटवली व त्या चोळीवर धरून नवें लुगडेंही पेटविलें. त्या धडपडींत समईतील वात विझली. त्याबरोबर पेटत्या चोळी लुगड्याच्या प्रकाशांत ती घरांत गेली व माजघरांतील कोनाड्यांतील दिवली आणून त्या पेटत्या लुगड्यावर पेटवून घेऊन पुन्हा आंत गेली.

ती आंत स्वैपाकघरांत जाऊन पाहाते तों काय, मांजरानें आणि घुशींनीं दुपारपासून रांधून पडलेल्या सुग्रास शिळ्या अन्नावर यथेच्छ ताव मारून त्या अन्नाची स्वयंपाकघरभर नासधूस करून टाकली होती.

पण जमनाला त्याचें जरा देखील वाईट वाटलें नाहीं. नाहीं तरी तें अन्न चांगलें शिल्लक असतें तरी देखील तिनें तें आपल्या मुखीं न लावतां गाईला आंबोण म्हणून चारलें असतें.

तेवढयांत गाय हंबरली. तेव्हां कुठें जमना भानावर आली कीं दुपारीं रानांत लावलेली गाय माघारीं आली ती गोठ्यांत दाव्याला बांधायचें आपण विसरून गेलों.

स्वयंपाकघरांतलें धारेचें भांडें शोधून घेऊन ती एका हातीं भांडें आणि दुसऱ्या हातीं दिवा घेऊन गोठ्याकडे जाऊं लागते, तोंच तिच्या निंढळच्या घामानें उफाड्याला आलेल्या व गंगाराम पोलीस पाटलाच्या रेड्यानें पुरी नासधूस केलेल्या मागील दारच्या चिमुकल्या बागेंत मोडून पडलेल्या वित्या केळीचें आंबोण खाऊन गाय आपल्या वासराला पाजीत संथपणें रवंथ करीत उभी होती.

"आज माझ्या फुटक्या नशिबानें सगळ्या बाजूंनीं माझा कसा उच्छाद मांडला आहे" असें म्हणत हातांतील धारेचें भांडें खालीं टाकीत तिनें कर्माला हात लावीत म्हटलें, "आतां कुणाला सांगूं मी हीं माझीं दुःखें? ह्या उघड्या जगांत माझा कैवार घेणारें कोण आहे आतां?"

तोंच परसांतील आंब्याच्या झाडावरून तिला अमंगलसूचक स्वर ऐकूं आला, 'घुघ्घु! घुघ्घु!'

# सावकारी देशभक्ति

त्या दिवशीं बापटशास्त्री सकाळींच काजरोळीहून पार्वतीबाई देसाईण-बाईंचा निरोप घेऊन महार बोलवायला आल्यामुळें लगबगीनें तिकडे गेले होते. तिकडून परत यायला त्यांना अकरा वाजले.

ते अंगणांत पाऊल टाकतात न टाकतात तोंच टपालाच्या शिपायानें त्यांच्या नांवें आलेला ' कोंकण ' साप्ताहिकाचा अंक व निशिकांत माधव काळे या त्यांच्या नातवाच्या नांवचीं पत्रें त्यांच्या हातीं दिलीं. वर्तमानपत्राचा अंक त्यांनीं तसाच न पाहतां कोटाच्या खिशांत घातला व त्या पत्रावरील पत्ता मात्र धांवत्या पण मार्मिक नजरेनें न्याहाळून पाहिला. त्या लखो-ट्याच्या डाव्या कोंपऱ्यांतील ' पाठविणार—प्रतिभा खटपटे शिरोडें, जिल्हा रत्नागिरी ' या मजकुरावर त्यांची नजर विशेष खिळली.

निशिकांत ऊर्फ नानू नुकता तीन दिवसांपूर्वींच सदानंदाप्रमाणेंच सत्याग्रहाच्या प्रचारकार्यासाठीं देवगड तालुक्यांत हिंडण्याकरितां प्रथम आपल्या आजोळीं लिंगडाळवाडीला आला होता.

ह्या चार दिवसांच्या अवधींत निशिकांताच्या नांवानें प्रतिभाकडून आलेलें आज हें दुसरें पत्र बापटशास्त्री पाहात होते. पहिलें पत्र निशिकांत गांवीं येऊन पोहोंचण्यापूर्वीं दोन दिवस टपालानें येऊन पडलें होतें.

नातवाच्या नांवानें खटपट्यांच्या मुलीचें पत्र व तें नातू घरीं येऊन पोहोंचण्यापूर्वीं आलेलें पाहून यांत कांहींतरी रहस्य आहे अशा समजुतीनें त्यांची अष्टपैलू जिज्ञासा सदाफुलीसारखी बहरूं लागली होती.

तें पत्र दोन तीनदां पुन्हा पुन्हा न्याहाळून—घरांत जातांच ओल्या टीपकागदाच्या साहाय्यानें तें उघडून वाचण्याच्या हेतूनें कीं काय—शास्त्रीबुवा तें खिशांत ठेवतात तोंच ओसरीवर आरामखुर्ची टाकून टपा-लाच्या शिपायाची वाट पाहात बसलेला निशिकांत टपालाच्या शिपायाची

चाहूल लागतांच आतुरतेनें पुढें येऊन म्हणाला, "माझें पत्र आलें आहे आजोबा ?"

"होय, आलें आहे. हें घे." असें म्हणत शास्त्रीबुवांनीं त्याच्या मित्राचें आलेलें एक पत्र तेवढें एकच त्याला देण्याच्या इराद्यानें खिशांत हात घालून पत्र बाहेर काढलें. पण त्यांच्या हाताच्या बोटांचा पत्र चांचपतांना घोटाळा उडाल्यामुळें नेमकें प्रतिभाचेंच पत्र त्यांच्या हांतून खिशाबाहेर आलें. त्याला त्यांचा तरी काय इलाज ? त्यांनीं तें आपण जणूं पाहिलेंच नाहीं अशा बहाण्यानें निशिकांतच्या हातीं देत म्हटलें, "हीं घे. आणि हा घे 'कोंकण'चा अंक. काय म्हणतें कोंकण, पाहा आणि मग सांग मला कुणाचा खरपूस समाचार घेतलेला आहे या अंकांत. मोठा बाजंदी दिसतो हा संपादक. नेहमीं कांहींतरी फुसकुल्या मारीत बसतो."

हें बोलतांना शास्त्रीबुवा मनांत विचार करीत होते, आपल्या गंगाराम देवळी पोलीस पाटलानें लिहवून घेऊन पाठवलेला काजरोळी गांवच्या बातमीपत्राचा मजकूर या अंकांत आला असेल का ?

निशिकांत तीं पत्रें व तो अंक घेऊन आंत गेला. तो ओसरीवर न बसतां ओसरीला लागून असलेल्या आपल्या बैठकीच्या खोलींत जाऊन दार लोटून घेऊन प्रथम प्रतिभाचें पत्र वाचूं लागला.

एखाद्या निष्णात रत्नपारख्यानें हातीं आलेलीं टपोरीं पाणीदार मोत्यें खरीं आहेत कीं कल्चर्ड आहेत याचा आपल्या क्ष किरणी नजरेनें तलास घेऊं लागावें तशा मनाच्या नजरेनें निशिकांत व प्रतिभा यांचें नातें मनोमन न्याहाळीत शास्त्रीबुवा घरांत आपल्या खोलींत गेले. काजरोळीहून देसायांकडून परत येतांना रावजी विचाऱ्याला वृंदावन ठिकाण काल रजिस्टर खरेदी करून दिलेल्या खरेदीपत्रांत आपण मुळांत ठरविलेली मेख मारून ठेवायला विसरलों कीं काय ही शंका त्यांच्या मनांत केव्हांपासून डांचत होती. त्या ठिकाणाच्या एका कोंपऱ्यांत चांगली जुनवट इमारती लांकडाच्या उपयोगाचीं चार मोठीं शिवणीचीं झाडें होतीं; व एक मोठें नमुन्याचें घरत्या फणसाचें झाड होतें. त्या एका झाडाच्या जिवावर जमना दरसाल पंधरा ते वीस रुपये फणस व साटें विकून मिळवते हें त्यांना माहीत होतें.

म्हणून तो त्या ठिकाणांतला लहानसा दोन गुंठे क्षेत्रफळाचा भरडी पोट नंबर ठिकाणाबरोबर खरेदी घ्यायचा नाहीं हें धोरण त्यांनीं अगोदरपासूनच मनाशीं बांधून ठेवलें होतें. तें धोरण खरेदीपत्र करून देतांना व्यवस्थित राखलें गेलें आहे कीं नाहीं हें पडताळून पाहण्यासाठीं शास्त्रीबुवांनीं खोलींत जातांच फडताळ उघडून कालच्या खरेदीपत्राची नक्कल काढून वाचून पाहिली. त्यांची शंका फिटली व समाधान झालें.

●

तेवढ्यांत गजघंटेसारखा गंगाकाकीचा आवाज मागील दारून त्यांच्या कानीं आला. गंगाकाकी आपलीच चौकशी घरांत करीत आहेत हें ऐकून त्यांनीं ती खरेदीपत्राची नक्कल पुन्हा गुंडाळून बाजूला ठेवून देऊन खोलींतूनच मोठ्यानें हांक मारली, "काय म्हणते गंगाकाकी? ए गंगा-काकी! काय कुलंगडें घेऊन आली आहेस आज आणखी?"

गंगाकाकीचा आवाज शास्त्रीबुवांना ऐकूं आला, "कुलंगडीं करा तुम्ही बापू! आणि विचारा मला!"

"काय कुलंगडीं केलीं आम्ही तें तरी सांग." शास्त्रीबुवा तो कागद फडताळांत ठेवून आंतली चंची काढून सुपारी कातरीत म्हणाले.

"एवढे मोठे भले माणूस तुम्ही, आणि त्या गरीब पोराच्या जिवावर कां उठलां आहां हो? गांवांत भावीण सुखानें नांदूं लागलेली तुम्हांला कां बघवत नाहीं?"

"काय म्हणतेस हें गंगाकाकी कांहींतरीच?"

"हें बघा, ह्या गंगाकाकीचे कान आणि डोळे अजून चांगले धड आहेत हो! पन्नाशी उलटली म्हणून गळलेली खोक्‌खोक् ओणवी म्हातारी झाली नाहीं गंगाकाकी अजून. आमच्या जाव्वेचें आणि तुमचें देवघरांत बसून काय फुतु फुतु चाललें होतें सकाळीं? मला ठाऊक आहे डाव तिचा. एकदां तेवढें एक पोर मेलें कीं लावणचिठीप्रमाणें भावणीचें शेत आपल्या घशांत पडेल म्हणून इतकी धडपडते आहे. भावणीचें पोर मरायची डोळ्यांत तेल घालून वाट बघते आहे. पण म्हणावें तुझ्या लेकाला यजमान करून शांतू भावीण तुझ्या उरावर नाचेल आणि मी बघीन तेव्हां

मरेन. शांतू भावीण होईल. खुशाल बोटें मोडत बैस म्हणावें तिच्या नांवानें. आणि बापू! तुमचें तरी काय हो अडलें आहे एवढें ह्या भानगडींत तोंड घालायचें? देसायाचें वतन तिकडे जळेल, पेटेल, त्याची वाताहात होईल, नाहीं तर आणखी कांहीं तरी होईल. उंडगीं कुत्रीं जाऊन हगतील त्या ओसाड चौथऱ्यावर. तुमचें काय गेलें त्यांत?–तिला म्हणावें तुझ्या नवऱ्यानें भावणीला दिलेलें शेत भावणीकडून लाटायचा तुझा कावा मला कळतो. कर, किती ती देवस्की कर, कौल लाव, गाऱ्हाणीं घाल, कोंबडीं दे, बकरीं दे,..." गंगाकाकी इतका वेळ खोलीच्या दरवाजांतून बोलत होती ती मागें पुढें पाहात दरवाजाच्या आंत गेली आणि पोपट बोलतांना मान फुलवतो तसा चेहरा फुलवीत डोकीवरचा तांबडा पदर जरा मागें सरकवीत किंचित् हळू आवाजांत म्हणाली, "स्वतःची पोरगीसुद्धां घरच्या गड्याला झाली तरी दे.–कां, हातानें गप्प कां करतां? सगळा गांव बोलतो.—"

"गांव बोलतो; पण तूं नाहीं बोलायचें गंगाकाकी!" शास्त्रीबुवा पानाला चुना लावीत गंभीर चर्या करून उद्गारले.

"मी बोलणार. मी मुद्दाम बोलणार. कोण माझें तोंड धरतें तें बघूं दे मला. असलें लपव छपव कशाला हवें? नानांना म्हणावें देवगडांत जाऊन कोतवालाला पैसे चारून थारवाथारव करून आलां, म्हणून सुटलां असं समजूं नका. उद्यां कलेक्टरकडून चौकशीसाठीं लिहून येईल तेव्हां डोळे पांढरे करायची वेळ येते कीं नाहीं पाहा."

बापटशास्त्री तें ऐकून तोंडांत टाकण्यासाठीं उजव्या हातांत घेतलेली तंबाकूची चिमटी तशीच खोळंबून धरीत गंभीर नजरेनें गंगाकाकीकडे पाहूं लागले. त्यांना देखील ह्या मोठ्यांच्या घरच्या भानगडी माहीत नव्हत्या असें नाहीं. पण शेजारधर्म. न जाणो आज देसायावर प्रसंग आला तसा उद्यां एखादे वेळीं आपणावरही आला तर तेव्हां नडण्यासाठीं आज हे शेजारी वैरी कशाला करून ठेवा?

पण गंगाकाकी आतां त्या मनःस्थितींत नव्हती. तिच्या ऐन तरुणपणीं याच पार्वतीबाईनें–तिच्या जाऊबाईनें एखाद्याच्या डोळ्यांतलें

काजळ काढून घ्यावें इतक्या बेमालूम गुप्तपणानें तिला कचाट्यांत धरलें होतें. गंगाकाकी बालविधवा. ऐन तारुण्याच्या भरांत—लोक म्हणत तें खरें असलें तर तिचें पाऊल जरा वाटेचें आडवाटेला पडलें असेल. पण आपल्या पायाखालीं काय जळतें आहे हें न पाहातांना गंगाकाकीची अब्रू बाजारांत विकायला मांडणारी जाऊ—गंगाकाकीला तरी तें कसें बरें वाटेल ? खरें खोटें ज्याचें तें जाणे. पण तेव्हां पोलीस निनांवी अर्जावरून गंगाकाकीची चौकशी करण्यासाठीं गांवांत आला तेव्हां गंगाकाकीच्या मनानें पक्का संशय घेतला कीं हें नीचपणाचें काम आपल्या दावेदारीण जाऊबाईखेरीज दुसऱ्या कुणाचेंही नसेल.

पण गंगाकाकीनें तेव्हां गंगाराम देवळी पोलीस पाटलासारख्याच्या मध्यस्थीनें पोलीसाचें तोंड बांधलें. त्यासाठीं आपलें एक ठिकाण गहाण टाकून पांचशें रुपये अनेकांच्या मुठी दाबण्यापायीं खर्चही केले. आणि आपल्या आयुष्याच्या आकाशांत सांचूं लागलेलीं तीं गुन्हेगारी बेअब्रूचीं अभ्रें एकदांचीं या कानाचा त्या कानाला पत्ता न लागतां परस्पर दूर सारलीं.

" सांगतेस तरी काय तूं गंगाकाकी ? " बापटशास्त्री पानसुपारीची पट्टी तोंडांत टाकीत म्हणाले.

" देवाची करणी आणि नारळांत पाणी म्हणतात ना ? तसें विधवेच्या कपाळाला कुंकू तुम्ही कधीं पाहिलें नसलेंत तर बाबा देसायाच्या घरांत जाऊन त्याच्या लेकीच्या कपाळाकडे पाहा. कुणाला संशय येऊं नये, ही विधवा पोरगी आणि गरवार कशी असें कोणी म्हणूं नये, म्हणून लेकीच्या कपाळाला कुंकूं लावून पंढरपूरला पाठवलीस तें सगळें मला ठाऊक आहे म्हणावें. "

" खरें हें ? "

" खरें नाहींतर काय खोटें सांगत्यें मी ? आठ दिवसांपूर्वी त्या दिवशीं लेक आला तेव्हां नाना देवगडला कशाला गेले होते सांगा बघूं ? त्या अर्जाची मिटवामिटव करून आले असतील. पण अशानें भागणार नाहीं म्हणावें. वर्तमानपत्रांत छापून येईल तेव्हां समजेल. अहो बापू ! पाण्यांत हगलेलें काय दडवून दडतें ? "

" एवढेंच सांगायला आली होतीस तूं ? "

" होय एवढेंच सांगायला आल्यें होत्यें. खरें बापू, शांतू भावीण तिचें शेत विकायचें म्हणते. आहे कुणी गिऱ्हाईक ? "

हें भावणीच्या शेताचें आमिष गंगाकाकीनें शास्त्रीबुवांसमोर मोठ्या हिकमतीनें धरलें होतें. त्यांना आपल्या जाऊबाईच्या कटांतून फोडून तिला आपल्या बाजूला वळवून घ्यायचें होतें. तशीच वेळ आली तर टाका परस्पर कुणाला तरी सांगून त्याच्या हातून तिचें चंदन उडवून कीं मग सुंठीवाचून खोकला जातो. लावणचिठी देखील आपोआपच रद्द होते, आणि देसायांचें ठिकाण देसायांच्या घरांत येतें अशी पोक्त सल्ला-मसलत शास्त्रीबुवांनीं देखील चार पांच दिवसांपूर्वी 'मुद्दाम' आपल्या—देसायांच्या—घरीं येऊन आपल्या जाऊबाईला दिल्याचें गंगाकाकीनें नेहमींच्या तिच्या पद्धतीप्रमाणें गोठ्याच्या पडवींत लपून उभें राहून ऐकलें होतें. म्हणून तिनें आज हा नवा डाव टाकला होता.

शास्त्रीबुवा तें ठिकाण विकायचें आहे या वार्तेसभोंवार गुळाच्या ढेपीला चिकटलेल्या मुंगळ्यासारखे घुटमळूं लागलेले त्यांच्या चेहऱ्यावरून पाहतांच गंगाकाकी पुढें म्हणाली, " गरीब पोरगें आहे. त्याचें काय ! तुम्ही आम्ही सांगूं ती किंमत मुकाट्यानें घेईल आणि ठिकाण देऊन टाकील. "

" अग पण तें ठिकाण देसायांच्या मालकीचें आहे ना ? " या बाबतींत देवगडच्या गोगटे वकिलांची सल्ला जाऊन घेण्याचें मनांत योजीत शास्त्रीबुवा म्हणाले.

" हो ऽऽ य. पण बाबा देसायानें आपल्या भावणीला पोटगीदाखल दिलेलें आहे ना तें ! देवगडला जाऊन वकीलाला विचारलें मी. वकील म्हणाला कीं लावणचिठीवरून शांतूला ठिकाण जरी दुसऱ्याला देतां आलें नाहीं, तरी स्वतःच्या अडीअडचणीसाठीं तें ठिकाण तिला पोटगीच्या हक्कापुरतें गहाण टाकतां येतें. "

" एवढी मोठी वतनदारीण म्हणतेस आणि वडिलार्जित वतन राखलें कसें जाईल याचा कांहीं देखील विचार न करतां तें बुडवायला निघतेस;

काय म्हणावें तुला गंगाकाकी! त्यापेक्षां चांगला सोन्यासारखा मुलगा आहे नानांनीं तुझ्या जावेच्या मांडीवर दत्तक दिलेला; तोच आपला मुलगा असें समजून तुझा हिस्सा देखील त्याच्या नांवानें कां नाहीं करून देत मी म्हणतों?" बापटशास्त्री मनोमन तें ठिकाण खरेदी घेण्याच्या वाटेंतील कायदेशीर खांचखळगे शोधीत म्हणाले.

"वतन तिकडे जळलें तरी चालेल. निर्वंश झाला तर खुशाल तिकडे सरकार खाऊं दे वतन. पण तें ह्या पार्वती देसाईणीच्या पोराला–ऊं हूं! मेल्यें तरी पटायचें नाहीं मला तें बापू!" असें म्हणून गंगाकाकीनें जोरानें नकारार्थी मान डोलविली.

इतक्यांत आबा मास्तर समोरच्या शेतांतून येतांना शास्त्रीबुवांना व गंगाकाकीलाही आढळले. त्याला पाहून गंगाकाकी चिडून हात चोळीत म्हणाली, "हा आला मेला वैरी माझ्या शांतूचा! तळपट होईल म्हणावें मेल्या! तुझें–तिला फितवलेंस तर. याच्याच चिथावणीवरून शांतू भांडण करून घरांतून निघून गेली हो बापू!"

"निघून गेली? कुठें?"

"अहो, जाणार कुठें? सरड्याची धांव वईपर्यंत. तुमच्या त्या खुनी कुळाच्या घरांत जाऊन बसली आहे–त्या जमनाच्या. मला कुणी सांगत होतें कीं–" ती अंगणांत असलेल्या आबा मास्तरांवर चोरटी बगळेनजर राखीत शास्त्रीबुवांच्या अगदीं कानापाशीं तोंड नेत अगदीं हळू म्हणाली, "हा आबा मास्तर म्हणे तिच्याशीं लगन लावायला तयार आहे, तिनें भाविण होऊं नये म्हणून. आणि तीही राजी आहे त्याला. अहो, लगन झालें तर सोन्यासारखें पोर फुकट मरेल ना हो! तिला वांचवायसाठीं मीं जिवाची कशी कशी काय काय आटापीट केली त्या देवाला माहीत. कोंबड्यां–बकऱ्यांसाठीं पदरचे पंचवीस रुपये खर्च केले हो बापू! एकाचे उसने घेऊन. मीं तिला म्हटलें, दैवानें चांगला देसाई यजमान दाखवून दिला आहे, तो धरायचा सोडून हें लगनाचें भिकारडें अवलक्षण काय आठवलें तुला?"

"पण मी तर ऐकतों कीं तुमचा सदानंद शांतूनें भावीण होण्याच्या अगदीं विरुद्ध आहे."

“काय खुळे आहां तुम्ही बापू! इतके म्हातारे झालां तरी अजून ‘ता’ वरून ‘ताकभात’ कसा लक्षांत येत नाहीं तुमच्या?”

“आमचा भगवान गांवकर तर सांगतो कीं बाबदेव कोपला आहे लेकावर आणि शांतूवर. मला कळली हकीकत ती सारी. उल्लूसारखा सदानंद गांवांत पाऊल पडलें नाहीं तोंच भावणीला पाहून हुरळला आणि शेताची मेर तुडवीत तिच्याकडे धांवला म्हणे, म्हणून साप डसला. भगवान गांवकरानें देवाचा कौल घेऊन पाहिला, दुसऱ्या देवऋषीलाही विचारलें. जिकडे तिकडे ती एकच नड लागते म्हणे. अग गंगाकाकी! बाप एक बाहेरख्याली असला म्हणजे आपल्या मुलानेंही आपल्यासारखेंच बाहेरख्याली असावें असें त्याला कसें ग वाटेल? भगवान गांवकर सांगत होता—”

“मेला तो भगवान गांवकर गेला मसणांत! त्याच्या पोटांत काय आहे हें मला माहीत आहे बापू! त्याला ही भावीण हवी आहे स्वतःच्या पांखाखालीं ओढायला. पण हळकुंड सोडून असलें शेळकुंड पदरीं कोण बांधून घेईल हो बापू?”

“बरें. बघतों मीं काय होतें तें.”

“बघतों नाहीं. माझी शांतू ज्या पायांनीं घराबाहेर गेली त्या पायांनीं परत माझ्या घरांत यायला हवी. कुणी तिला फसवून तिचें लगन करून द्याल तर तुमच्या सगळ्यांच्या कपाळावर माझे शिव्याशाप बसतील.” असें म्हणत गंगाकाकी घरांत जाण्यासाठीं रेंगाळूं लागली. पण शास्त्रीबुवांनीं तिकडे बळेंच दुर्लक्ष केलें. ते आबा मास्तरांना हांक मारीत खोलींतून बाहेर उठून गेले.

मग गंगाकाकीही निरुपायानें घरांत निघून गेली व मागील दारानें आपल्या घरच्या वाटेला लागली.

घरीं जातांना तिच्या मनांत तोच विषय घोळत होता. “काय केलें म्हणजे शांतूच्या डोक्यांतलें लग्नाचें वेड जाईल? कुठचा देव नवसाला पावेल? काय वाटेल तें झालें तरी शांतू भावीण व्हायलाच हवी. तिचें लग्न होतां कामा नये. कर किती देव–देवस्की करतेस ती. पंचाक्षरी

आण, देवऋषी आण, काय वाटेल तें कर. पण हें भावणीचें ठिकाण, ही गंगाकाकी कांहीं झालें तरी तुझ्या घशांत पडूं द्यायची नाहीं. वाटलें तर झाला तरी पोरगा दत्तक घेईन आणि त्याला ही भावीण ठेवायला लावीन. पण शांतूला तुझ्या घशांत नाहीं पडूं द्यायची..."

●

त्या दिवशीं घरावर जप्ती आल्यापासून आज प्रथमच आबा मास्तर शास्त्रीबुवांना भेटत होते.

यापूर्वी तें जसें कांहीं कांहींच घडलें नाहीं अशा धुतल्या तांदळा-सारख्या निर्मळ मनाची आरास चर्येवर उभी करीत शास्त्रीबुवा आबांना म्हणाले, "कुठें होतास रे आबा इतके दिवस? रागावला आहेस वाटतें आमच्यावर? बाकी तुला राग आला तर ती तुझी चूक नाहीं. खरें पाहिलें तर हरिबानें इतक्या कडूपणानें वागायला नको होतें तुमच्यापाशीं. आणि सदबानें तरी मोडेन पण वांकायचा नाहीं इतका ताठपणा कशाला रे दाखवावा? दगडाखालीं मिळालेला आपला हात हळू हळू पोटांत रिघून कसा सोडवून घ्यावा एवढें कळायला नको सदबाला? मी तेव्हां पुष्कळ सांगून पाहिल्या समजुतीच्या गोष्टी. पण म्हणतात ना, दुर्बळाचे बोल पचपचीत! हो, बेलीफ तो अधिकाराच्या घोड्यावर बसलेला! सर-कारच्या सत्तेपुढें आम्ही दुबेळच!—"

आबा मास्तर शास्त्रीबुवांचें बोलणें मनांतल्या मनांत तिरस्कारानें दुर्लक्षपूर्वक हेटाळीत खिशांतून एक चिठ्ठी काढून त्यांच्यापुढें करीत म्हणाले, "तें राहूं द्या. अगोदर एवढी चिठ्ठी वाचून पाहा आणि काय करायचें तें सांगा."

"आण बघूं!" असें म्हणत शास्त्रीबुवांनीं हात पुढें केला. चिठ्ठी घेऊन उलगडतांना ते आबा मास्तरांना म्हणाले, "कसें आहे रे आतां सदबाचें? आलें का कांहीं डोकें ठिकाणावर?"

"येईल." असें म्हणत आबा मास्तरांनीं कंठीं दाटून आलेल्या दुःखमय गहिंवराचा आवंढा गिळला व डोळ्यांत उभे राहिलेले अश्रू शास्त्रीबुवांच्या नजरेपासून लपविण्यासाठीं मान किंचित् वळवली.

शास्त्रीबुवांनीं ती चिठ्ठी उघडून वाचली. शिवराम तांबे याला सहाशें रुपये देण्याबद्दलची ती हिंदळगांवच्या त्यांच्या जामातांची–माधवराव काळ्यांची–चिठ्ठी होती. जमिनीचें गहाणखत वगैरे रकमेच्या पोंचपावतीसुद्धां सर्व कागद आपण पूर्ण करून घेतल्याचेंही काळ्यांनीं त्या चिठ्ठींत लिहिलें होतें.

"ठीक आहे. पण तूंसा रे आलास ही चिठ्ठी घेऊन ? इथें येण्याइतकासुद्धां धड पायाचा राहिला नाहीं शिवराम ?"

"नाहीं बापू ! त्याला या कुशीवरून त्या कुशीवर परततां देखील येत नाहीं. अगदीं वर्मी मुका मार लागला आहे. काळीज फुटलें आहे. एकसारखा रक्त ओकतो."

"रक्त ओकतो ! चांगलें औषधपाणी तरी नीट देतां ना त्याला ? मला एकदां पाहायला यायला हवें तिकडे. पण काय रे ! इतकें बेरडासारखें शिवरामला काळोखांत एकटा गांठून असा मरेमरेतों मारणारे हे लोक कोण होते रे ? मला नांवें सांग त्यांचीं."

आबा मास्तर म्हणाले, "गांवांतल्या दारूबाज गुंडांचें तें काम बापू ! सदानंद देसाई गांवांत आले त्या पहिल्या दिवसापासूनच सावळाराम देवळ्यानें दारूबंदीची मोहीम गांवांत जी सुरू केली आहे, तिच्यामुळें हें दारूबाजांचें रान चिडून खवळून उठलें आहे. पोलीस पाटलाला वाटलें कीं आपल्या धंद्याच्या मुळावर उठलेला मुलगा पोलीसांनीं पकडून नेला, आतां तरी दारूगुत्त्यावरचें पिकेटिंग थांबेल, आणि त्याला आपण मामलेदाराच्या पायां पडून सोडवून आणूं. पण गांधीजींच्या पायांची पुण्याई एवढी थोर कीं पोलीसांनीं एक सावळाराम पकडला तर त्याच्या ऐवजीं गांवांत शाळकरी पोरांपासून गांवकरी थोरांपर्यंत घरोघरचे सावळाराम दारू न प्यायच्या शपथा घेत आणि घेववीत गांवच्या दारूबंदीच्या मोहिमेवर निघाले."

"शिवराम या लोकांचा गुरु असेल ! आमच्या गांवचा वल्लभभाई ना तो ?"

"तर ! म्हणून तर त्याच्यांवर गांवच्या अट्टल दारूबाजांचा आणि दारूबाजांना सामील असलेल्या पोलीसांचा एवढा दांत !"

" पोलीससुद्धां गुंडांना सामील म्हणजे कुंपणच शेत खाऊं लागलें म्हणायचें? पण खरें का रे हे लोक बोलतात तें? शिवरामवरच्या हल्ल्यांत त्या रावबा विचारे बेलिफाचा हात आहे हें तुला तरी खरें वाटतें का?"

" मला ढीग वाटतें बापू! पण काय करायचें आहे तें बोलून आतां? जाऊं देत त्या गोष्टी. अगोदर एवढें शिवरामचें काम करतां ना? जाऊं दे मला लौकर."

" अरे काम न करायला काय झालें? पण शिवराम जर इतका आजारी आहे, तर मग कशाला इतकी घाई करतो आहे पैसे तरी न्यायची? पैसे काय कुठें पळतात?"

" रावबा बेलिफाच्या जबड्यांतून जमनाला सोडवायचा ध्यास घेऊन बसला आहे शिवराम."

" म्हणजे? रावबा आणि जमना भांडलीं? मी तर समजत होतों कीं रावबानें तें ठिकाण खरेदी घेतलें तें जमनासाठीं."

" होय! असें होतें खरें. पण तीं दोघें भांडलीं; आणि रावबा आतां जमनाच्या अब्रूचे सगळया प्रकारांनीं धिंडवडे काढायला निघाला आहे. हाडवैरी झाला आहे तो तिचा आतां. कालपासून त्यानें जमनाच्या दारापाशीं म्हाराचें धरणें बसवलें आहे कीं आजच्या आज ठिकाण सोडून चालती हो. नाहीं तर म्हाराकडून झोंपडी पेंचून टाकीन आणि तुला ठिकाणाबाहेर हाकलून देऊन ठिकाणाचा कबजा करीन."

" अरे वाः! हा फारच शहाणा दिसतो रावबा!"

" अहो! आधीं रावबा मुळांत मुलुखाचा संशयखोर आणि तशांत व्यसनी. दारूच्या धुंदींत त्या दिवशीं जमनाकडे जाऊन तिला नाहीं नाहीं तें बोलला. झालें! भांडलीं दोघें!"

" केव्हां बोलला? त्या पहिल्या दिवशीं आठ दिवसांपूर्वी गंगारामाच्या दारूगुत्त्यावर कडाक्याचें भांडण झालें त्या दिवशीं?"

" होय. मस्करीची कुस्करी झाली. झालें! कांट्याचा नायटा झाला. मग रावबानें तुमच्याकडून तें ठिकाण खरेदी घेतलें तें जमनावर सूड उगवण्यासाठीं."

" अरे ! हें मला माहीत असतें तर मी मुळींच ठिकाण खरेदी दिलें नसतें त्याला. मी तर त्याला सांगत होतों, कीं ठिकाण जमनाच्याच नांवानें खरेदी करूं या, आणि तूं हवा तर गहाणदार हो. पण त्याला तें पटेना. आणि तेवढ्यांत कुणीसें मला सांगितलें, कीं त्या दोघांचें पाट लावायचें ठरलें आहे. मी म्हटलें जाऊं दे. बाकी मला आपलें अगोदर-पासूनच वाटत होतें हो, कीं हा दारूबाज माणूस जमनाला कांहीं सुख द्यायचा नाहीं. बेलिफाची नोकरी ! पैसे खाईल तेवढे थोडे. दारू पितो त्याला कांहीं सुमार ! त्या दिवशीं तुमच्या घरावर जप्ती घेऊन आला तोदेखील असाच ओ होईपावेतों दारू पिऊन झिंगून आला होता म्हणे. बरें, आतां काय म्हणतो राबबा ? "

" सापासारखा उलटून डसतों म्हणतो जमनाला! दुसरें काय ? शिवरामला तिचे हे वनवास बघवत नाहींत म्हणून तो हे पैसे घेऊन तें ठिकाण पुन्हा जमनाच्या नांवानें खरेदी घेऊन देणार आहे. त्यासाठीं ही इतकी धांवपळ "

" रावबा ठिकाण सोईनें द्यायला तयार तरी आहे काय पण ? "

" तो तयार झाला आहे. अगोदर होत नव्हता; पण गंगारामानें मध्यें पडून तिऱ्हाइती केली तेव्हां कसाबसा एकदांचा कबूल झाला आहे. आज किंवा उद्यां देवळांत गांवकऱ्यांचा मेळा बसवून निकाल लावणार आहों याचा. "

" त्याचा निकाल लावूं आपण हवा तसा. पण शिवरामला म्हणावें तूं अगोदर बरा हो. ठिकाण कुठें पळतें आहे ? आणि पैसे तरी ? "

" पण रावबा अगदीं एकेरीवर आला आहे. केवळ एवढ्यासाठीं आठ दिवसांची रजा घेऊन गांवांत येऊन राहिला आहे तो. "

" येऊं दे. राहूं दे. मला काय करतो एकेरीवर येऊन तो ? त्याला सांग माझा निरोप. "

आबा मास्तरांना शास्त्रीबुवांच्या सावकारी चालढकलीचा चांगला परिचय होता. ते चिंतेंत पडून म्हणाले, " मग काय शिवराम आल्या-खेरीज पैसे मिळणार नाहींत ? "

"अरे, तसें नव्हे! असा भलताच संशय कधीं आणूं नये मनांत माणसानें. शिवराम नाहीं पण तूं आलास हें काय कमी आहे? आणि ह्या चिठ्ठीची तरी काय गरज होती? नुसता निरोपदेखील पुरला असता. लाखांतलीं माणसें तुम्ही, देशासाठीं मरायच्या तयारीनें निघालेलीं. तुमच्या शब्दांपेक्षां चिठ्ठीची रे काय मातब्बरी? माणसासाठीं पैसा आहे आबा! पैशासाठीं माणूस नाहीं." शास्त्रीबुवा त्या चिठ्ठीची घडी करून पुढ्यांतील कलमदानाच्या आंतल्या कप्प्यांत ठेवीत फडताळांतून दस्तैवजी कागदपत्रांचा रुमाल काढून त्याची गांठ सोडीत म्हणाले, "मी इतके दिवस तुझी वाटच पाहात होतों आबा! बरें हें बघ, हरिबाला बोलावून मीं त्याची समजूत केली आहे. हो! मी त्याला उघडच म्हणालों कीं असें जळांत राहून माशाशीं वैर करून कसा पल्ला येईल तुझा? दिवस कसे कठीण आहेत. देश कसा चोहों बाजूंनीं पेटला आहे. आणि हा आपला निवाडे आणि दरखास्ती घोकीत बसतो. मी खणखणीत सांगितलें कीं मी जिवंत असेतों माझ्या डोळ्यां देखत तरी माझ्या गांवच्या कुळाचा संसार मोडून मांडव झालेला मला पाहवायचा नाहीं. सदबा जरा बरा झाला म्हणजे आपण मिटवून टाकूं हें खेकटें. तूर्तास असें करा,—घरभाटाची एकसाली कबुलायत करून देऊन घाला ना त्या हरिबाच्या डोंबलावर! किंवा हवी तर माझ्याच नांवानें करून द्या. तूर्तास मी त्याचे दरखास्तीचे पैसे भरतों आणि तुमच्यासाठीं घरभाट माझ्या नांवानें करून घेतों. मी त्याला सांगतों. माझ्या शब्दाबाहेर जायचा नाहीं तो."

शास्त्रीबुवांचें तोंडानें हें निरूपण चाललें असतांना त्यांचे हात आणि डोळे त्या दस्तऐवजाच्या पुडक्यांतून कसलासा एक कागद शोधण्यांत गढून गेले होते. कागद शोधतां शोधतां त्यांनीं हा खडा टाकून पाहिला. पण आबा मास्तर वळण्याचें कांहीं चिन्ह दिसेना.

आबा मास्तर पापभीरु होते. देशसेवक होते. मनाचे सरळ होते. पण भोळे नव्हते. आणि हरिबा देवधरही निरुपायानें शास्त्रीबुवांच्या कचाट्यांत सांपडला. शेतकरी कूळ म्हणून शास्त्रीबुवांच्या शब्दापुढें

त्याला कसायापुढच्या गाईप्रमाणें मान वांकवावी लागली. आबा मास्तर हें सारें जाणत होते. जप्तीच्या त्या दिवशीं सायंकाळपासून हरीबा जो शरमेनें घरांत तोंड लपवून बसला होता तो आजपावेतों वाडींत दिवसा उजेडीं कुणाच्या घरीं फिरकला नव्हता. त्याला आपल्या नांवावर सदबा मेजाऱ्याच्या घरादाराची झालेली ती वाताहत मरायला पुरे झाली होती. अचानक ही जप्ती सदबा मेजाऱ्याच्या घरावर आणविण्यांतला शास्त्रीबुवांचा कावा हरिबाला प्रथम नीटसा माहीत नव्हता. रावबा विचारे बेलिफानें सदबाच्या गोठ्यांतली नुकती पंधरा दिवसांपूर्वी व्यालेली तानपी म्हैस व बैल जप्त केले आणि सदबाला ह्या ऐन संकटाच्या वेळीं हातभार लावण्यासाठीं पन्नास रुपये घेऊन पुढें आलेल्या शास्त्रीबुवांच्या गोठ्यांत तीं जनावरें नेऊन बांधलीं गेलीं, तेव्हां त्या जप्तीचा अर्थ हरिबानें ओळखला. पण आयत्या वेळीं करतो काय? अडकली गाय आणि फटके खाय तशी बिचाऱ्याची अवस्था झाली होती.

आज देखील शास्त्रीबुवा जे आपल्या जप्त झालेल्या घरभाटाविषयीं इतकी साखरघोळ भाषा बोलत होते, त्या साखरेच्या अवगुंठनांतील विषाच्या गोळीची चव आबा मास्तरांना चांगली कळत होती. म्हणूनच त्यांनीं शास्त्रीबुवांचें बोलणें ऐकलें न ऐकलेंसें केलें.

शास्त्रीबुवांनीं तो एकंदर रागरंग ओळखून एकदम एका क्षणांत पवित्रा बदलला. ते म्हणाले, "बाकी आबा! गांधीजींच्या नांवाची शपथ तुम्ही आम्ही गांधीखुळे लोक जितक्या निष्ठेनें पाळतों, तितक्या निष्ठेनें सारे लोक नाहीं रे पाळीत! कालचीच गोष्ट सांगतों. एका क्ष माणसाला अडल्या गरजेला प्रॉमिसरी नोटीवर पैसे दिले होते. ती नोट मुदतींतून जाते हें माहीत असून देखील मीं दावा केला नाहीं. गांधींचे लोक ना आम्ही! गांधी सांगतात कीं कोर्टकचेऱ्यांवर बहिष्कार घाला म्हणून. मग काय आम्हीं कॉंग्रेसच्या लोकांनीं गांधींचा शब्द मोडायचा? सरळ मनानें वागणाऱ्या धनकोच्या तोंडाला अशीं कायद्याचीं पानें पुसावीं का रे? तूंच सांग. तूं करशील कधीं असें? आमचा सदबा तसा नाहीं हो! उगीच काय बोलावें? मला तो मागेंच म्हणाला होता. माझी प्रॉमिसरी नोट मुदतींतून गेली तरी नोटीचे तुमचे पैसे बुडवायचा नाहीं,

असें त्यानें तेव्हांच माझ्या पायावर हात मारून सांगितलें होतें. कामापुढें त्याला माझ्याकडे येऊन नवी प्रॉमिसरी नोट करून देतां आली नाहीं म्हणून त्याला मी लबाड म्हणेन कीं काय ? देईल करून उद्यां बरा झाला म्हणजे नवी नोट ! त्याचें काय एवढें मोठेंसें ! "

सदबा मेजारी आज खुळावला आहे. त्याला ह्या प्रॉमिसरी नोटीची काय आठवण असणार !– असा अचूक अंदाज करून बापटशास्त्र्यांनीं मागेंच कर्जाऊ रकमेचा भरणा होऊन खरोखर निकालांत निघालेली, शेवटचा हप्ता घेतेवेळीं आतां कुठें सांपडत नाहीं या सबबीवर शेरा मारून परत देण्याची ठेवून दिलेली ती प्रॉमिसरी नोट आज हुडकून काढली होती. ती त्यांनीं आबा मास्तरांच्या हातीं देत म्हटलें, " ही पाहा. जवळ जवळ वर्षामागें मुदतींतून गेली आहे. तुला आठवण आहे ? पण तुला तरी कशी रे असणार आठवण ? तूं तेव्हां परगांवीं शाळेंत मास्तर होतास. आठवतें ? पण वर्ष होऊन गेलें म्हणून काय मी ह्या होऊन गेलेल्या वर्षाचें व्याज मागेन सदबापाशीं ?" ते त्या प्रॉमिसरी नोटीकडे पाहात म्हणाले, " आणि आतां सदबाचें तर डोकेंच फिरलें आहे. आतां घरांत कर्तासवरता पोरगा तूं. बाबांनीं काढलेलें कर्ज तूं आपणाला माहीत नाहीं म्हटलेंस तर मी एका शब्दानेंही वांकडे न बोलतां ही शंभर रुपयांची रक्कम व्याजमुदलासह गंगार्पण म्हणून स्वस्थ बसेन. अरे, रक्कम गेली तर काय परक्याकडे थोडीच गेली ! "

" पण शास्त्रीबुवा ! गांधी महाराजांनीं आम्हा शेतकऱ्यांना असली लबाडी करायला शिकविलेलें नाहीं. माझ्या बाबांचें डोकें फिरलें म्हणून काय झालें ? मी त्यांचा मुलगा त्यांच्या नांवाला बट्टा लावणार नाहीं. घेतलेलें कर्ज बुडवून सावकाराच्या नरकांत जायचें नाहीं आम्हांला. आम्ही जर तुमचें देणें लागत असेल—"

" अरे ती नोट वाचून बघ कीं ! कागद काय खोटें बोलतो ? हवी तर ती तुझ्यापाशींच ठेव. घरीं नेऊन सदबाला दाखवून विचार. तो म्हणाला आणि तुलाही नवी नोट करून द्यावीशी वाटली तर दे करून नाहींतर राहिलें. जा, असा याच पावलीं घरीं जा आणि विचारून ये सदबाला. तोंवर मी देखील आंघोळ करून देवपूजा आटोपून घेतों."

आबा मास्तर बापटशास्त्र्यांच्या पुढ्यांतला घड्या घातलेला कोरा कागद घेण्यासाठीं हात पुढें करीत म्हणाले, "घरीं जाऊन तरी काय आणि कुणाला विचारायचें बापू? तुम्ही काय खोटें सांगतां! आणा इकडे तो कागद. मी देतों ती प्रॉमिसरी नोट लिहून."

"अरे आबा! तुझ्यासारख्या सच्चा माणसाचा शब्द एक सोडून दहा प्रॉमिसरी नोटांच्या मोलाचा आहे. आपल्यावरचें इंग्रजांचें राज्य कायद्यानें चालतें, म्हणून कायद्याला भिऊन ह्या लेखी चिठयाचपाट्या करायच्या एवढेंच! दुसरें काय?" असें म्हणत शास्त्रीबुवांनीं तो कोरा कागद, त्याखालीं धरण्यासाठीं पुष्टिपत्र व दौतलेखणी आबांपुढें ठेवली.

आबा मास्तरांनीं लगोलग ती प्रॉमिसरी नोट लिहून पुरी केली. तेवढ्यांत शास्त्रीबुवांनीं दप्तरांतील तिकिटाच्या लखोट्यांतून नोटेला लागणारें तिकीट हुडकून काढलें. नोट लिहून होतांच तें तिकीट जिभेच्या टोंकानें थुंकी लावून ओलें करून आपल्या हातानें त्या कागदावर चिकटविलें. मग त्यावर आबा मास्तरांनीं सही केली.

इतका वेळ आजोबा व्यवहारांत गुंतले आहेत म्हणून त्यांना आंघोळीला उठा म्हणून सांगायला आलेला त्यांचा नातू भास्कर दरवाजामागें खोळंबून उभा होता तो पुढें येऊन म्हणाला, "आजोबा! आंघोळीला उठा कीं! बारा वाजून गेले! सारीं जेवायचीं खोळंबलीं आहेत."

"हा आलों कीं!" असें म्हणत शास्त्रीबुवांनीं घाईघाईनें ती प्रॉमिसरी नोट पुष्टिपत्राच्या घडींत घालून पुष्टिपत्र फडताळांत ठेवलें व फडताळाला कुलूप लावण्यासाठीं जानव्यांतली किल्ली काढूं लागले.

"तेवढें शिवरामचें काम करा ना बापू! स्वतःच्या डोळ्यांदेखत काय निरवानिरव करायची ती करून मोकळा तरी होऊं दे बिचारा!" अस्वस्थ चित्तानें आबा मास्तर म्हणाले.

"अरे खरेंच कीं! किती, सहाशें रुपये द्यायचे ना शिवरामला? तेवढे मोडलेले आहेत कीं नाहीं नकळे." असें म्हणत शास्त्रीबुवांनीं जवळचें कपाट उघडून आंतील पैसे ठेवण्याची शिसवी पेटी पुढें ओढून आंतला उजवीकडचा चोरखण उघडला आणि आंतून एक नोट बाहेर

काढून ती न्याहाळीत आबा मास्तरांपुढें धरीत म्हटलें, "मोड नाहीं ऽऽ! हजार रुपयांच्या नोटेची इथें कुठें जवळपास मोड मिळायची नाहीं. यांच पावलीं माघारा जा आणि शिवरामला सांग, स्वतः शास्त्रीबुवा संध्याकाळीं पैसे मोडून आणून तुला देतील. कांहीं भिऊं नकोस म्हणावें. हेंच काय, आणखी पैसे तुला लागले तरी मी देईन. माणसाच्या जिवापुढें पैशाची रे कसली किंमत? जा, सांग त्याला."

हें बोलतांना भावणीचें शेत त्यांच्या मनांत गुदगुल्या करीत होतें; आणि वृंदावन शेताचा त्या रावबाला खरेदी न दिलेला तो कोंपरा.

तोंच भास्कर पुन्हा पुढें येऊन कांहींसा त्रासून म्हणाला, "अहो आजोबा! उठा ना! पानें वाढलेलीं केव्हांचीं. थंडगार होऊन गेलीं देखील."

"चला, हा उठलोंच. नानूला चल म्हणावें." शास्त्रीबुवा ती हजारांची नोट पुन्हा पेटींत ठेवून पेटीला कुलूप लावून कपाट बंद करीत आबा मास्तरांकडे वळून म्हणाले, "तुझें जेवण व्हायचें असेल ना रे आबा अजून? इथेंच खातोस का दोन घांस?"

"नाहीं. माझी अजून आंघोळ देखील व्हायची आहे बापू!" आबा मास्तर हताशपणें स्वतःशीं हळूसा एक उसासा सोडीत म्हणाले.

"बरें तर! थोडें लोणचें घेऊन जा.—भास्कर! घरांत सांग जा आबा मास्तरांना केळीच्या पानावरून थोडें लोणचें द्या म्हणून." असें सांगत शास्त्रीबुवा उठून आंघोळीला गेले.

आबामास्तरांना लोणचें नको होतें; तसलें कांहीं देखील नको होतें. त्यांना जें हवें होतें तें कांहीं त्यांना मिळालें नाहीं. पण म्हाताऱ्याचा शब्द मोडून जातां येत नाहीं म्हणून ते केवळ स्वतःच्या इच्छेविरुद्ध थांबले.

स्वयंपाकघरांतून शास्त्रीणबाईंनीं ताक घुसळतांना तें ऐकून भास्करला हांक मारली. स्वयंपाकघरांतील फडताळांत मागच्या उजव्या कोंपऱ्यांत 'लोकांना देण्याच्या' लोणच्याची बरणी होती तिकडे बोट दाखवून त्यांनीं सांगितलें, "तिथला तो केळीच्या पानाचा द्रोण घे आणि त्यांत त्या बरणींतलें दोन डावभर लोणचें काढून आबा मास्तरांना दे जा."

भास्करनें शास्त्रीबुवा आंघोळ करून घरांत येतात तोंपावेतों केळीच्या द्रोणांत लोणचें काढून आबा मास्तरांना नेऊन दिलें. शास्त्रीणबाईनीं मुद्दाम त्याला त्या द्रोणावर दुसरा रिकामा द्रोण झांकण घालायला दिला. कालच त्यांनीं त्या बरणींतल्या लोणच्यांत पडलेले किडे वेंचून टाकून व बरणीच्या तोंडाशीं निवलीच्या डिंगऱ्या ठेवून स्वच्छ केलें होतें. पण न जाणो एखाद दुसरा किडा आंत असला तर, म्हणून त्यांनीं लोणच्याच्या द्रोणावर द्रोण झांकण घालायला दिला.

माजघराच्या खिडकींतून ओसरीवर उभ्या असलेल्या आबा मास्तरांना लोणच्याचा द्रोण घेऊन जातांना पाहून शास्त्रीणबाई हांक मारून म्हणाल्या, "अरे आबा! हें बघ. घरून कुणाला तरी भांडें घेऊन पाठवून दे. वाटीभर ताक देत्यें सदबाला."

"बरें." म्हणून आबा मास्तर दरवाजाबाहेर पडले. 'बरें' म्हणतांना त्यांनीं हताशपणें कर्माला लावलेला हात कुणाला दिसला नाहीं.

बापटशास्त्र्यांच्या घरांत या उन्हाळ्याला कांहीं दुभतें नव्हतें. गोठ्यां-तली गाय आणि म्हैस दोन्ही गाभण होत्या. तें दुभतें हक्काचें मिळावें म्हणून आपल्या गोठ्यांतील नवीनच व्यालेल्या आपल्या दुधाळ म्हशीवर डोळा ठेवून शास्त्रीबुवांनीं इतक्या तांतडीनें दरखास्तीची अंमलबजावणी करवली हें आबा मास्तरांना आतां कळून चुकलें होतें. म्हैस व बैलाची जोडी—पुढें मागें तुम्हांलाच याचा उपयोग होईल अशीं आबा मास्तरांच्या आईच्या तोंडाला तोंडदेखलीं पानें पुशीत शास्त्रीबुवांनीं देवगडाहून तीं गुरें चार दिवसांपूर्वीच लिलांवांत विकत घेऊन घरीं आणलीं होतीं. लिलांवांत आलेली ती गुरांची पन्नास रुपये किंमत दरखास्तीच्या रकमेपोटीं जमा करण्यांत आली होती. कांहीं नाहीं तरी गेला बाजार निदान साठ रुपये तरी म्हशीची किंमत आली असती. आणि बैलांच्या जोडीला निदान ऐंशी नव्वद रुपये वाटेचा चोर देता असता. पण मामले-दार पडले शास्त्रीबुवांच्या ओळखींतले. शिवाय शास्त्रीबुवांनींही त्यांना समजावून सांगितलें "गरीब बिचारा शेतकरी—उद्यां मृगाला पदरीं जोत नाहींसें झालें म्हणजे राबेल असेल ना! त्याला वांचवण्यासाठीं ही सारी धडपड मी करतों आहे रावसाहेब!"

मामलेदार देखील मनाचे थोडेफार कनवाळू व शास्त्रीबुवांचे सगे-सोयरे होते. त्या गुरांच्या लिलांवाचा बोभाटा न करतां त्यांनीं तडका-फडकीं चटावरच्या श्राद्धासारखें लिलांव उरकून घेतलें, आणि दुसऱ्या कुणाला लिलांव बोलण्याची संधी न देतां एकाच दिवसांत तीनही वार बोलून पुरे केले. आणि शास्त्रीबुवांचा पन्नास रुपयांचा सवाल कायम करून तीं जनावरें त्यांना देऊन टाकलीं.

त्याच आपल्या आवडत्या दुभत्या म्हशीचें हें ताक—त्या आपल्या गोठ्यांतील कामधेनूच्या गोरसाचें कुळचाभर फिळकवणी त्याच साव-काराची बायको उदारपणानें आपणाला भीक वाढायला पुढें आलेली पाहून आबा मास्तरांनीं दुःखानें कर्माला हात लावला होता.

•

तापलेल्या सांडसानें काळजाला डागण्या दिल्यासारखे त्या आठवणीच्या दुःखाचे मनाला बसणारे चटके मुकाटपणें सहन करीत आबा मास्तर आपल्या घराकडे चालले होते. शास्त्रीबुवांच्या घरापासून अर्ध्या हांकेच्या अंतरावर त्यांचें घर होतें. दरम्यान गवताचें भरडी रान होतें. बापट-शास्त्र्यांचेंच तें भरड ठिकाण. तें सदबा मेजाऱ्याकडे खंडानें होतें. पिकासाठीं नव्हे तर गुरांना चारा वैरण व शेताच्या जाळभाजेसाठीं कवळ-काड मिळावी यासाठीं सदबानें तें ठिकाण खंडानें घेतलें होतें. ठिकाणाच्या मध्यभागीं एक लहानसें टेंकाड होतें. त्या टेंकाडावर वडाचें मोठें झाड होतें. त्या झाडाखालीं गुरांची गोठण होती. रोज सदबा मेजारी त्या गोठणीवर झाडाखालीं चकमक झाडून विडी पेटवून ओढीत आपलीं गुरें राखीत बसायचा.

त्या वाटेनें घरीं जातां जातां आबा मास्तरांचें स्वाभाविकपणें त्या गोठणीकडे लक्ष गेलें. त्याबरोबर गोठणीवरचीं गुरें आनंदानें फुरफुरूं लागलीं. म्हैस डरकाळ्या फोडूं लागली. तिचें वासरूं शेंपटीचा गोंडा वर करून बागडूं लागलें. बैल जणूं नारद तुंबरूसारखे आबा मास्तरांच्या स्वागतासाठीं वर मान करून हं... आसुसलेल्या डोळ्यांनीं त्यांच्याकडे पाहूं लागले.

आबा मास्तरांचींच गुरें होतीं तीं. पण आज तीं त्यांचीं नव्हतीं. तीं चार दिवसांपूर्वीं पन्नास रुपये किंमतीला बापटशास्त्र्यांना विकलीं गेलीं होतीं. त्या लेंकरांसारख्या गुरांकडे पाहून आबा मास्तरांच्या डोळ्यांतून टपटप अश्रू गळूं लागले. तीं गुरें आतां आपलीं नाहींत, सावकाराचीं आहेत, याचें भानही न बाळगतां ते आपल्या नेहमींच्या संवईप्रमाणें जिवाच्या ओढीनें पुढें गेले. त्या दोन बैलांतला पोंवळा बैल त्यांतल्या त्यांत त्यांचा जिवापेक्षांही जास्त आवडता. तो त्यांना पाहतांच एकदम चौक टाकून सामोरा आला व वर मान करून केविलवाण्या पोरक्या नजरेनें त्यांच्याकडे पाहूं लागला.

"पोंवळ्या!" अशी ऊर भडभडून आल्यासारखी हांक मारीत आबा मास्तरांनीं पोंवळ्याच्या गळ्याला मिठी मारली व त्याच्या गाल-फडावर आपला गाल टेकून अश्रूंनीं डबडबलेल्या नजरेनें त्याच्याकडे पाहात उजव्या हातानें ते त्याच्या मानेखालीं खाजवूं लागले.

तोंच म्हैस पुन्हा ओरडली. म्हशीचें वासरूंही पुन्हा शेंपटीचा गोंडा फिरवून बागडत आबा मास्तरांकडे येऊं लागलें.

"कुणाचीं गुरें आणि कुणाचा आबा!" असें स्वतःच्या मनाशीं म्हणत त्यांनीं अमळशानें आपल्या मिठींतून जणूं डोळ्यांवर कातडें ओढून पोंवळ्याची मान दूर सारली आणि मुकाटपणें घरची वाट धरली.

तें समोरचें टेंकाड चढून जातात तोंच सदबा त्या वडाच्या बुंध्याशीं वेड्यापिश्या स्थितींत येऊन बसला आहे, व मुलां–नातवंडांसारखे तो बैल, ती म्हैस, तें वासरूं हीं गुरें त्याच्या आवतींभोंवतीं रेंगाळत आहेत असें दृश्य आबा मास्तरांना आढळलें. बिचारा सदबा!—खुळा खुळा म्हणून वाडींतलीं पोरें थट्टा मस्करी करीत दगड घेऊन त्याच्या पाठीला लागलीं; तो त्रास चुकविण्यासाठीं त्यानें नेहमींच्या संवईप्रमाणें गोटण गांठली होती. म्हशीच्या गळ्याला मिठी मारून सदबा तिच्याशीं बोलत होता, "कुठें रानांत मेली होतीस इतके दिवस? मीं म्हटलें तुला वाघानें धरलीन. चल गोठयांत. आज आठ दिवस दूध नाहीं पोराला माझ्या..."

जणूं काय ती म्हैस आपल्या तान्ह्या मुलाची दुधावाचून उपासमार करणारी गुन्हेगार होती अशा भावनेनें रागानें तिच्या एक थोबाडींत मारून सदबानें वेडाच्या भरांत तिला दूर लोटलें आणि तिच्याकडे पाठ फिरवून बसला. मुलगा जवळ आलेलाही त्याला जाणवला नाहीं.

"चला घरीं!" असें म्हणत आबा मास्तर त्याचा हात धरून त्याला आपणाबरोबर घराकडे चालवीत नेऊं लागले.



हरिबाचा मांगर त्या वाटेवरच जरा बाजूला होता. मांगरासभोंवारचें कुंपण गुरांनीं मोडून त्यांत भगदाड पाडलें होतें. तें हरिबा एरंडाचे खुंट पुरून त्यांना कांटेरी बांधून दुरुस्त करीत होता. दुरूनच त्याला त्या बापलेकांची चाहूल लागली. त्यासरसा एखाद्या गुन्हेगारानें तोंड लपवावें तसा तो कुंपणाच्या धड बाजूच्या आडोशाला मटकन खालीं बसून लपला. आबा मास्तर व सदबा यांचें तिकडे मुळींच लक्ष नव्हतें. पण हरिबा त्यांच्या चर्येवर आपली गुन्हेगारीच्या जाणिवेनें भारावलेली नजर कुंपणाच्या झरोक्यांतून खिळवून बसला होता.

जातां जातां त्या बापलेकांनीं बोलण्याच्या भरांत सहज शून्य दृष्टीनें इकडे तिकडे पाहिलें, तेव्हां त्यांची नजर त्या मांगराकडे एकदोनदां वळली. पण हरिबाला तें पाहून डोकीवर आकाश कोसळल्यासारखें वाटलें.

"काय म्हणत असतील हे बापलेक मला मनांतून? मांग कसाब म्हणत असतील! त्यांना काय माहीत कीं त्यांच्या माना चिरणारा खरा कसाब हा हरिबा तसून तो बापटशास्त्री आहे म्हणून? अरेरे! हरिबा! शेतकऱ्याच्या जन्माला आलास आणि शेतकऱ्याच्या धर्माला काळोखी फांसलीस! कसाब होतास तरी त्याहून बरें झालें असतें! —मी माझ्या हातानें माझ्या जिव्हाळ्याच्या शीवशेजाऱ्याची मान कापली असें म्हणून खराखुरा अपराधी म्हणून तरी तुला लोकांत उभें राहतां आलें असतें; आणि लोकांचे तळतळाट घेऊन केल्या पापाचें प्रायश्चित्त घेतां आलें असतें. केल्या चुकीबद्दल मी गांवच्या जमातीसमोर सदबाच्या पायां पडून त्याची माफी मागितली असती; सदबानेंही मला माफी केली असती. शेतकरी

कधीं शेतकऱ्याचा अंत पाहात नसतो. पण— !" तो कळवळ्यासरसा कपाळाला हात लावून स्वतःशीं उद्‌गारला, "दळभद्या हरबा! तूं कसाबाहूनही कसाब झालास. सदबाची मान चिरणारा सावकाराच्या हातांतला सुरा झालास तूं! हें मी कोणत्या तोंडानें बोलूं? बोललों तर तें कुणाला खरें तरी वाटेल? सदबा, आबा हे माझ्यावर विश्वास तरी ठेवतील का?..."

समोरून ते बापलेक जरा पुढें गेलेले पाहून हरिबाला क्षणभर हायसें वाटलें. तो हलेकच अंग सांवरीत उठून उभा राहिला व कुंपणाची अपुरी राहिलेली दुरुस्ती करूं लागला. मनांत मात्र तोच पश्चात्तापाच्या विचाराचा झंझावात जोराजोरानें वहात होता. आतां कसें करूं, काय करूं, असल्या आघातांनीं त्याचें मन एकसारखें हादरत होतें.

तेवढ्यांत ती म्हैस व तिचें वासरूं आणि त्यांच्या मागोमाग ते दोन बैल सदबा आणि आबा यांच्या मागोमाग सदबाच्या गोठयाची वाट चालतांना त्याला आढळले.

त्या म्हशीला पाहतांच त्याच्या काळजांत चर्रर झालें. म्हैस जप्तींत धरल्या दिवसापासून सदबाचा तान्हा मुलगा घोटभर दुधाला महाग झाला होता. सदबाची बायको म्हणजे साऱ्या वाडीची मायेची माऊली. अगदीं मध्यरात्रीं देखील कुणी घोटभर ताक किंवा चहापुरतें चमचाभर दूध मागायला जावो, नाहीं म्हणायचें त्या माऊलीला माहीत नाहीं. सदबाच्या गोठ्यांत ही म्हैस व्याल्या दिवसापासून त्या वाडीवरच्या गोरगरीब कुळवाडयांना गोठ्यांत गाय, म्हैस नसतांनाही घरांत दुभतें नाहींसें वाटत नसे. सदबाच्या घरांतलें दुभतें हें आपल्याच घरांतलें सत्तेचें दुभतें आहे असें त्यांना वाटे. त्याच त्या माउलीला—सदबाच्या सीतेला तान्ह्या पोराकरितां घोटभर दूध मिळविण्यासाठीं गेल्या पंधरा दिवसांत उभ्या वाडीभर वणवण दांत विचकीत हिंडतांना हरिबानें पाहिलें होतें.

तें सारें हरिबाला त्या म्हशीकडे पाहून आठवलें. त्या आठवणीसरसें त्याचें सर्वांग खिन्नतेनें थरारूं लागलें. मोडलेल्या कुंपणाला कसें बसें

ठिगळ लावून तो मनांतून कांहीं तरी निर्वाणीचा बेत योजीत, मांगराच्या मागच्या वाटेनें पण अंग चोरीत, आपणाला कोणी 'हा सदबा मेजाऱ्याची, त्याच्या बायकोपोराची, त्याच्या गुरावांसराची मान चिरणारा कसाब' असें शापीत पाहात तर नाहीं ना, असा भीत भीत तो आपल्या घराकडे वळला.

घरापाशीं येतांच आबा मास्तरांनीं मागाहून कोण येतें आहे हें पाहण्यासाठीं मान मागें वळवली. तों तीं गुरें गोठयाकडे येतांना त्यांना आढळलीं. त्या बिचाऱ्यांना काय माहीत कीं आपण आतां आपल्या घराला मुकलों, आणि आपल्या धन्याच्या सावकाराचे गुलाम झालों आहों!

आबा मास्तरांनीं डोळ्यांत उभे राहिलेले दुःखाश्रू सदऱ्याच्या डाव्या बाहीनें पुशीत गोठ्याच्या कुंपणांतील निर्गुडीच्या झाडाची एक दोन हात लांब शिरटी मोडून काढली आणि त्या शिरटीनें त्या गुरांना झोडपून माघारीं सड्यावर पिटाळून लावलें. कांहीं केल्या तीं गुरें माघारीं जाईनात, तेव्हां त्यांनीं रागावून पायाखालचे सुपारीएवढे लहानगे दगड उचलले व त्यांना फेंकून मारले आणि रिकाम्या गोठयाचें कवाड लावून घेतलें.



"कुठें चाललास बाबा?" सदबाला तेवढ्यांत आबा मास्तरांचा डोळा चुकवून आंकडी, कोयती कमरेला बांधून दोर हातीं घेऊन निघालेला पाहातांच आबा मास्तरांनीं विचारलें.

"म्हशीच्या वासराला चार नको? नुसतें रानांत चरून का पोट भरतें? जरा जाऊन चार घेऊन येतों. गोठयांत दाव्याला बांधून गुरांना उपाशी कशीं ठेवायचीं रे?" सदबा अगदीं शाबूत माथ्याच्या माणसासारखा मागें वळून आबा मास्तरांकडे पाहात म्हणाला.

"तूं मुकाट्यानें घरांत बस जा पाहूं! गुरांचें चारापाणी पाहीन मी मग." आबा मास्तर सदबाच्या कमरेची आंकडी कोयती सोडून घेत म्हणाले.

"मी पाहीन! मी पाहीन काय? दुपारच्या भर उन्हांत गोठ्याच्या आसऱ्याला गुरें आलीं तीं रानांत पिटाळून लावलींस. कातळावरचे धोंडे-

सुद्धां करपून जळून जातील असलें हें दुपारचें रखरखीत ऊन्ह. ह्या उन्हांत गुरांनीं रानांत जाऊन काय रे चरायचें ?" सदबा कांहींशा रागानें कमरेची आंकडी कोयती सोडून मोकळी करून देत हातांतील दोर दूर फेंकीत स्वतःशींच बडबडत परड्यांत निघून गेला.

तोंच घरांतून केंविलवाणी हांक आबा मास्तरांना ऐकूं आली, "आबा !"

ती आईची हांक ऐकून आबा मास्तर तसेच आंत माजघरांत गेले. माजघरांत जातां जातां समोरच आई तान्ह्या लेंकराला—त्यांच्या धाकट्या लाडक्या भावाला—मांडीवर घेऊन बसलेली पाहून त्यांनीं विचारलें, "काय आई ! धोंडूचें कसें आहे आतां ?"

जवळ न्हाणींतल्या राखेनें भरून ठेवलेल्या मातीच्या फुटक्या थाळींतील राख घेऊन त्या मुलाच्या गार पडणाऱ्या पायांना चोळतां चोळतां ती पदरानें डोळे पुशीत मुसमुसत उद्गारली, "आज उजाडल्यापासून तर लेकरूं डोळा देखील उघडीत नाहीं. शेजारच्या घरून गोकरणभर दूध मागून आणलें तें देखील धड पिईना. तूं आतां जेवल्यावर शाळेंत जाशील ना ? तेव्हां भगवान गांवकराला सांगून देवाला गाऱ्हाणें तरी घालायला लाव. आज देवाचे अवसर काढणार आहेत म्हणे. सावित्री आतां आली ती सांगत होती. त्या अवसराला पडस्थळ घालून तरी विचार देवाला, आमच्या जन्माचे असे वनवास कां चालवले आहेस म्हणावें ?"

"सावित्री आली होती ?" आबा मास्तरांनीं भुवया चढवून स्वतःच्या मनाशीं 'ती कां आली होती ? शिवराम जास्त आजारी आहे का ? कीं त्यानेंच पाठवली तिला पैसे आणायला ?' अशा लाख विचारांचें जाळें उलगडीत विचारलें.

" ती आली होती धाकट्या देसायांचा निरोप घेऊन. गांवांत म्हणे पोलीस आले आहेत. माणसांना पकडूं लागले आहेत म्हणे. शिवा म्हाराच्या पोराला पकडलें. आणखी कुणा एका दोघांना पकडलें म्हणे. राजाराम देवळ्याला पकडणार होते. पण तो गांवीं नाहीं आहे म्हणून सुटला. शाळेंत जाऊन तुझी देखील चौकशी करीत होते ते. धाकट्या

देसायांचा निरोप सांगायला मुद्दाम सावित्री आली होती.—" मांडीवरचें मूल तेवढयांत आंचके देऊं लागलें. त्याला नीट सांवरीत त्याच्या तोंडावर विखुरलेले केंस हातानें बाजूला सारीत दुःखी घोगऱ्या स्वरांत आई म्हणाली, " तुला सावध असायला सांगितलें आहे धन्यांनीं. "

" बरें! पण शिवरामचें कसें आहे म्हणत होती सावित्री? सकाळपासून त्याला फारच बरें नाहीं आहे. "

" त्याचें उलट जास्तीच आहे. "

" आणि मग कशाला आली सावित्री इकडे त्याला टाकून?" असें विचारीत आतां काय करूं कसें करूं असे सुखदुःखाचे प्रश्न आपल्या मनाला विचारीत आबा मास्तर तिथेंच मटकन् खालीं बसले.

●

" काय म्हणते प्रतिभा?" दुपारचें जेवण आटोपल्यावर शास्त्रीबुवा ओसरीवर पान खात बसले होते. ते समोरून निशिकांत चाललेला पाहून त्याला म्हणाले.

आजोबांचा तो प्रश्न ऐकतांच निशिकांत क्षणभर मनांत चमकला. तोंच शास्त्रीबुवांनीं पुन्हा प्रश्न केला, " येणार म्हणते का इथें प्रचारासाठीं? मी आप्पासाहेबांना लिहिलें होतें, ती मुद्दाम प्रचाराला इकडे आल्यासारखी आमच्या गांवाकडे येऊं दे म्हणून. शिरोड्याचा सत्याग्रह आतां अगदीं जवळ आला नाहीं? "

" होय!—बहुधा आज किंवा उद्यां इतक्यांत इकडे येईल ती. पत्र फार उशीरां आलें. " म्हाताऱ्याशीं प्रतिभाच्या पत्राच्या अनुरोधानें बोलतांना होणारी मनाची कुचंबणा टाळण्यासाठीं निशिकांतनें मोठ्या चतुराईनें विषयांतर केलें, " पण का हो आजोबा! हें 'कोंकण' पत्र कॉंग्रेसच्या विरुद्ध आहे का हो? "

" कां? काय लिहिलें आहे त्यांत? "

" नव्हे. पण याचा कोणताही अंक उघडून पाहिला तरी कुणाची ना कुणाची कुचाळी, टवाळी, कोंपरखळ्या आपल्या कुणाला तरी नेहमीं असायच्याच. "

जवळच भास्कर तो ‘ कोंकण ’चा ताजा अंक उघडून त्यावरून जिज्ञासा-पूर्ण पण चावट नेणती नजर फिरवीत होता. शास्त्रीबुवांनीं त्याच्याकडून तो अंक घेत म्हटलें, “ आण रे इकडे जरा तें पत्र. पाहूं आज संपादक त्यांत काय लिहितात तें. ”

उंदराच्या वासानें वळचणीला साप वळवळूं लागावा तशा वळवळत्या मनानें व वळवळत्या हातानें शास्त्रीबुवांनीं तो अंक उलगडून त्यांतील मजकुरावर धांवती नजर टाकली.

तों सापाला उंदीर मिळाला.

बापटशास्त्री ‘ कोंकण ’ पत्रांतील तें बातमीपत्र वाचूं लागले :

## काजरोळींतील रंगेल देशभक्ताच्या लीला

( लेखकः—**गांवकरी** )

नुकताच काजरोळी गांवांत महात्मा गांधींच्या नांवावर विक-णाऱ्या एका तरुण रंगेल देशभक्ताचा अवतार झाला आहे. शिरोड्याला होऊं घातलेल्या मिठाच्या सत्याग्रहाबाबत लोकांत जागृति करतां करतां जणूं काय वेश्यांचा उद्धार हें त्या सत्या-ग्रहाहून महत्त्वाचें कार्य म्हणून कीं काय, हा देशभक्त गांवांतील भावीण होऊं घातलेल्या एका तरुण मुलीला आपल्या प्रेमरंगांत रंगवून टाकण्यांत गुरफटून गेला आहे. गांवांत ब्राह्मणापासून महार—चांभार—मुसलमानापर्यंत सब गोलंकार करून जात—पात—तोडत समाजसुधारणेचें ढोलकें वेशीवर बडवतांना त्या तालावर हा रंगेल देशभक्त आणखी ज्या नव्या नव्या लीला करूं लागला आहे, त्यामुळें गांवच्या लोकांवरच नव्हे, सुखवस्तु जमीनदार शेट सावकारांवरच नव्हे, तर खुद्द त्याच्या उसनवारीच्या ऊर्फ दत्तक आईवर व औरस बापावरही ‘देवा! या देशभक्तापासून आमचें रक्षण कर’ असें देवाला आळवण्याची पाळी आली आहे. आपला गांवांत जम नीट बसावा व आपल्या सोनपितळी देश-भक्तीवर सोन्यासारखा फसवा उजाळा यावा हा डाव मनांत

धरून हा देशभक्त खोत–धारेकरी–जमीनदार यांच्याविरुद्ध कुळांना चिथावणी देत हलवायाच्या घरावर तुळशीपत्र ठेवीत आहे. आपली जमीनदारी (दत्तक जाऊन आयत्या बिळावर नागोबा बसून मिळवलेली) आपल्या ताब्यांत येतांच ती आपल्या कुळांना वांटून देण्याच्या लाल लाल लंब्या चवड्या बाता तो गांवांत मारीत असतो म्हणतात.

दारूबंदीच्या मोहिमेच्या नांवावर हा देशभक्त गांवांतील दारू-बाज गुंडांना चिथावणी देऊन परगांवाहून पोटभर दारू पिऊन यावयाला सांगतो, आणि मग ते दारूबाज सत्याग्रही स्वयंसेवक गांवच्या दारूदुकानांवर नंगा नाच घालून गांवाला अगदीं सळो कीं पळो करून सोडतात. महत्मा गांधींना आणि कॉंग्रेसला मान्य असलेली दारूबंदीची मोहीम ती हीच काय? कॉंग्रेसचे अधिकारी नाहींत तर सरकार तरी इकडे वेळींच लक्ष देणार नाहीं काय?

गांवांत आजकाल ज्याच्या त्याच्या तोंडीं झालेला दुसरा चर्चेचा विषय म्हणजे–पंढरपूरला गेलेली सौभाग्यवती विधवा पंढरपूरच्या आश्रमांत सुखरूपपणें प्रसूत होऊन पुन्हा नवी विटी, नवा दांडू, नवा खेळ खेळण्यासाठीं लौकरच गांवीं येईल अशी गांवचे त्या फंदांत पडणारे टोळभैरव अपेक्षा करत आहेत.

निशिकांत आज ‘कोंकण’ पत्राविषयीं इतकें खारट तुरट कां बोलत होता हें कोडें शास्त्रीबुवांना ‘काजरोळींतील रंगेल देशभक्ताच्या लीला’ वाचून उलगडलें. किंबहुना तें कोडें त्यांना पूर्वींच उलगडलें होतें. त्याचें उत्तर छापून आलेलें तेवढें पाहण्यासाठीं ते उत्सुक होते. सदानंद गांवीं आल्या दिवसापासून सर्पदंशाच्या दुखण्यानें अंथरुणाला खिळल्यामुळें आजपावेतों जरी प्रत्यक्ष प्रचारकार्य कांहींही करूं शकला नव्हता, तरी उगवत्या सूर्याच्या संधिप्रकाशाचें अमृत पिऊन फुलझाडांवरच्या कळ्या फुलूं लागाव्या आणि सारें जीवन उत्साहानें टवटवूं लागावें तशी टवटवी साऱ्या काजरोळी गांवावर आली होती. पण ती टवटवी टवटवीशी ज्या कॉंग्रेसभक्तांना वाटावी अशा कॉंग्रेसभक्तांहून

बापटशास्त्री, नाना अधिकारी हे खेडेगांवांतील प्रमुख काँग्रेसभक्त निराळ्या जातीचे होते. मोहोरलेल्या आंब्यावर खार पडून तो मोहोर करपून जावा तसा गांवच्या एकंदर जीवनावर सदानंदाच्या आगमनानें जणूं भयंकर रोग पडला आहे असें बापटशास्त्री व त्या मेरुमण्यांच्या प्रभावळींत आगें मागें असलेले इतर लोक यांचें आणि प्रत्यक्ष देसाईण-बाई व नाना यांचेंही प्रामाणिक मत झालें होतें. प्रत्यक्ष प्रमाणाच्या पुराव्यानेंच त्यांच्या मताचा प्रामाणिकपणा त्यांच्या मतें सिद्ध झाला होता. भास्करसारख्या ब्राम्हणाच्या मुलांना शिवून उघडपणें मिळून मिसळून वागण्याइतकीं 'म्हारड्यांचीं पोरें' माजलीं होतीं, गांवांत इतर सर्व माण-सांच्या बरोबरीनें वागण्याइतकीं गांवांतलीं 'म्हारडीं चांभारडीं' शिरजोर होऊं लागलीं होतीं, हा सारा अनर्थ सदानंद गांवीं आला म्हणून! घरीं, दारीं, देउळीं, राउळीं सारा भ्रष्टाकार. तसेंच शांतू भावीण बिथरून आपण भावीणपणा करणार नाहीं असें हट्टानें सांगूं लागली ही गांवच्या देवाच्या सेवेंत केवढी मोठी अडचण उत्पन्न झाली! भाविणीनायकिणीच्या मुलींनीं जर लग्नें करायचीं, तर—नाना अधिकारी, देसाईणबाई, बापटशास्त्री या मंडळींचें विचारणें असें कीं—मग काय तुमच्याआमच्यासारख्या घरंदाज घराण्यांतल्या मुलींनीं भावणीनायकिणी व्हायचें ?

तशीच दारूबंदीची गोष्ट. काँग्रेस आणि महात्मा गांधी दारूबंदी करायला कानीं कपाळीं ओरडून सांगत होते. आणि दारूबंदी होण्यांत बापटशास्त्री किंवा नाना अधिकारी यांची तशी कांहींच गैरसोयही नव्हती. ते दोघेही आजन्म आयुष्यांत दारूला स्पर्श करणारे नव्हते.

पण—'सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयात् न ब्रूयात् सत्यमप्रियं !—' गांवांतील प्रतिष्ठितांच्या बैठकींतला गांवचा पोलीस पाटील गंगाराम देवळी हा दारू-गुत्त्याचा मालक असतांना त्यांनीं तरी दारूबंदीच्या मोहिमेचा उघड प्रचार आपल्या गांवीं कसा करावा? हां! प्रचार करावा; जरूर करावा. काँग्रेसची आणि महात्मा गांधींची आज्ञा मानायलाच हवी. पण प्रचार केला तरी तो सात्त्विक, सोज्वळ व सत्याग्रही वीराच्या अहिंसाधर्माला शोभेसा असावा.

बापटशास्त्र्यांची काँग्रेसनिष्ठ विचारसरणी अशी समधात, माफक, बेतास बात होती. त्यांना माहीत होतें कीं हें गांवांत रान जर असें आडमाप पेटूं दिलें तर तें कुठवर पेटेल याचा काय नेम ? हे लोक आज दारू दुकानावर पिकेटिंग करतील तर उद्यां सरकारी शाळा ओस पाडा म्हणून शाळेवर पिकेटिंग करतील ! आणि परवां—नाहीं तरी देशांत काम-गार शेतकऱ्यांचें राज्य करायचें उदक काँग्रेसनें सोडलेंच आहे, हे कुसक्या काष्टीचे शेतकरी लोक उद्यां आम्हाला आमच्या सत्तेच्या शेतांतलें अन्न देखील सुखानें खाऊं द्यायचे नाहींत !

हें पुढील संकट ओळखून त्याला वेळींच एकजुटीनें तोंड देण्यासाठीं गेल्या आठ पंधरा दिवसांत नाना अधिकारी, बापटशास्त्री, कुळकर्णी, मिराशी, गंगाराम देवळी सारे मिळून एका बैठकींत बसून डोक्याला डोकें घासूं लागले होते. ‘ कोंकण ’ पत्रांत आज छापून आलेला ‘ काजरोळींतील रंगेल देशभक्ताच्या लीला ’ हा लेख गंगाराम देवळ्यानें लिहून जो त्या पत्राकडे पाठविला, त्याचा बोलविता धनी बापटशास्त्रीच होते. पण त्यांची नुसती सूचना—मार्गदर्शनापुरती. बाकी मजकूर सारा गंगाराम देवळ्यानें आपल्या अक्कलहुषारीनेंच लिहिला होता.

शांता भावणीबाबत वास्तविक खरा प्रकार असा होता कीं ती वेश्या होऊं नये, लग्न करून संसार थाटून सुखी व्हावी, यासाठीं सदानंदाची सारी धडपड चालली होती. पण त्या धडपडीला स्वतः तो आणि शांता यांखेरीज तिसऱ्या कुणाचीही साक्ष नव्हती. नाहीं म्हणायला गंगाकाकी आपल्या हट्टाग्रहाच्या समर्थनासाठीं सदानंदाचीं बोटें सदानंदाच्या आणि त्याच्या आईबापांच्या डोळ्यांत घालण्याच्या इराद्यानें चळवळ करीत होती.

बापटशास्त्री काय अथवा नाना अधिकारी, देसाईणबाई ही मंडळी काय, त्यांच्या मतें सदानंदाच्या अंतःकरणांत उद्भवणाऱ्या अंगवस्त्रप्रीती-पुरताच प्रश्न असता तर त्यांनीं तिकडे वेळीं कानाडोळाही केला असता. पण नाना आणि देसाईणबाई यांनीं या गांवकुठारी गप्पांच्या गोंधळांतून व शांताच्या लग्न करून गतीं बायको होण्याच्या हट्टांतून तिसऱ्या कुणा-लाही न कळत निराळाच सुतानें स्व र्ग गांठला होता. सदानंद शांताला

भावीण म्हणून ठेवून देता, तरी एरव्हीं त्यांची त्याला फारशी हरकत आली नसती. पण तो तर तसें करण्याच्या विरुद्ध व काय वाटेल तें करूनही शांताचें योग्य माणसाशीं लग्न झालेंच पाहिजे अशा निर्धारानें आजकाल घरांत बोलूं लागला होता.

तिथेंच तर नाना आणि देसाईणबाई यांच्या पिढीजाद वतनदारी मनोरथांचे मनोरे पायासकट कोसळून पडणार होते. त्यांना एवढीच चिंता रात्रंदिवस लागून राहिली होती कीं, बाबा देसायांनीं आपल्या बाहेरख्यालीपणाचा आब राखण्यासाठीं शेंकडों वर्षांपासूनच्या अनेक पिढ्यांच्या वडिलार्जित वतनदारींतील सोन्याच्या तुकड्यासारखें तें काजर-कोंड ठिकाण जें आपल्या चंद्रा भावणीला व तिच्या वारसांना पोटगी-साठीं लावणचिठीनें कायमचें तोडून दिलें होतें, तें पुन्हा काय केलें म्हणजे घरचें घरीं—देसायांच्या घरांत—येईल?

नानांनीं साखरेचीं सालें काढावीं तसा चांगल्या नामांकित वकीलांचा सल्ला घेऊन त्या ठिकाणाच्या बाबतींत कायद्याचा कीस काढून पाहिला होता. पण एवढा जिवाचा आटापीट करून हातीं कांहीं लागेना. कायदा स्पष्ट सांगे कीं लावणचिठीनें त्या ठिकाणावर तिघांचा वारसाहक्क पोहोंचतो. चंद्राचा हक्क पहिला. तिला कांहीं मूलबाळ झालें नाहीं आणि ती मेली तर तिच्या पश्चात् चंद्रानें जवळ केलेली धाकटी बहीण आणि धाकटा भाऊ शंकर यांचा हक्क. तोही वंशपरंपरेचा. या तिघांपैकीं कुणाचाही वंश हयात असला तरी तें ठिकाण त्या वंशजाकडे भोगवट्याला असायचें. या तिघांचाही निर्वंश झाला तर मात्र तें ठिकाण लावणचिठी रद्द होऊन देसायांकडे माघारें यायचें.

आणि भावणीचें तें ठिकाण कांहीं झालें तरी आपल्या जाऊबाईंच्या मुलाच्या पदरीं पडूं नये; तें मग शांतानें कुणा उपटसुंभ यजमानाच्या नादीं लागून उधळ माधळ करून घालविलें तरी चालेल, अशा निर्धारानें गंगाकाकी शांताला पाठीशीं घालून उभी होती.

बापटशास्त्र्यांना त्या देसाई घराण्याच्या अब्रू—बेअब्रूचें कांहीं सोयर-सुतक नव्हतें. तरी देखील कपाळ[illegible] कपाळ घांसून त्याविषयीं गुप्त

खलबतें करतांना ते नाना व देसाईणबाई यांना कळकळीनें साथ देत, याचें कारण गांवच्या शेतकरी कुळांचा कैवार घेऊन स्वतःच्या आणि इतर जमीनदारांच्या पोटावर पाय आणूं पाहणारा सदानंद हा त्यांच्या मतें कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ निपजला होता.

ती बातमी 'कोंकण' पत्राला देतांना गंगाराम देवळ्यानें या बोटावरची थुंकी त्या बोटावर करण्याची बेमालूम नजरबंदी केलेली पाहून मात्र बापटशास्त्री त्या मजकुरावरून नजर फिरवीत स्वतःशीं हंसून म्हणाले, "आहेस बाबा! गंगारामा! देसायाचा लेकावळा शोभतोस खरा!"

●

तें कांहीं असलें तरी आपल्या पदवीधर देशभक्त नातवाला आपल्या मनकवड्या विचारांचा थांगपत्ताही लागूं नये अशा बेतानें गंभीर त्रयस्थपणाचा आव आणून ते निशिकांताला म्हणाले, "बाकी लेख जरा खारट तुरट आहे खरा."

"पण या लेखांत लिहिलेल्या खऱ्या आहेत या गोष्टी?" निशिकांत म्हणाला.

"अरे! खरें आणि खोटें मानण्यावर आहे." शास्त्रीबुवा उत्तरले.

"सदानंद इकडे आल्यापासून ह्या कुणा भावणीच्या मुलीच्या नादीं लागला आहे हें खरें का?..." तसेंच पंढरपूरच्या आसऱ्याला जाणाऱ्या गरोदर विधवा ब्राह्मण तरुणीविषयीं त्या लेखांत लिहिलें होतें; पण तें बोलायला तो लाजला.

"असें लोक बोलतात! खरेंखोटें देव जाणे!—पण काय रे, मला तूं सांग, तुम्ही दारू दुकानांवर पिकेटिंग करतां.—सत्य अहिंसेचे उपासक ना तुम्ही?"

"अर्थात्. सत्य आणि अहिंसा हें तर कॉंग्रेसचें ब्रीद आहे."

"मग मला असें सांग, दारू पिणें वाईट खरें. परंतु माणसाला एकदां जडलेलें व्यसन असें पी हळद कीं हो गोरी इतक्या घाईनें एकदम जोरकस पिकेटिंग करून कसें रे सुटणार? खरे दारू पिणारे

अशानें थोडेच बधतात! ते गांवांत नाहीं तर पांच चार कोसांवर परगांवीं झालें तरी जाऊन दारू पिऊन येतातच. इतके या लोकांचे हाल, इतकी गैरसोय, आणि उद्योगधंदा सोडून दारूसाठीं परगांवीं जाण्यापायीं प्रवासाचा पोटगीचा होणारा तोटा.—गरीबानें हा तोट्याचा खळगा भरून काढायचा तो स्वतःची आणि बायकापोरांची उपासमार करून आणि सावकाराचें घर पाहूनच ना?"

आजोबांचें अजब तर्कशास्त्र ऐकून निशिकांताला हंसूं येऊं लागलें. पण म्हाताऱ्याचा मान राखण्यासाठीं तो तें हंसें दाबीत म्हणाला, "मग तुमचें म्हणणें काय?"

"आमचें म्हणणें एवढेंच कीं असलें जोरकस पिकेटिंग ही हिंसा होते आहे. गांधीजी तुम्हांला दारूबंदीची चळवळ करायला सांगतात म्हणजे कांहीं दारूबाजांना अडवणुकीनें दमदाटी देऊन छळायला सांगत नाहींत. दारू वाईट खरी. पण दारू दुकान चालविणें हा गंगाराम देवळ्याचा पोटाचा धंदा आहे ना? दुसरा एखादा धंदा काढून देऊन त्याच्या पोटा-पाण्याची सोय लावल्याशिवाय काँग्रेस काय किंवा उद्यां गांधींचें राज्य झाल्यावर गांधी काय त्याचें दारू दुकान कसें रे हिरावून घेतील?"

"एकूण तुमचें म्हणणें असें कीं, दारूबाजही जगले पाहिजेत आणि दारू दुकानदारही जगले पाहिजेत. शेतकऱ्यांची पिळवणूक करणारे जमीनदारही जगले पाहिजेत आणि पिळले जाणारे शेतकरीही जगले पाहिजेत. शेळ्यामेंढ्या मारून खाणारे रानांतले वाघलांडगेही जगले पाहिजेत आणि मेंढवाड्यांतल्या शेळ्यामेंढ्याही जगल्या पाहिजेत?"

"तुम्ही कोंवळीं वासरें रशियाकडचे लाल वारे कानांत शिरून असें फुरारून बोलतां. पण गांधी काय सांगतात? गांधींचा अहिंसाधर्म काय सांगतो? शठं प्रति शाठ्यं नव्हे, शठं प्रति सत्यं!—"

"शठं प्रति शाठ्यं नव्हे, तर 'शठं प्रति लाठ्यं' हा धर्म होऊं घातला आहे आतां गांजल्या पिळल्या जाणाऱ्या कोटमाप हिंदी रयतेचा." निशिकांत आजोबांच्या बुरसलेल्या सनातनी वृत्तीला मनांतून हंसत हेटाळीत उद्गारला.

" चल जा ! कॉंग्रेसमधले बंडखोर लोक आहांत तुम्ही. तुमच्याशीं आम्हां गांधीवाद्यांचें पटायचें नाहीं. "

शास्त्रीबुवा आपल्या बोलण्याचा परिणाम निशिकांतासारख्या नव्या नवतीच्या तरुण देशभक्त पदवीधरावर काय होतो हें न्याहाळीत थोडा वेळ थांबले. तो कांहीं बोलेना असें पाहून ते पुढें म्हणाले, " कॉंग्रेसचा आणि गांधींचा लढा हा देशांतल्या सावकार, जमीनदार–कारखानदारां-विरुद्ध नाहीं. तो हिंदुस्थानच्या कोटमाप जनतेचें रक्तशोषण करणाऱ्या इंग्रज सरकाराविरुद्ध आहे. गरीब काय, श्रीमंत काय, कुळें काय, सावकार–जमीनदार काय, मजूर काय, कारखानदार काय, आम्ही साऱ्या हिंदुमुसलमानांनीं कसलाही धर्मभेद, पंथभेद, जातिभेद मनांत न आणतां आपल्या भारतमातेच्या स्वातंत्र्यासाठीं इंग्रजाविरुद्ध हिरीरीनें लढायचें आहे. गांधींनीं आरंभलेला हा मिठाचा सत्याग्रह देखील असा पवित्र, सोज्वळ आणि पूर्ण अहिंसामय आहे म्हणून तर आम्हां म्हाताऱ्या-कोताऱ्यांनाही स्वातंत्र्याचे शिपाई बनून त्या लढाईच्या आघाडीवर जायला हुरूप वाटतो. हाच उद्यांचा शिरोड्याचा सत्याग्रह घे. आमचे कॉंग्रेसचे पुढारी अगोदर आमच्या मिठागराच्या मालकांना येऊन भेटले, आमच्याकडून त्यांनीं रीतसर मिठागरें विकत घेतलीं, म्हणून त्या लढाईत उद्यां तुमच्या खांद्याला खांदा भिडवून आम्हांलाही लढतां येणार आहे.—माझी एक गोष्ट सोड रे ! मी एक निष्ठापूर्वक कॉंग्रेसचा पाईक म्हणून आमच्या मिठागराबद्दल एक पैसा देखील मागितला नसता ! एवढें देशाच्या स्वातंत्र्यासाठीं तुंबळ युद्ध चाललें आहे, त्यांत आमच्या एका मिठागराचें काय घेऊन बसलास ? पण म्हणून काय मीं आमच्या भागीदारालाही कॉंग्रेसच्या नांवानें बुडवावें ? हाच न्याय तुम्हीं लोकांनीं दारू दुकानांवर पिकेटिंग करतांना तिथेंही लावायला नको होता का ? मी आणि नाना अधिकारी दोघांनीं पूज्य आप्पासाहेब पटवर्धनांना पूर्वीच पत्र पाठवून सुचविलें होतें कीं खेड्या-पाड्यांतून आपण दारू दुकानदारांना तेवढ्या वेळेपुरते तोटयाच्या मानानें त्यांच्या मालाचे पैसे देऊं, म्हणजे ते आपखुषीनें दुकानावर पिकेटिंग करायला मोकळीक देतील. — "

"म्हणजे, न खपलेल्या दारूचाही पैसा घेतील आणि पिकेटिंग निर्विघ्न-पणें पार पडावें म्हणून रात्रीं बेरात्रीं अवेळ साधून दारू पिणारांसाठीं न खपलेल्या दारूची विकतची पाणपोई मागच्या दारानें सुरूही ठेवतील. या मासल्याचें पिकेटिंग मात्र खेडोपाडीं फार छान चालेल!"

"वा:! हा तुम्हां जहाल तरुण मंडळींचा छिद्रान्वेषी स्वभाव आपणाला मुळींच पसंत नाहीं. एखादा दारू दुकानदार करीत असेल तसें. म्हणून काय सगळेच तसे सब घोडे बारा टक्के? हें बघ, कॉंग्रेसची चळवळ मूळ धरायची ती अशीच. जिथें तिथें 'जेवीन तर तुपाशीं नाहीं तर उपाशी' असें म्हणून माणसाचा कधीं पल्ला आला आहे?—"

तोंच 'कोंकण' पत्रांतील 'काजरोळींतील रंगेल देशभक्ताच्या लीला' नजरेखालीं घालीत तिथें आजोबा व वडील भाऊ यांचा संवाद ऐकत बसलेल्या भास्करनें मध्येंच प्रश्न केला, "उद्यां कॉंग्रेसचें राज्य झालें म्हणजे कॉंग्रेसचे लोक ह्या गंगाराम देवळ्याला पोलीस पाटिलकीवरून काढून टाकतील, नाहीं का हो आजोबा?"

शास्त्रीबुवा नातवावर चिडून खेंकसले, "जा, आंत जाऊन आपला अभ्यास कर जा मुकाट्यानें. तेवढें मात्र ऐकायचें नाहीं. आणि हातांत निशाण घेऊन मारे त्या म्हारड्यामुसंड्यांच्या हातांत हात घालून तिठ्यापर्यंत मिरवत जायला मात्र तुम्हांला फावतें, नाहीं? थांब तूं—"

"मी काय करूं मास्तर जर सांगतात तर?" असें भास्कर मनांतल्या मनांत आजोबांवर चरफडत आपलें लंगडें समर्थन करीत उठून हिर-मुसल्या वृत्तीनें आंत जाऊं लागला.

निशिकांत मुकाटपणें तो आजे—नातवांचा संवाद ऐकत होता. आपल्या समाजांतील तीन पिढ्यांमधील ह्या वैराण वैचारिक अंतराची त्याला आतां बरीच ओळख झाली होती. त्याला आपल्या धाकट्या भावाच्या अवखळपणाचाही राग आला नाहीं आणि आजोबांच्या बुरसलेल्या सनातनी वृत्तीचाही राग आला नाहीं.

शिवाय त्याचें लक्ष अशा कोत्या विचारांच्या डबक्यांत डुंबण्याइतकें मोकळें कुठें होतें? प्रतिभेनें आजच्या तिच्या पत्रांत सदानंदाविषयीं

अनुदारपणें काढलेल्या उद्‌गारांची वसंत ऋतूंतील पहिल्या बहाराच्या कैऱ्यांसारखी आंबट पण रुचकर चव जितकी चाखावी तितकी त्याला थोडी वाटत होती. रत्नागिरीहून परवां तो 'कोंकण' पत्राचा ताजा अंक वाचूनच बहुधा तिनें तें पत्र लिहिलें असावें हें त्यानें अंदाजानें ओळखलें होतें. तिनें इतके दिवस सदानंदापेक्षां पुष्कळ दूरच्या वाटणाऱ्या आपणाला इतक्या रसाळ भाषेंत पत्र लिहावें आणि त्यांत आपल्या जिव्हाळ्याच्या मित्राविषयीं असे खारट–तुरट उद्‌गार काढावे, या विचित्र घटनेंत त्याला आपणाविषयींच्या प्रतिभेच्या मनांतील खुरटलेल्या आदराच्या वेलीला प्रणयाच्या नाजुकपणानें रंगलेली नवी पालवी फुटूं लागलेली दिसत होती.

●

इतक्यांत शास्त्रीणबाईंनीं देवघरांत येऊन ओसरीच्या दरवाजांतून विचारलें, "बाहेर उस्मान बसला आहे केव्हांचा वाट बघत. तो काय म्हणतो तें ऐकून घ्यावें ना एकदां!" डाव्या हाताच्या बोटावर जपमाळेसारखें सोन्याच्या पुतळ्यांचें गांठलें रुळवीत हात पुढें करून त्या पुढें म्हणाल्या, "पन्नास रुपये हवे आहेत त्याला या ऐवजावर."

एरव्हीं मुसलमान नुसता ओसरीच्या कट्ट्यावर बसला तर ओसरी विटाळते असें मानणाऱ्या बापटशास्त्र्यांनीं देवघरांत शास्त्रीणबाई हातीं घेऊन उभी असलेली ती मुसलमानणीच्या गळ्यांतली पुतळ्यांची माळ पाहाण्यासाठीं हात पुढें करीत म्हटलें, "किती पाहिजेत, पन्नास रुपये!"

"होय." शास्त्रीणबाई देवघरांतून मागील दाराच्या पडवींत म्हशीसाठीं दावें विणायला बसवलेल्या उस्मानकडे पाहून म्हणाल्या, "ये रे उस्मान! असा पुढच्या दारीं ये."

त्या पुन्हा पति व नातू यांच्याकडे पाहात उद्‌गारल्या, "कित्ती वेळ झाला त्याला येऊन. पण तुमचें तें कॉंग्रेसचें एरंडाचें गुऱ्हाळ कांहीं केल्या संपेनाच."

निशिकांत आजीच्या मुखीं तो वडीलधारा टोमणा ऐकून स्वतःशीं किंचित् हंसला. शास्त्रीबुवांचें त्या टोमण्याकडे लक्षही गेलें नाहीं. त्यांचें

लक्ष त्या सोन्याच्या पुतळ्यांचें आशाळभूत नजरेनें निरीक्षण करण्यांत गढून गेलें होतें.

तेवढयांत दावें विणून होतांच मागील दारून घरामागच्या बोळांतून पुढील दारच्या अंगणांत आलेला उस्मान शास्त्रीबुवांनीं बसल्या बैठकीवरून पाहिला.

"काय रे, काय उस्मान! किती रुपये हवेत तुला या जिन्नसावर?" शास्त्रीबुवांनीं उजव्या हाताच्या बोटावर ती पुतळ्यांची माळ सरकवून पाहात विचारलें.

"रुपये पन्नास तरी हवेत." उस्मान ओसरीच्या पडवीच्या दारांत येऊन हात जोडून उद्गारला.

"ह्या पुतळ्या तरी खऱ्या सोन्याच्या आहेत का पण? कां गिलिटाच्या आहेत?" असें विचारीत शास्त्रीबुवा उठून ती पुतळ्यांची माळ घेऊन खोलींत गेले. त्यांनीं फडताळ उघडलें आणि आंब्याएवढा कसोटीचा दगड बाहेर काढला. फडताळांतील एका डबींत ठेवलेली तो दगड पुसण्याची मेणाची गोळी घेऊन त्या मेणानें त्या दगडावरचे सोन्याचे सारे कण निपटून घेतले आणि मग त्या पुतळ्यांच्या माळेंतील एकेक पुतळी त्या दगडावर खरखरीत बाजूवर चांगली खसखसून घांसून पाहिली.

"केव्हां देणार पैसे परत?" शास्त्रीबुवांनीं त्या कसोटीच्या दगडाकडे पाहून त्या घांसाघांशींत किती गुंजा सोनें पदरीं पडेल याचा मनाशीं विचार करीत विचारलें.

"दोन महिन्यांनीं देईन मुलाकडून मुंबईहून पैसे आले म्हणजे. त्याच्या गिरणींत संप आहे म्हणून तो परवां इकडे आला. लौकरच संप मिटेल असें राजा देवळीही म्हणत होता. मिटला कीं जाईल पुन्हा गिरणींत काम करायला."

शास्त्रीबुवांनीं मेणाच्या गोळीनें कसोटीचा दगड पुसून काढतां काढतां विचारलें, "पण पैसा व्याजानें रुपये नाहीं रे मिळायचे आतां उस्मान! रुपयाला दरमहा दीड पैसा व्याज पडेल. अरे, ह्या गांधींच्या चळवळीमुळें सगळ्याच गोष्टींची महागाई झाली आहे ना! पैशाची देखील महागाई."

" काय पडेल तें व्याज द्यायला हवेंच. न देऊन कसें चालेल ? " आपणाला पैसे मिळणार ह्या आनंदानें उल्हासून उस्मान म्हणाला.

लगेच शास्त्रीबुवांनीं उस्मानचें नांव, पैसे घेतल्याची तारीख, रक्कम, व्याजाचा दर अशा मजकुराच्या चिठीचें मंगळसूत्र त्या ऐवजाच्या गळ्यांत बांधून कपाट उघडून त्यांतील ऐवजाच्या खणांत तो ठेवून दिला. लगेच चाळीस रुपायांच्या दहा दहाच्या चार नोटा पैशांच्या शिसवी पेटींतून बाहेर काढल्या व पेटीच्या दुसऱ्या खणांतून त्यांतले सात रुपये मोजून काढले. दुसऱ्या खणांतले गोरेगोमटे पण बद्द दोन रुपये व बुचडेवाल्या व्हिक्टोरिया राणीचा एक रुपया असे तीन त्यांत घातले आणि पुन्हा एकवार नीट मोजून पन्नास रुपये उस्मानला दिले.

उस्मान ते रुपये न्याहाळून पाहात त्यांतला बुचडेवाल्या राणीचा रुपाया पुढें करून म्हणाला, " हा आजकाल चालत नाहीं म्हणतात. "

" चालत नाहीं रे कोण म्हणतो ? " शास्त्रीबुवा कपाटाचा हा खण उघड, तो खण उघड असें करून दुसरा रुपाया शोधल्याचें भासवीत म्हणाले, " आणखी दुसरा रुपाया शिल्लक नाहीं रे ! आज घेऊन जा तोच. चालला नाहीं तर ये परत घेऊन. बदलून देईन मग दुसरा. "

उस्मान ' बरें ' म्हणून ते रुपये मोजून घेऊन घरीं निघाला.

तोंच त्याला शास्त्रीबुवांनीं म्हटलें, " अरे, थांब कीं जरा. घोडें बांध जरा. पान तरी खाऊन जाशील कीं नाहीं ? "

शास्त्रीबुवांच्या शब्दाला मान देऊन उस्मान खालीं बसला. शास्त्रीबुवा चंची सोडून पानाला चुना लावून तें त्याच्यापुढें सरकवीत सुपारी कातरतां कातरतां म्हणाले, " तुमच्या गांवांत आजकाल फार खळबळ आहे असें ऐकतों. खरी काय भानगड आहे रे ? काल म्हणे तुमच्या गांवांत सभा चांगलीच गाजली. राजाराम देवळ्याच्या म्हणे आजकाल फारच अंगांत येतें सभेंत ! काय काय झालें कालच्या सभेंत ? "

" नाहीं. तसें कांहीं विशेष झालें नाहीं. "

" देसायांवर भर सभेंत राजा वाघासारखा तुटून पडला म्हणे. काय–काय बोलला तो ?–आणि तो म्हारडा शिवनाकही त्या वहाल्या गटारांत

बुचकळ्या मारून न्हाऊन निघाला असें ऐकतों. तूंच तेवढा कसा सुटलास तेवढ्यांतून ? बाकी तूं नाहीं तर तुझा याकूब तरी असेलच कीं त्यांत ! राजाच्याच गिरणींत होता ना कामाला ?"

"नाहीं.—पूर्वी होता; पण एक महिना झाला तेव्हांपासून तो मदनपुऱ्यांतल्या सुलेमानशेटच्या रेशमाच्या गिरणींत कामाला लागला आहे."

"आणि तरी देखील संप ?" इतका वेळ ओसरीवर एकीकडे बसून आजोबांच्या सावकारी इलमा चौकस विनोदबुद्धीनें पाहणारा व ऐकणारा निशिकांत पडवीच्या पायरीवर येऊन म्हणाला, "मुसलमान मजूर मुसलमान गिरणीवाल्याविरुद्ध संप करतो हें कसें काय ?"

"मुसलमान मुसलमानाविरुद्ध संप करीत नाहीं साहेब ! उपाशी मजूर गब्रू गिरणीवाल्याविरुद्ध संप करतो. हिंदु असो, मुसलमान असो कीं कोणी असो, मजूर तो मजूर आणि गिरणीवाला तो गिरणीवाला. गिरणीवाल्याची जात वेगळी, मजुराची जात वेगळी." उस्मान गंभीर वृत्तीनें उत्तरला.

"हें तुम्हाला आत्तां कळायला लागलें. पण इतके दिवस नव्हतें कळत. इतके दिवस तुम्हां मुसलमानांना वाटत होतें कीं गिरणीमालक झाला तरी आपला मुसलमान आहे. मुसलमान मुसलमानाची थोडीच उपासमार करील ?—"

"होय. खुळे होतों आम्ही. आम्हाला आरंभीं आरंभीं तसें वाटे खरें."

"आणि आतां ? आतां वळ उठला आणि संशय फिटला. आतां तरी महात्मा गांधींची थोरवी पडते का तुम्हांला ? कॉंग्रेसच्या सांगण्यावर आतां तरी तुमचा विश्वास बसतो का ?"

"बसतो तर ! न बसायला काय झालें ?" शास्त्रीबुवा वळीवाच्या पावसासारखी राजकारणाची सर निशिकांताच्या मुखांतून मध्येंच अवेळीं कोसळूं लागलेली पाहून मोठ्या चतुराईनें त्या उपऱ्या विषयाला बगल देत उस्मानला म्हणाले, "खरें, काय काय रे बोलला राजा कालच्या सभेंत ? देसायावर इतका उखडला म्हणे, तो काय बोलला ?"

" बोलला खरें कायसेंसें. आमचा याकूब सांगत होता म्हणून मला माहीत. म्हणे सभेंत बोलायला उभा राहिला तो अगदीं या धन्याला खाऊं कीं गिळूं या आवेशांत. मुंबईच्या त्या पालीवाल गिरणीवाल्याचे त्यानें असे कांहीं वाभाडे काढले म्हणतां कीं सांगायची सोय नाहीं. आणि मग सुक्याबरोबर ओलेंही जळूं लागलें. गिरणीवाल्यावरचा राग मग तो देसाई धन्यावर काढूं लागला. त्यानें काय बोलायची बाकी ठेवली ? "

" मग धाकटा देसाई फार चिडला असेल ? "

निशिकांताच्या मनांत सभेचा तो वृत्तांत ऐकण्यासाठीं कमालीचें कुतूहल जागृत झालें होतें. तोही कान टंवकारून लक्षपूर्वक ऐकूं लागला.

" नाहीं ना ! तीच तर गंमत. आम्हांला देखील वाटलें होतें कीं धाकटे देसाई आतां भरसभेंत राजावर आग पाखडणार ! पण राजा बोलून लोकांच्या टाळ्या घेत खालीं बसला, आणि धाकटे धनी बोलायला उभे राहिले मात्र, ते आरंभापासूनच राजाची वाखाणणी करीत असे बोलले—असे बोलले कीं लोक म्हणूं लागले, वाः !—आंधळा मागतो एक डोळा आणि देव देतो दोन तशांतली गत. धाकट्या धन्यांनीं अगदीं उघड सांगून टाकलें कीं माझी वतनवाडी मी माझ्या जमीन कसवणाऱ्या कुळांना ते म्हणतील तशा माफक खंडानें कायमची देऊन टाकणार. एवढेंच सांगून ते थांबले नाहींत. ते राजाला आणि तिथें जमलेल्या बाकीच्या कुळांनाही म्हणाले कीं तुम्ही जागे व्हाल,—कसणाराची जमीन ना ? ती कसणारे तुम्ही मागूं लागाल, तर तुम्हांला नाहीं म्हणायची कोणत्या धन्याची माय व्याली आहे ? तुम्ही शेतकरी आमचे अन्नदाते ! तुम्हांला उपाशी ठेवून आम्हांला कसें पोट भरतां येईल ? शेतकरी सुखी तर धनी सुखी.—"

" पण आम्हांला नुसत्या अशा धमक्या देऊन काय रे मिळणार आहे तुम्हांला ? हां ! गोडी गुलाबीनें वागलेत तर तुम्ही कुळें आमचीं आणि आम्ही धनी तुमचे ! मुंगी होऊन साखर खावी आणि हत्ती होऊन लांकडें मोडावीं ! राजारामला म्हणावें इथें येऊन आमच्या कुळांना आमच्या विरुद्ध अशी चिथावणी दे तूं. पण मग उपाशी रे कोण मरेल ? तुम्ही कीं आम्ही ? "

"संपाला चिथावणी कोण राजा देतो?" उस्माननें भुंवया चढवून पाहात राजाचा कैवार घेत विचारलें.

"नाहीं, आम्ही देतों! राजाला म्हणावें संप करायचा आहे ना तुला आमच्या गांवच्या कुळांचा? तर कर म्हणावें संप. बघूं कोण दमतें तें! म्हणे आम्ही धन्याच्या जमिनी ओसाड पाडूं! पाडा ओसाड जमिनी. एका कुळानें जमीन पाडली तर त्याचे काका सतरा. अरे, जमिनी आहेत कुठें? कुळें म्हणतात कीं खंड झाला तरी पायली कुडव अधिक घ्या. पण जमीन खंडाला द्या. पाडा म्हणावें जमिनी ओसाड."

"खरें आहे तुम्ही म्हणतां तें शास्त्रीबुवा. बरें, मी येतों आतां. गांवांत आज देवाचे अवसर काढणार आहेत म्हणे. अवसराच्या नौबतीची खोटी झाली तर नाना खेटरांनीं मारायचे." असें म्हणून उस्मान घाईघाईनें उठून घरच्या वाटेला लागला.

•

उस्मान अंगण ओलांडून गेला असेल नसेल तोंच शास्त्रीबुवांनीं कांहीं तरी आठवल्यासारखें करून अंगणापावेतों जाऊन त्याला पुन्हा हांक मारली, "अरे ए उस्मान! खरें, तुला जमनाकडे खंडानें असलेल्या शेतांतलीं झाडें विकत घ्यायचीं होतीं ना? मागच्या वर्षी विचारलें होतेंस तूं मला. म्हणून तुझ्यासाठीं मुद्दाम राखून टेवलीं आहेत. घेणार असलास तर बोल.—काय किंमत देतोस सांग."

उस्मान थांबून मागें वळून पाहात म्हणाला, "पण तें ठिकाण तुम्ही रावबा विचाऱ्याला विकलें ना? गंगारामच सांगत होता सकाळीं मला. तीं झाडें आतां त्यानेंच विकत घ्यायचीं ठरवलीं आहेत रावबाकडून."

"वाः! खासा न्याय! गंगारामला म्हणावें, बाबा! घी देखा पण बडगा नाहीं देखा!—ठिकाण मीं रावबाला विकलें खरें. पण तेवढा पोट-नंबर माझ्याकडे राखून ठेवला आहे हें कुठें आहे माहीत गंगारामला?" शास्त्रीबुवा ती नवी वार्ता ऐकून फिकीरींत पडल्यासारखे डोकें खाजवीत पण वरकरणीं बेफिकीरपणाचा आव आणीत म्हणाले.

" तें काय आपणाला माहीत नाहीं. पण तीं झाडें गंगारामानें घेतलीं एवढें खरें. आतां एक दोन दिवसांत तीं तोडून आणून आम्ही चिर-कामाला सुरवात देखील करूं. मिरग निघायच्या आंत गंगारामाच्या घरावर माडी चढली पाहिजे ना ? "

" म्हणजे ? "

" म्हणजे काय ? आतां तें शेत गंगारामाचें आणि घरही गंगारामाचें शास्त्रीबुवा ! रावबा आतां त्याचा जांवई. लेकीला हातलावणीसाठीं होय म्हणायच्या अगोदर तिच्या पोटगीसाठीं त्यानें तें ठिकाण रावबाकडून लावणचिठीनें मागून घेतलें देखील. आज उद्यां इतक्यांत तो देवगडांत जाईल आणि लावणचिठी रजिष्टर करून येईल. "

" असें काय ? एकूण गंगारामाच्या तारूचें आणि रावबाचें असें जमलें म्हणायचें. बरें मग तुला नकोत ना तीं झाडें ? "

उस्मान मुकाट्यानें नकारार्थी मान हलवीत निघून गेला. शास्त्रीबुवा आपलें दप्तर गुंडाळतां गुंडाळतां, ' आतां त्या ठिकाणाबाबत काय करावें ? देवगडांत जाऊन वकिलाची सल्ला घ्यावी का ? ' असा विचार मनांत घोळवीत स्वतःशींच विचार करण्यांत गुरफटून गेले.

निशिकान्त आजोबांच्या त्या सावकारी डावपेचांना कंटाळून गेला होता. तो त्या कुंद वातावरणांत उबगलेल्या मनाला प्रतिभेच्या पत्रांतील रसाळ भाषेचा व त्या भाषेच्या फुलोऱ्याआड लीलेनें लपंडाव खेळणाऱ्या मुग्ध प्रणयकल्पनांचा चारा भरवून ताजेंतवानें करण्यासाठीं आपल्या खोलींत गेला आणि खोलीचें दार लोटून घेऊन आरामखुर्चीवर पडल्या पडल्या तें पत्र पुन्हा वाचूं लागला.

तोंच शास्त्रीणबाई ओसरीच्या दरवाजांत येऊन म्हणाल्या, " ऐकलें का ? आबा मास्तराला म्हणे पोलिसांनीं धरलें. ही भागिर्थी आली आहे सांगायला. "

शास्त्रीबुवा तसेच उठले आणि खुंटीवरचें उपरणें घेऊन खांद्यावर टाकीत मागील दारीं उभी असलेल्या आबांच्या आईकडे माजघराच्या

खिडकींतून डोकावून पाहात म्हणाले, "कुठें ग पकडलें भागिर्थी! आबाला? इथें कीं काजरोळींत?"

"इथेंच पकडलें माझ्या आबाला!" अंतःकरणांतून भडभडून आलेला अपत्यवत्सलतेचा दुःखाचा हुंदका अर्धामुर्धा गिळीत भागिर्थी उद्गारली. पुढें तिच्या तोंडावाटे शब्द उमटे ना. तरी देखील मनाला मुरगळून डिंवचून धीट करीत ती आणखी म्हणाली, "माझा पोर मरणाचे आंचके देत तडफडतो आणि, आणि त्या दुःखावर देव ह्या नव्या डागण्या देतो आहे."

"कांहीं भिऊं नकोस भागिर्थी! रडायचें कसलें त्यांत? आबानें कांहीं कुणाची चोरी मारी केली नाहीं कीं कुणाची पोरगी पळवली नाहीं." जोराचे हुंदके देत ओक्साबोक्शी रडण्याच्या बेताला आलेल्या भागिर्थीला धीर देत शास्त्रीबुवा म्हणाले, "मुळींच भिऊं नकोस तूं. चल मी येतों तिकडे."

भागिर्थी पदरानें डोळे पुशीत मागील दारानें आपल्या घराकडे वळली. शास्त्रीबुवा ओसरीच्या खुंटीवरची खादीची मळकट टोपी डोकीवर ठेवून बाहेर जाऊं लागतात तोंच निशिकांत खोलीबाहेर येऊन विचारूं लागला, "काय झालें? आबा मास्तरांना पकडलें?"

"होय म्हणतात पकडलें!"

"आतां हें असें चालायचेंच. मिठाच्या सत्याग्रहासाठीं सारे लोक खडबडून जागे होऊं लागलेले पाहातांच हे सरकारी कुत्रे आतां असे पिसाळायचेच! त्यांना आपण थोडीच भीक घालायची आहे? चला तुम्ही पुढें. मीही आलोंच आपल्या या सत्याग्रही वीराला निरोप द्यायला." तो देवघराकडे पाहात आजीला म्हणाला, "आजी! चल पाहूं! देवाच्या परडींत फुलें आहेत?"

"आहेत. कशाला रे?" शास्त्रीणबाईंनीं किंचित् गोंधळल्यासारखें करून विचारलें.

"आण तीं इकडे. मी माळ करून घेतों त्याची." निशिकांत हात पुढें करीत म्हणाला.

" माळ केलेलीच आहे फुलांची.—आज संकष्टी ना ? "

निशिकांत आजीच्या व्रता–वैकल्यांना मनांतल्या मनांत अवखळपणें हेटाळीत म्हणाला, " मग दे ती माळ माझ्याकडे. नाहीं तर माळ आणि कुंकवाचा करंडा घेऊन चल माझ्याबरोबर. आपल्या गांवांत सत्याग्रहाच्या लढाईचा शुभमुहूर्त आज तुझ्यासारख्या पुण्यवान् सवाष्णीच्या हातून होऊं दे. म्हणजे लोकांना अधिक हुरूप येईल. " असें म्हणत निशिकांत खोलींत जाऊन खादीची सदरा टोपी अंगावर चढवूं लागला.



दिवस प्रहराच्या मावळतीवर आला होता.

शास्त्रीबुवा, शास्त्रीणबाई व निशिकांत आबा मास्तरांच्या घरापाशीं जाऊन पोहोंचलीं. तोंच घरांतून भागिर्थीची गगनभेदी करुण किंचाळी त्यांना ऐकूं आली. भागिर्थी बिचारी माय पोटचा तान्हा गोळा मांडीवर मरून पडलेला सांवरीत टाहो फोडून रडत होती.

शास्त्रीणबाई त्या दुःखी आईचें शांतवन करण्यासाठीं वडीलधाऱ्या नात्यानें पुढें झाल्या. शास्त्रीबुवा व निशिकांत तिच्या मागोमाग रेंगाळत चालूं लागले. आबा मास्तर त्या दोन सशस्त्र यमदूतांच्या खड्या पहाऱ्यांत अंगणांतच डांबून ठेवल्यासारखे उभे होते. जरा पलीकडे अवलिया स्थितींत रंगून गेल्यासारखा वेडा सदबा स्वतःशींच कांहींतरी पुटपुटत होता. आपल्या घरांत, आपल्या सभोंवारच्या जगांत काय काय उत्पात चालले आहेत याची त्याला मुळींच फिकीर वाटत नव्हती.

माजघराच्या पश्चिम खिडकींतून धोंडूच्या बाळमुखावर इतका वेळ खेळणारा मावळत्या सूर्याचा कवडसा तोंड लपवून खिडकीबाहेर पळूं लागला होता.

घरांत आईच्या मांडीवर मरून पडलेल्या आपल्या तान्ह्या भावाला आपण तुरुंगाच्या वाटेला लागण्यापूर्वी एकदां अखेरचें डोळांभर पाहावें या आशेनें तिकडे धांव घेणारें बिचाऱ्या आबा मास्तरांचें महासागरासारखें थोर व त्रिखंड गंगा–यमुनांसारखें पवित्र मन, पोलीस जाऊं देतील का, कीं अडवतील या भीतियुक्त संकोचानें क्षणोक्षणीं ठेंचाळत होतें.

" हं ! चला बाबा ! " एक पोलीस आबा मास्तरांच्या दंडाला हळूच स्पर्श करीत म्हणाला.

" पोलीस झालां म्हणून तुम्ही माणुसकी कोळून प्यालां का रे ? " जरा माणसानें काळवेळ पाहून वागावें. " निशिकांत पुढें होऊन त्या पोलिसांना दटावूं लागला.

" तुम्ही म्हणतां तें खरें साहेब ! पण आम्ही हुकुमाचे बंदे पोलीस. काळवेळ ओळखून आम्ही वागूं लागलों तर—ह्या पोटाला आग कशी लागेल साहेब ? "

" या जगांत माणसांसारखें जगायची गरीबांना सोय उरली आहे काय साहेब ? पोटासाठीं डोळ्यांवर कातडें ओढून आम्हांला हें कसाबासारखें काम करावें लागतें. " तो दुसरा शिपाई वर आकाशाकडे पाहात हात जोडून गहिंवरून उद्गारला, " देवा ! गांधी महाराजांच्या मुखीं असाच सदा उभा राहून अशीच तुझ्या या तेहतीस कोटी रंजल्या गांजल्या भिकारी टाकारी पोरांना हांक मारून खडबडून जागे कर. आणि आमचा देश एकदांचा ह्या टोपीवाल्यांच्या गुलामगिरींतून मोकळा कर. "

" अरे ! देव एकट्या गांधीजींच्याच मुखानें बोलतो असें नाहीं. हे तुम्ही दरिद्रीनारायणाचे अवतार हेच गांधीजींचे तेहत्तीस कोटी देव. तुम्ही बोलाल तें होईल. तुम्ही कराल तें होईल. " निशिकांत त्या दुसऱ्या शिपायाकडे आपुलकीनें पाहात म्हणाला.

" आम्ही करूं तें होईल आणि आम्ही बोलतों तसें करूंही. " तो शिपाई आपल्या साथीदार शिपायाला दंडाला धरून जरा बाजूला घेत आबा मास्तरांकडे मुद्दाम पण कुणाच्या डोळ्यांवर येणार नाहीं असें दुर्लक्ष करीत कमरेच्या पट्ट्याकडे हात नेऊन म्हणाला, " साहेब ! एकेकदां असें वाटतें कीं हा गुलामगिरीचा डगलापट्टा असा दूर फेंकून द्यावा. आणि गांधीजींनीं चालविलेल्या देशाच्या लढाईत हिरीरीनें घालून घ्यावें. पण काय करूं साहेब ! चार माणसांचें कुटुंब. मीं कष्ट करून पोसलें नाहीं तर अन्नासाठीं तीं तडफडून मरून जातील ना ! ... "

त्या पोलिसांचीं अंतःकरणें द्रवूं लागलेलीं पाहून शास्त्रीबुवांनीं तेवढ्यांत त्यांची नजर चुकवून आबा मास्तरांना आंत जा आणि आईला भेटून ये अशा अर्थानें डोळ्यानें खुणावलें.

आबा मास्तर घाबरलेल्या नजरेनें जरा मागें पुढें पाहात भीत भीत आंत गेले. पोलीसांनीं तें पाहूनही पाहिलें नाहींसें भासविलें.

" साहेब ! हे एवढे घरांतले गळफांस जर माझ्या गळ्याला नसते, तर मी तुम्हांला आज पोलीस म्हणून दिसलों नसतों. सत्याग्रही म्हणून मिठागरांतलें मीठ लुटतांना आणि पोलिसांच्या हातून लाठ्या–काठ्या–गोळ्यांचा मार खाऊन रक्तबंबाळ झालेल्या स्थितींत रामनामासारखें गांधीजींचें नांव घेत गांधीजींच्या आज्ञेप्रमाणें लढतांना दिसलों असतों. " एक पोलीस म्हणाला.

तेवढ्यांत आबा मास्तर आपल्या दुःखी कष्टी आईच्या पायां पडून आपल्या अश्रूंनीं तिचे पाय न्हाणून बाहेर येण्यासाठीं वळले. पुन्हा एकवार मागें वळून त्यांनीं आईच्या मांडीवर मरून पडलेल्या तान्ह्या भावाच्या थंडगार गालाचा मुका घेतला आणि बाहेर येतां येतां आईला अखेरचें म्हटलें, " आई येतों ! मी... "

त्यांच्या तोंडावाटें पुढें शब्दच उमटेना.

त्यांना बाहेर जातांना पाहून दुःखी आईनें शास्त्रीणबाईकडे पाहून किंचाळी फोडली. " चमचाभर दुधासाठीं माझा पोर तडफडून मेला हो काकी ! मी निष्ठुर मांगीण—पोराला मी चमचाभर दूधसुद्धां पाजायला महाग झालें " असें म्हणत तिनें शास्त्रीणबाईच्या पायांवर दुःखाच्या उमाळ्यासरसें घालून घेतलें.

आईच्या आक्रोशांतून निघालेल्या दुःखाच्या जाळानें आपल्या गोठ्यांतील गुरांच्या आठवणीसरसें होरपळल्या अंतःकरणानें आबा मास्तर मुकाटपणें अंगणांत जाऊन पोलिसांच्या स्वाधीन झाले.

" चला. " असें पोलिसांना म्हणत त्यांनीं जवळ उभ्या असलेल्या शास्त्रीबुवांच्या पायांवर मस्तक ठेवून त्यांचा निरोप घेतला.

"आतां माझ्या म्हातारीला तरी ह्या उजाड जगांत तडफडूं देऊं नका शास्त्रीबुवा!" ते पलीकडे एकटाच वेडाच्या लहरींत रंगून गेलेल्या सदबाकडे अश्रूंनीं डबडबलेल्या नजरेनें पाहात उद्गारले, "बाबा तर आतां हा असा माणसांतून उठलाच आहे. आतां घरांत आई एकटी. तिचा कुंकवाचा आधार असा कोसळला, असून नव्हेसा झाला. तान्हा पोर मांडीवर मरून पडला आणि मी मोठा पोर हा असा असून नाहींसा झालों. आतां त्या बिचारीला गांवांत तुमच्या घराखेरीज दुसऱ्या घराचा आधार नाहीं. इतके दिवस हरिबाचा आधार होता.—"

बोलतां बोलतां त्यांनीं ओघासरशीं बाजूला मान वळविली. तों समोरच्या रस्त्यावर फणसाच्या बुंध्याला टेकून हरिबा खांद्यावरील कांबळ्याच्या पदरानें डोळे पुशीत इकडेच पाहात असलेला त्यांना आढळला. निमगोऱ्या कांतीचे त्याचे गाल आणि डोळे चोळून चोळून लाल झालेलेही त्यांना जाणवले. त्यासरसा त्यांच्या मनांत तिटकारा उत्पन्न झाला व जिभेवरचें अर्धें वाक्य जिभेवरच विरून गेलें.

"पैसा माणसाला असा माणुसकी सोडायला लावतो." असें स्वतःच्या मनाशीं उद्गारत त्यांनीं टपटप अश्रू गाळले.

तोंच पलीकडून वेड्या बापाची हांक त्यांना ऐकूं आली, "आबा!"

"जा, भेटून ये म्हाताऱ्याला." पहिला पोलीस विठ्ठल नजरेनें खुणावीत म्हणाला.

"जा." दुसरा पोलीस डगल्याच्या बाहीनें अश्रूंनीं डबडबलेले डोळे पुशीत उद्गारला.

"अरे बैलांना बांधलेंस? म्हैस आली गोठ्यांत? वासराचें दावें आंखडलें आहेस ना? नाहीं तर कालच्यासारखें वासरूं चोरून लुचेल आणि मग धोंड्याला दूध मिळायचें नाहीं. जा—जा बघूं अगोदर गोठ्यांत. दिवस मावळायला चालला बघ." असें भकत सदबा उठून गोठ्याकडे जाऊं लागला. तोंच समोर फणसाला टेकून उभा असलेल्या हरिबाला पाहून तो भकला, "काय रे हरीबा! पेंड आहे तुझ्याजवळ घडा पासरी? माझ्याकडची पेंड कालच संपली रे! आणि म्हैस तर

पेंडीचा खडा तोंडांत दिल्याखेरीज उभी राहायला राजी नाहीं. पोर रडत बसतो दुधासाठीं. चल..."

वेडाच्या भरांत पुढें जाऊं लागलेल्या सदबाला आबा मास्तरांनीं समोर जाऊन हलकेच अडवून त्याच्या पायांवर मस्तक नमविलें.

"जा, जा अगोदर गोठ्यांत. गुरांना बांध." सदबा वेडाच्या भरांत लेकाला दोन्ही हातांनीं हळूच बाजूला सारीत 'हरिबाकडून म्हशीच्या पानवणाकरितां पेंड आणण्यासाठीं' पुढें चालला.

तोंच घरांतून विव्हळ हांक ऐकूं आली, "आबा!"

आबा मास्तर, शास्त्रीबुवा व निशिकांत मागें वळून पाहतात तों शास्त्रीणबाई पदराच्या टोंकानें अश्रू पुशीत बाहेर आल्या. त्यांनीं हातांतील फुलांची माळ आबा मास्तरांच्या गळ्यांत घातली आणि करंड्यांतील कुंकवाचा टिळा त्यांच्या कपाळाला लावीत पुन्हा आंसवें पुशीत म्हटलें, "जा. थोरल्या आईची सेवा करायला जातो आहेस तूं! नशीबवान खरी मेजारीण. तिच्या वाडवडिलांच्या पुण्याईनें तूं तिच्या सोन्याच्या कुशींत निपजलास." मेजाऱ्याचा धाकटा मुलगा मेल्याचें ऐकून त्या प्रेताची शेजारधर्माप्रमाणें पुढील व्यवस्था लावण्यासाठीं तिथें जमलेल्या पण पोलिसांच्या भीतीनें दूर दूर रेंगाळणाऱ्या चार पांच शेजारी कुणब्यांकडे पाहून शास्त्रीणबाई घोगऱ्या स्वरांत उद्गारल्या, "जा तूं बरें आबा! मागें आईची आणि सदबाची देखील तूं मुळींच काळजी करूं नकोस. माझी बहीण आहे ती. सदबा माझा भाऊ आहे. आंधळ्याच्या गाई देव राखी."

तेवढ्यांत आबा मास्तरांची आई तान्ह्या धोंडूचें मांडीवरचें प्रेत खालीं ठेवून पुढें आली व पुढ्यांत मरून पडलेल्या आणि जखमी झालेल्या पिलाकडे पाहून आक्रोशानें टाहो फोडणाऱ्या पक्षिणीसारखी टाळा पसरून हुंदके देत आबा मास्तरांच्या तोंडावरून हात फिरवून म्हणाली, "जा बाबा! आपल्यासारख्या गोरगरीबांचें बरें भलें व्हावें म्हणून तूं हे हाल भोगतो आहेस. देव तुझा वाली आहे. जा!"

आबा मास्तर आपल्या आईच्या गळ्याला मिठी मारून तिच्या वक्ष-स्थलावर मस्तक टेकवून अश्रूंनीं तिचा वक्षस्थलावर झाकलेला पदर

भिजवीत बोलूं लागले. पण त्यांच्या मुखावाटे शब्दच उमटेनात. कसाबसा त्यांनीं एकच शब्द घोगऱ्या दुःखी स्वरांत अश्रूंनीं भिजवून उद्गारला, "आई!"

"कांहीं रडूं नकोस! डोकीवर आकाश फाटलें म्हणून काय असें रडायचें? असें भ्यायचें?—आणि तूं देखील खुळ्यासारखी काय ग रडतेस अशी मेजारणी?" शास्त्रीणबाई आपल्या पदरानें भागिर्थीचे अश्रू पुशीत उद्गारल्या.

आबा मास्तर आपल्या सदऱ्याच्या बाहीनें डोळे पुशीत गहिंवर दाटल्या घोगऱ्या स्वरांत उद्गारले, "माझ्या आईच्या डोक्यावर हे असे चोहोंकडून एकाहून एक मोठे दुःखाचे डोंगर कोसळत आहेत. उद्यां मृग आला कीं कुणा शेजाऱ्या पाजाऱ्याला बाबा पुता करून शेत कसेंबसें नांगरून घेईल तर—" ते अंतःकरणापासून उसळून आलेला अनावर दुःखाचा आवंढा जुलमानें कसाबसा गिळीत शास्त्रीबुवांकडे व तसेच हरिबाकडे अगतिक दुबळ्या नजरेनें पाहात म्हणाले, "शेत नाहीं, जोत नाहीं, बसून पोटभर रडेल तर बिचारीला रडत बसायला सत्तेचें घरही उरलेलें नाहीं." पुढें त्यांच्या तोंडावाटे मुळींच शब्द उमटेना.

"अरे, सगळें नाहींसें झालें तरी देव तरी आहे ना?–तो सगळें कांहीं मेजारणी! तुला देईल. तुला कांहीं उणें पडूं द्यायचा नाहीं." शास्त्रीणबाई आकाशांत मावळतीकडे वळलेल्या सूर्याकडे नजर वळवून पाहात म्हणाल्या, "तो सूर्यनारायण साक्षी ठेवून सांगत्यें मी. माझा आशीर्वाद खोटा व्हायचा नाहीं आबा!"

शास्त्रीणबाई आतां जें बोलत होत्या तें त्यांचें दुपारींच जेवतेवेळीं शास्त्रीबुवांशीं बोलून झालें होतें. त्यांच्या औदार्याचा उगमही मेजाऱ्याविषयींच्या कनवाळूपणांत व अनुकंपेंत झाला होता असेंच केवळ नव्हे. गरीब शेतकऱ्याच्या तळतळाटाला भिऊनही त्या इतक्या सुखासुखी मेजाऱ्याचें घरदार मेजाऱ्याला परत द्यायला तयार झाल्या नसत्या. पण—

काल परवां राजाराम देवळ्यानें आपल्या गांवच्या एका वाडीवर गांवांतील प्रमुख शेतकरी कुळांची गांगदेवाच्या पडक्या देवळांत सभा

घेतली होती. नऊ वर्षांपूर्वी काजरोळी गांवच्या बाबा देसायाचा खून केलेल्या कटांतील उरले सुरले माहीतगार शेतकरी व त्यांचे लेक, भाऊ त्या सभेला हजर होते. ह्या नष्ट ब्राह्मणाचा हा जुलूम आपण असा कुठंवर सहन करायचा असा खडा सवाल राजानें त्या शेतकऱ्यांपुढें टाकला होता. असल्या जुलमी सावकाराचा खून करून फांशीं गेलों तरी जाईन पण मी फांसांवर मरून इतक्या शेतकऱ्यांचीं घरें दारें, गुरें वासरें व शेतभात वांचवीन, अशा निर्वाणीच्या आवेशानें राजा त्या सभेंत बोलला होता. सुदैवानें आबा मास्तर राजाच्या बोलावण्यावरून त्या सभेला हजर होते. त्यांनीं तेव्हांच राजाची गांधीजींच्या शपथेनें स्पष्ट कानउघाडणी केली, "सावकारानें गाय मारली म्हणून आपण वासरूं मारायचें नाहीं. अपकाराची फेड अपकारानें करावी हें गांधीजींनीं आपल्याला शिकवलेलें नाहीं; अपकाराची फेड क्षमेनें व उपकारानें करावी असेंच त्यांनीं आपल्याला शिकवलें आहे."

लोकमत आपणाला नकळत आपल्याविरुद्ध किती खवळलें आहे याची चुणुक गांगदेवाच्या देवळांतील त्या सभेची कर्णोपकर्णी कानीं आलेली वार्ता ऐकून शास्त्रीणबाईंना लागली होती. आज आबा मास्तर होते म्हणून त्यांनीं त्या चिडलेल्या शेतकऱ्यांना आवरलें. पण ते उद्यां तुरुंगांत गेल्यावर मग त्या पिसाळलेल्या कुत्र्यांना कोण आवरणार? हें सूज्ञपणें ध्यानीं घेऊनच शास्त्रीणबाईंनीं दुपारीं जेवतेवेळीं शास्त्रीबुवांना हिताचे चार शब्द ऐकविले होते.

बायकोच्या शब्दाला मान देऊन शास्त्रीबुवांनीं तेव्हां होकारही दिला होता, पण तो मोघम. शेण पडलें तें माती घेतल्याखेरीज उठत नाहीं, तसे ह्या एकंदर घालमेलींतून सदबा मेजाऱ्याच्या मोडकळत्या घरदार-संसारांतून हातचें काय राखून ठेवतां येतात याचा नीट विचार करून मग ते काय तें करणार होते.

"हां! चला आतां." आबा मास्तरांना पोलिसांकडून आपणा-बरोबर चलण्याची सूचना मिळाली.

झालें. कसायाहातच्या बकऱ्यासारखे आबा मास्तर पोलिसांबरोबर वाट चालूं लागले. दूर गवताच्या गंजीपाशीं बाप हरिबाच्या मिठींत

गुरफटला गेला आहे आणि हरिबा दुःखानें मुसमुसत त्याची परोपरीनें कांहीं समजूत करतो आहे हा देखावा त्यांनीं पाहिला. पण त्यांनीं जातां जातां बापाला भेटण्याचा मोह आवरला. वेडा बिचारा! त्याच्याशीं काय बोलायचें? देव त्याला सुखी ठेवो, अशा भावनेनें त्यांनीं त्याला टाळलें असें नव्हे. पण त्यांना हरिबाला टाळायचें होतें. त्याचें मुखावलोकनही त्यांना करायला नको होतें.

आबा मास्तर व पोलीस अंगणापलीकडे जाऊन वाटेच्या चढावाला लागले. इतका वेळ बाजूला स्तब्ध उभा असलेल्या निशिकांतनें एकदम मोठ्यानें ललकारणी दिली 'महात्मा गांधी की जय!'

त्यासरसे ते शेजारी शेतकरी नवचैतन्यानें नटल्यासारखे स्फुरण पावून ललकारले, "महात्मा गांधी की जय!"

दूर गवताच्या गंजीपाशीं वेड्या सदबाची समजूत करीत उभा असलेला हरिबा ती ललकारणी ऐकून सदबाला मिठींतून सोडवून धांवत पुढें आला आणि आबा मास्तरांच्या पायावर त्या वाटेवरच्या धुळींत लोटांगण घालून कळवळून मोठ्यानें शंखनादासारखा ओरडला, "देशभक्त आबा मास्तर की जय!"

त्या आवेगासरशीं हरिबानें उठून आबा मास्तरांना कडकडून मिठी मारली.

"जा आबा तूं! हा हरिबा जिवंत आहे तोंवर कशाचीही काळजी करूं नकोस. हरिबा सावकार नाहीं; माणूस आहे. तुमच्या माना चिरण्यासाठीं तो गाढवपणानें कसाब सावकाराच्या हातांतला सुरा झाला असला तरी तो सुरा आतां कांहीं झालें तरी तुमच्या मानेवरून फिरणार नाहीं. वेळ आली तर तो त्या कसाबाच्या मानेवरून फिरेल. तसेंच झालें तर हरिबाच्या मानेवरून तो सुरा फिरेल. पण तुमच्या मानेवरून फिरणार नाहीं..."

पुढें हरिबाच्यानें बोलवेना. श्रावण महिन्यांतील पावसाच्या झडीच्या वेगानें अंतःकरणांत उफाळून येणारे अनुतापमय कृतज्ञतेचे त्याचे उद्‌गार वितळून अश्रूंच्या रूपानें घळघळ वाहूं लागले. आबा मास्तरांचीं पावलें

त्या अश्रूंनीं न्हाऊन निघालीं. इतके दिवस मनांत सांचलेला हरिबा-विषयींच्या विकल्पाचा सारा भार एकदम असा हलका झाल्यामुळें तेवढाच एक हायसा उसासा सोडून आबा मास्तरांनीं हरिबाच्या पायां पडून त्याचा निरोप घेतला. बहिरी ससाण्यासारखी शास्त्रीबुवांची हपापलेली खुनशी बोकेनजर कोळ्याच्या जाळ्यासारखी आपणावर व हरिबावर खिळून बसलेली त्यांनीं पाहिली, पण तें मनावर घेतलें नाहीं.

पोलीस व हरिबा पुढें चालूं लागले. तोंच दुरून आबा मास्तरांचा लाडका पोवळा बैल चौक टाकीत त्यांच्यापाशीं येऊन लडिवाळ लेकरा-सारखा त्यांच्या खांद्यावर मान ठेवून उभा राहिला. आबांनीं त्याला गोंजारून त्याच्या मुस्कराचें चुंबन घेतलें आणि 'जा, चरायला जा.' असें म्हणत त्याचीं दोन्ही गालफडें दोन हातांनीं हळू हळू खाजवीत हल-केच त्याला बाजूला सारून ते पुढें चालले.

सर्वांची नजर चुकवून शास्त्रीबुवांच्या गोठ्यांतून दावें खाऊन आलेली म्हैस गोठ्यालगतच्या शेणाच्या गारेपलीकडे ओलाव्याला उगवलेल्या रानाचे ओले बुडखे चघळीत उभी असलेली आबांना जातांना मागें वळून पाहात हंबरली.

तिन्हीसांजांची वेळ.—जातां जातां म्हैस हाकलून नेऊन गोठ्यांत बांधावी असें मनांत म्हणत शास्त्रीबुवा 'लाडक्या! लाडक्या!' अशी लाडिक-पणानें म्हशीला हांक मारीत तिकडे निघाले. पण म्हैस कांहीं त्यांच्याकडे ढुंकून देखील बघीना. आबा मास्तर आपला धनी. सावकारी कायद्यानें शास्त्रीबुवा आतां त्या म्हशीचे धनी झाले होते तरी त्या म्हशीला त्या कायद्याची कसली पर्वा? ती आबा मास्तरांनाच आपला धनी म्हणून ओळखीत होती. ती आपला धनी आपल्याकडे पाहात नाहीं म्हणून अपमानानें हिंपुटी होऊन कीं काय शेंपटीचा गोंडा फुलवीत रेंकत त्यांच्याकडे धांवत सुटली.

# माणसाची देवावर स्वारी

मावळत्या दिवसाची सांजवेळ.

पूर्वी ठरल्याप्रमाणें त्या दिवशीं देवाचे अवसर कांहीं निघाले नाहींत. ते आज तिसऱ्या दिवशीं निघणार होते.

त्या दिवशीं अवसर निघाले नाहींत याचें एक कारण नाना अधिकारी अकस्मात् त्या दिवशीं दुपारींच देसाईणबाईंच्या सांगण्यावरून देवगडला निघून गेले होते.

देसाईणबाई त्यांच्या गांवांतल्या गांवांत घरच्या घरींच गांवच्या म्हाताऱ्या चिंगू सुइणीला बोलावून तिच्यामार्फत आपणाला भेडसावुं लागलेल्या संकटाचें परस्पर या कानाचें त्या कानाला न कळतां ना न कळे करून टाकण्याच्या बेतांत होत्या. पण नानांना तें पटलें नाहीं. सुइणीनें कांहीं तरी जालीम औषध दिलें, तर–बरें तर बरें; नाहींपेक्षां फट् म्हणतां ब्रह्महत्या व्हायची. गंगाकाकी जाऊबाईंचें उणें शोधण्यासाठीं बगळीसारखी टपून बसली होतीच. तिला तरी उगीच गांवभर बोभाटा करायला संधि कां द्या ? त्यापेक्षां अधिक उणे चार पैसे जास्त खर्च झाले तर चालतील. पण देवगडच्या सरकारी दवाखान्यांतला डॉक्टर आणवावा आणि त्याच्याकडून नीट काय तें औषधपाणी घ्यावें.–असा त्यांचा विचार.

पण नाना तांतडीनें देवगडाला निघून गेले तरी मागें आपणासाठीं देवाचे अवसर खोळंबूं नयेत अशी त्यांनीं सारी तजवीज केली होती. सदानंद घरीं होताच. तोच खरा मानकरी देसाई. त्याला त्यांनीं जातांना आजचें देवकार्य पार पाडायला सांगून ठेवलें होतें.

पण ऐनवेळीं देवाचा एक अवसरी भगवान घाडी कुठें तरी परगांवीं निघून गेला. मग अवसर कसे निघणार ?

भगवान घाडी परगांवीं न जातां पोलिसांच्या भीतीनें घरांत लपून बसला आहे हें अनेकांना माहीत होतें. पण तें कोणी कांही बोलले नाहींत. शेजारधर्माला जागले.

त्या दिवशीं अवसर निघण्यांत आणखीही एक लहानसें विघ्न निर्माण झालें होतें. त्या दिवशीं दुपारपासून शिवराम तांब्याला अखेरची घरघर लागली होती. तो अखेर सूर्यास्ताच्या सुमाराला आटोपलाही. त्याचें मर्तिक टाकून अवसरासाठीं देवळाकडे यायला लोक तरी कसे धजणार ?

तो दिवस गेला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं नाना डॉक्टरला बरोबर घेऊन आले.

आज असें अकस्मात् डॉक्टरनें आपल्या घरीं येण्याचें काय कारण हें सदानंदाला कळेना. गेले आठ पंधरा दिवस आपल्या पोटांत कुठें तरी कांहीं तरी दुखतें अशी आईची—देसाईणबाईची—कुरकुर तो ऐकत होता खरी. पण तरीदेखील त्या घरांत हिंडत फिरत कामधंदा करीत व जेवीत खात होत्याच. सकाळीं आंघोळ झाल्यावर दांडीवरचें सोवळें लुगडें नेसून अगत्यानें तुळशीला दोन घटका प्रदक्षणा घालण्याच्या त्यांच्या नियमालाही त्यांच्या आजारीपणामुळें खंड पडला नव्हता.

अशा स्थितींत मुद्दाम देवगडाहून डॉक्टर आणवण्याइतका आपल्या आईचा कसला आजार बळावला आहे हें कांहीं सदानंदाच्या ध्यानीं येईना.

डॉक्टरची सरबराई करण्यांत गढून गेलेल्या नानांनी कधीं नव्हत्याच्या प्रेमळपणानें, कळकळीनें डॉक्टरच्या देखतच सदानंदाला सांगितलें, "अरे, आज डोंबावरच्या बाजाराचा दिवस आहे. दुपारपावेतों बाजार भरलेला असतो. आणि सत्याग्रहाच्या प्रचाराची सभा घ्यायला ही वेळ खरी मोक्याची आहे. जो उठला तो आपला मला विचारीत सुटतो कीं सदानंदसाहेब आमच्या वाडीवर कधीं सभा घेणार ? तूं आजारी होतास हें लोकांना माहीत आहे. पण आतां तुला जरा बरें वाटतें ना ? हिंडाय-फिरायचे थोडे कष्ट पडले तरी आतां कांहीं फारसे जाणवायचे नाहींत. जा. मी येतांना एका दोघांना सांगूनही ठेवलें आहे आज आत्तां

दुपारच्या आंत डोब्रावरच्या बाजार तळावर गांधींची सभा आहे म्हणून. जा. जाऊन ये."

आपण ज्या कार्यासाठीं इकडे आलों तें कार्य असें अनायासें वडिलांच्या प्रोत्साहनानें पार पडूं लागलेलें पाहून सदानंदाचा आनंद गगनांत मावेना. आपल्या वडिलांविषयीं त्याच्या मनांत जो काय थोडा फार विकल्प आजकाल सांचला होता तोही त्यांच्या त्या कॉंग्रेसनिष्ठ कळकळीच्या उद्गारांनीं दूर झाला. तसाच त्याच पावलीं तो डोब्रावरच्या बाजारांत सभा घ्यायला गेला.

दुपारीं एक वाजतां तो डोब्रावरून सभा घेऊन माघारा आला. येतांक्षणीं त्यानें प्रथम आईच्या प्रकृतीची डॉक्टरपाशीं चौकशी केली.

"अपेंडिसायटिस आहे. शस्त्रक्रिया केली पाहिजे." डॉक्टर गंभीर चर्या करून उद्गारले, "तसें कांहीं भिण्याचें कारण नाहीं. पण हा रोगच असा आहे कीं त्याच्याकडे दुर्लक्ष करण्यांत धोका आहे. जितकी लवकर शस्त्रक्रिया करावी तितकी चांगली."

नाना तेव्हां जवळच होते. ते मध्येंच म्हणाले, "अरे! तुझ्यामागें नाहीं लावीत ती कटकट मी. मी जाईन तिला देवगडला घेऊन दोन चार दिवसांत. तुला त्याची काळजी नको. तूं आपला ज्या कामासाठीं आलास तें काम खुशाल कर. घरांतला आजारीपणा कांहीं ना कांहीं असा चालायचाच. प्रपंच म्हटला कीं सगळें आहे."

डॉक्टर संध्याकाळीं माघारे गेले. सदानंदही गांवच्या दोन वाड्यांवर जाऊन प्रचारकार्य करून आला.

आणि आज हा तिसरा दिवस.

दुपारचीं जेवणें झाल्यावर अवसराची नौबत करून शिवनाक देसायाच्या घरीं आला. तेव्हांची ती वेळ वास्तविक नानांची वामकुक्षी करून उठायची. ते उठले असतील या आशेनें शिवनाकानें अंगणाच्या आखाड्याबाहेरून हांक मारली, "नाना!"

सर्पदंशाच्या दुखण्यांतून सदानंद नुकताच बरा झाला होता. अजून घराबाहेर फारसा हिंडूं फिरूं लागलेला नव्हता. प्रथमच तो त्या गांवीं

आलेला, आणि 'प्रथमग्रासे मक्षिकापातः' या न्यायानें गांवांत पाऊल टाकतांक्षणीं पहिल्या पावलालाच त्याच्यावर सर्पदंशाचा हा जिवावरचा प्रसंग आला. त्या दिवशीं घाटीवरील बाबदेवाजवळच्या नांदरुकीच्या झाडांतून निघालेल्या सापाला सदानंदानें चुकून दगड मारला तो दावा धरून तो सापच सदानंदाला अर्ध्या घाटीवर गांठून डसला, असें गांवचे लोक बोलत.

सदानंदानें ती बाजारगप गेल्या तीन आठवड्यांत अनेकांच्या तोंडून ऐकली होती. त्याचा असल्या रानटी चमत्कारांवर फारसा विश्वास जरी नसला तरी त्याचें मन दुबळेपणानें थोडी कच खाऊं लागलें होतें. ती नष्टभूमि एकदां कशी काय आहे तें पाहावें तरी या हेतूनें तो नाना देवगडला गेले अशी संधि साधून त्या दिवशीं एकदां तिकडे जाऊन आला होता. जातांना तो जमनाच्या झोंपडीकडेही गेला होता. जमना त्याला भेटली. शांताही भेटली. दोघींच्याही दारुण करुण कहाण्या ऐकून त्याला फार दुःख झालें. पण करतो काय ?

अशा त्या अक्राळ विक्राळ विचारचक्रांत तो तेव्हां गुरफटून गेला असल्यामुळें त्याला शिवनाकाची पहिली हांक ऐकूं आली नाहीं.

अर्धें मिनिट वाट पाहून शिवनाकानें पुन्हा हांक मारली, " नानासाहेब ! "

ती हांक मात्र सदानंदाला ऐकूं गेली. त्यानें खोलीच्या खिडकींतून डोकावून कोण आहे म्हणून पाहिलें तों शिवनाक !

" काय रे ? " सदानंदानें सौम्य स्नेहाळू स्वरांत विचारलें.

ज्याचा जीव जगवल्याची पुण्याई आपल्या गांठीला आहे तो आपला धनी आपणाशीं आपुलकीनें एक शब्द बोलतांना ऐकून शिवनाकला एक परीनें कृतार्थ झाल्यासारखें वाटलें.

" नाना आहेत घरांत ? " त्यानें हात जोडीत विचारलें.

" आहेत का पाहतों. थांब जरा. " असें सांगत सदानंद माडीचा जिना उतरून खालीं आला. नानांना शोधीत तो ओटीवरून माजघरांत व माजघरांतून मागील दाराकडे वळला. जातांना त्यानें सहज स्वयंपाक-

घरांतून डोकावून पाहिलें तों स्वयंपाकघरांतून असलेलें मागील दारच्या घिरटीच्या खोलीचें दार किलकिलें लोटून घेतलेलें त्याला आढळलें. खोलींत बसून आपले वडील आणि आपली दत्तक आई यांची हळू हळू कुजबुज चाललेली त्याला ओझरती ऐकूं आली.

कडाडून कोसळलेल्या विजेची धगधगीत किरणशलाका आपल्या कानांत घुसून कान जाळीत आहे असा भास त्याला त्या दोघांच्या कुजबुजींतले ओझरते चार शब्द ऐकूनच झाला. सर्वांगावर एखाद्या अतिभीषण घटनेच्या जाणीवेनें कांटा उभा राहावा व सर्वांगाला संतापानें आणि तिटकाऱ्यानें थरकांप भरावा तशी त्याची अवस्था झाली. कुणीही बोलतांना चोरून ऐकण्याची त्याला संवय नव्हती. पण त्या क्षणीं त्याला वाटूं लागलें कीं आपण या चोरांच्याच कैदखान्यांत येऊन पडलों आहों कीं काय ?

स्वयंपाकघराच्या दाराची फळी अगदीं हालक्या हातानें किंचित् कलती ओढून घेऊन त्या आडोशानें तो कान टवकारारून ऐकत उभा राहिला.

खोलींत त्या दोघांची कुजबुज चाललीच होती.

" मग तुझें तूं पाहा. पण माझें ऐकायचें असेल तर स्वतःच्या मानेला आणि तुझ्याबरोबर माझ्याही मानेला अशानें गळफांस लागणार आहे हें फिरून एकवार तुला सांगतों. "

" गळफांस कसला लागायचा त्यांत ? चिंगू कांहीं तशी अडाणी सुईण नाहीं. डॉक्टर काय करतो तिच्या औषधापुढें ? "

" आणि औषध घेऊन पोर पोटांतच मेलें आणि बाहेर आलें नाहीं तर ? "

" तर काय ? मरण येईल, एवढेंच ना ? अब्रूनिशीं असें मरण आलें तरी पत्करलें. पण डॉक्टराच्या हातून ते धिंडवडे व्हायला नकोत. नाहीं तरी आज नाहीं उद्यां मरायचेंच आहे. "

" तें खरें. पण झांकली मूट सव्वालाखाची ठेवून अब्रू राखून मरायचें आहे कीं तुझी माझी बेअब्रू करून मरायचें आहे ? "

तोंच ती कुजबुज ऐकतां ऐकतां संतापानें बेभान झालेल्या सदानंदाला आपल्या मस्तकाचा तोल कांहीं सांवरतां आला नाहीं; आणि त्या भारानें दरवाजाची फळी लोटली जाऊन भिंतीवर धाडकन् आदळली. त्यासरसें नानांनीं खोलींतून एकदम दचकून विचारलें, "कोण आहे?"

तेवढ्यांत प्रसंगावधान राखून सदानंद स्वयंपाकघराच्या दारांत उभा राहून म्हणाला, "शिवनाक तुम्हाला हांक मारतो आहे."

"कशाला आला आहे म्हारडा?" असें जळफळत नाना खोलीचें दार उघडून बाहेर आले.

आईच्या व्यभिचाराची ती कहाणी ऐकून हॅम्लेटसारखा बेभान झालेला सदानंद वडिलांमागोमाग माडीवर जातां जातां मनांतल्या मनांत स्वत:वर आक्रोशत होता, "हा बदफैली बाप! ही बदफैली आई! आणि मी यांचा मुलगा! कशाला मी दत्तक बसलों अशा ढालगज बाईच्या मांडीवर? जीवनांतील सर्व परींच्या खातेऱ्यानें बरबटलेल्या ह्या चांडाळाहूनही चांडाळ अशा देसाई वंशांत—ऱ्या रौरव नरकांत—मी कां म्हणून डुंबतों आहे?... बाकी, एका अर्थानें हा नरकांतला किडा नरकांतच येऊन पडला. त्या नरकांतून ह्या नरकांत एवढाच फरक! जन्मदात्या बापाची कीर्ति तशी, आणि मला मांडीवर दत्तक घेणाऱ्या आईची कीर्ति ही अशी!...कां म्हणून मी डुंबत राहतों आहें या मायावी कुटुंबाच्या खातेऱ्यांत?"

त्या विचारासरशीं त्याच्या अंत:सृष्टींत एकाहून एक विद्रूप पिशाच्चें नाचूं लागलीं. पिशाच्चें कसलीं? त्याच्या कुटुंबांतलीं म्हणून गणलीं गेलेलीं ह्या जगांतलीं माणसेंच होतीं तीं! तो ज्यांना दत्तक गेला होता त्या देसाईणबाई त्याच्या सख्ख्या मावशी आणि दत्तविधानानंतरही आजवर त्याच्या आयत्या वांट्याला आलेल्या त्या दौलतीचा कारभार पाहणारा प्रत्यक्ष त्याचा जन्मदाता बाप!—तें सारें आठवून तो मनांत तडफडत होता, "हा जन्मदाता बाप बाप नव्हेसा होत नाहीं, म्हणूनच हा पिता-पुत्राच्या नात्याचा गळफांस मी मरेतों सहन करायचा. हा फांस तोडतां येत नाहीं म्हणून सहन करायचा! नाहींपेक्षां कट्टा वैरी तरी याहून माझें काय वाईट करणार होता?...दिनकर देसाई ह्या घराला विटून तोंड घेऊन निघून

गेला तो उगीच नाहीं. प्रत्यक्ष आपल्या जन्मदात्या आईचा व्यभिचार पाहून मुलाला कसा संताप येणार नाहीं? ... बाकी ही चूक केवळ मावशीची नाहीं. तरुण विधवा चुकून वाटेची आडवाटेला गेली तर त्या पापाचें खापर खरें पाहतां आमच्या ह्या किडलेल्या, बठलेल्या, सडलेल्या मरतुकड्या समाजाच्याच माथ्यावर फोडायला हवें. बायका अजाण असतात. म्हणून काय नानांसारख्या जगांत वागलेल्या शहाण्यासुरत्या पुरुषानें मावशीच्या अजाणपणाचा असा फायदा घ्यायचा ? माणूस नव्हे, राक्षस आहे हा. असला हा बाप ! आणि मी त्या बापाचा मुलगा ! !..."

---

शिवनाकाला पाहून नाना ओसरीच्या पडवींतून रागीट स्वरांत म्हणाले, "काय रे शिव्या ! कशाला आला आहेस ?"

"थोडें काम आहे नाना, तुमच्याकडे !" शिवनाक अजीजीच्या भावनेनें हात जोडून म्हणाला.

नानांनीं दरवाजांतूनच 'काय' अशा प्रश्नार्थानें भुंवया वर चढवीत त्याच्याकडे पाहिलें.

"दहा रुपये हवे आहेत उसने."

शिवनाकाच्या तोंडचें वाक्य बोलून होतें न होतें तोंच नानांनीं मानेनें नकार दिला.

"नाहीं म्हणूं नका नाना ! आज पैसे मला मिळाले नाहींत तर माझ्या पोराची कांहीं धडगत नाहीं. घरांत बायको अंथरुणावर मरत पडली आहे. पिऱ्याला पोलीसांनीं चावडींत डांबून टेवलें आहे. एवढा तरी हात ओला केल्याखेरीज गंगाराम पोलीस पाटील कांहीं त्याला सोडायला तयार नाहीं. म्हणून म्हणतों, एवढी गरज करा. नाहीं म्हणूं नका. तुमचे उपकार मी मेलों तरी विसरायचा नाहीं."

"समजलें. तसा तूं उपकाराची वस्तू आहेस हें मला काय माहीत नाहीं ? पण पैसे माझ्याकडून नाहीं मिळायचे. त्या राजा देवळ्याकडून घे जा ना ! गांवाला आग लावायला आला, त्यालाच तुझ्या नांवानें बोंब मारायला बोलाव. आम्ही तुमचे वैरी. तुम्हां मेंढरांना

कच्चीं चावून खाणारे लांडगे आम्ही. त्या लांडग्यांच्या दारांत पुन्हा कशाला रे येतां मरायला ?—"

जखमेवर मीठ चोळावें तसें नानांचे ते शब्द शिवनाकाच्या कष्टी मनाला अगदीं जिव्हारीं भिडल्यासारखे झोंबले. बापुडवाण्या नजरेनें त्यानें वर माडीच्या खिडकीकडे पाहिलें.

सदानंद खिडकींत उभा राहून लक्षपूर्वक त्या दोघांचें संभाषण ऐकत होता. दावा धरलेला साप नेमकी वेळ साधून डसावा तसा नानांनीं शिवनाकाला नेमका संकटाच्या घटकेला दंश करून जखमेंत गरळ ओकलेलें पाहून त्याचा जीव हळहळला.

"जाऊं तर नाना ? नाहीं ना करीत एवढें काम ?" शिवनाकानें डोळ्यांत आंसवें आणून दीनवाणी चर्या करून विचारलें.

"नाहीं." असें तुटकें उत्तर देत नाना आंत गेले.

शिवनाक मस्तकावर आकाश कोसळून त्या भाराखालीं ठेंचाळल्यासारखा चिंतेचे उसासे सोडीत देसायांच्या दारांतून विन्मुख माघारा परतला. समोरून पेटत कोसळणाऱ्या उल्केसारखा संतापानें धगधगत राजाराम देवळी देसायाच्या घराकडे येतांना पाहून देखील तो त्याच्याशीं कांहीं बोलला नाहीं. अर्धमेल्या वृत्तीनें खालीं मान घालून पुढें चालला.

"काय हा निर्दयपणा !" सदानंद आपल्या मनाशीं उद्‌गारला. शिवनाकानें सर्पदंशावर ऐन वेळीं औषध दिलें म्हणून मुलगा आज जिवंत दिसतो आहे. एवढी देखील उपकाराची जाणीव आपल्या बापाला असूं नये याचा त्याला विस्मय वाटला.

याच पावलीं आपण जावें आणि शिवनाकाला हांक मारून त्याला हवे असलेले दहा रुपये द्यावे असें मनांत योजीत तो माडीवरील कपाटाकडे वळणार तोंच खालून रस्त्यावरूनच राजारामनें त्याला हांक मारली, "साहेब ! फार जरुरीचें काम आहे. जरा खालीं या. कीं मी वर येऊं ?"

"ये ना, वरच ये." सदानंद कपाट उघडतां उघडतां खिडकींतून पाहात म्हणाला.

ओसरीवर नाना बसले होते. त्यांच्याकडे न पाहातां राजाराम सरळ माडीवर निघून गेला. ती अमर्यादा नानांच्या खानदानी मानाला जपणाऱ्या मनाला जाणवली. हा यःकश्चित् देवाळ्याचा पोर उर्मटपणानें बेधडकपणानें माडीवर जातो याचा अर्थ काय?

"तुम्ही धनी. तुमच्याकडे दाद मागायला आलों आहें." राजा उभ्या उभ्याच रागाच्या आवेशांत सदानंदाला म्हणाला.

"कां? काय झालें?" कपाटांतली दहा रुपयांची नोट काढून मुठींत घेत सदानंदानें विचारलें.

"काजरघाटीखालच्या तुमच्या वृंदावन शेतांत आयत्या बिळांत नागोबा तो ठाण मांडून बसूं पाहातो आहे रावबा विचारे. तुमच्या हातून याचा बंदोबस्त होणार आहे कीं आम्ही गांवकरी आमच्या रीतीनें त्याचा न्याय करूं? जमना म्हणजे काय समजला हा? सगळ्या लोकांदेखत दांड-गाईनें तिला पदराला धरून फरफटत ओढून झोंपडीबाहेर काढतो आणि करूं नये तशी तिची बेअब्रू करून तिला ठिकाणाबाहेर पिटाळून लावतो?"

"एकूण ती गोष्ट या थराला आली म्हणायची! पण काय रे! तूं परवां म्हणालास तसें जमना तें टिकाण बापटशास्त्र्यांकडून आपल्या नांवा-वर कां नाहीं करून घेत? शिवरामची मरत्या वेळची तशी इच्छा होती ना?"

"होती! पण ती इच्छा शिवराम मेला त्याच्याबरोबर मरून गेली!" राजाराम दीनवाण्या नजरेनें पाहात म्हणाला, "मरतां मरतां शिवरामच्या गळ्यासभोंवार सावकारानें आवळलेला फांस तो मेला तरी तुटला नाहीं. उलट जमना त्या फांसावर लटकली."

"म्हणजे?"

"म्हणजे काय! हा बापटशास्त्री सावकार 'बाबा देसाई' व्हायची वाट चालतो आहे. तुम्ही आम्हांला गांधीजींचें नांव घेऊन सांगतां साहेब! कीं अपकाराची फेड देखील उपकारानें करावी म्हणून. पण इथें काय उपकार करायचे आणखी ह्या सावकारावर? धडधडीत खोटें बोलून,

आबा मास्तर पकडले गेले याचा फायदा घेऊन शिवरामचे सहाशें रुपये घशांत टाकले यानें. आबा मास्तर भोळा! सरळ माणूस पडला तो! त्यानें त्या काळ्यांच्या हातचा लेख बापट सावकाराच्या हातीं द्यायचा नव्हता तो दिला. बकरा कसाबाच्या सुरीखालीं सांपडला. आतां कसाब मान कापतो म्हणून ओरडून मरायचें वाचतें थोडेंच? काळे सावकारानें शिवरामजवळ सासऱ्याला दिलेली ती चिठ्ठी जर हातीं असती तर शिवराम मेला तरी या सावकाराच्या हाडांकडून सहाशे रुपये वसूल केले असते. पण ती चिठ्ठी राहिली सावकाराच्या कलमदानांत. मी स्वतः काल जाऊन बापटांना पैशाबद्दल विचारलें. आबा मास्तरनें सांगून ठेवलें होतें मला, पोलिसांबरोबर कैद होऊन देवगडला जातांना. त्याच दिवशीं परवां शिवरामच्या समाचाराला येणार होता सावकार ते पैसे घेऊन! तो कां आला नाहीं म्हणून काल सकाळीं बघायला जातों तों याचे आपले दोन्ही कानांवर हात! शिवरामनें मरतांना मला मुद्दाम जवळ बोलवून सांगितलें होतें कीं बापटशास्त्र्याकडचे सहाशे रुपये आण आणि ते तसेच्या तसे जमनाच्या हवालीं कर. तिच्या हातून रीतसर त्या रकमेची रावबा विचाऱ्याला फेड होऊं दे आणि ठिकाणाचें खरेदीपत्र तिच्या पदरीं पडूं दे..."

तेवढ्यांत ओसरीवरून जिन्याच्या तोंडापाशीं येऊन त्या दोघांचें संभाषण चोरून उभे ऐकत असलेल्या नानांनीं हांक मारली, "ए राजा देवळी! जरा खालीं ये."

राजा जणूं ते नानांचें आव्हान स्वीकारीत खालीं आला व उभ्या उभ्याच विचारूं लागला, "काय?"

"अरे, कां डोकींत राख घालतोस उगीच अशी? लालभाई तुम्ही गिरणीवाल्यांना खा, खोत जमीनदारांना खा, पण घरच्या माणसांना देखील तुम्ही खातां का रे? काय अडलें होतें तुझें आज त्या ठिकाणांत जायचें?" नानांनीं पोक्तपणानें विचारलें.

नानांच्या बोलण्यांतली खोंच राजाच्या तेव्हांच ध्यानीं आली. आपली धाकटी बहीण तारु आणि रावबा विचारे यांचें नवें नातें ध्यानीं घेऊन ते बोलत होते हें त्यानें ओळखलें.

"असें बघ, पिसाळला कुत्रा, म्हणून काय आपल्याच ढुंगणाचा चावा घेईल?" नाना पुन्हा म्हणाले.

"तें मला विचारूं नका. मी गंगाराम देवळ्याचा लेक म्हणून तुमच्याशीं बोलत नाहीं, तुम्हांला एकदां सांगून ठेवतों. मी त्याचा लेक नाहीं आणि तो माझा बाप नाहीं. परवांच नाहीं सांगितलें तुम्हांला आम्ही बापलेक एकमेकांना मेलों.— "

"नाहीं, आत्तां तूं वर सांगत होतास—बापटशास्त्र्यांनीं फसवलें, म्हणून विचारतों. तो पांसष्ठ वर्षांचा म्हातारा ब्राह्मण खोटा; आणि हा विस्तवावांचून जगाला आग लावीत सुटणारा आबा मास्तर तेवढा खरा?"

तेवढ्यांत बापटशास्त्री तिथें उगवलेले आढळले. त्यांना समोरून गंगाकाकीच्या घराकडून आपल्याकडे येतांना पाहूनच नानांनीं उदार मनानें ती शब्दांची साखरपेर चालविलेली होती.

तेवढयांत देवळाकडे अवसराची दुसरी नौबत वाजूं लागली.

अंगणांतून हांक मारीत बापटशास्त्री आंत आले, "अहो नाना! अहो ही दुसरी नौबत झाली कीं! देवळाकडे नाहीं यायचें?"

सदानंद तें ऐकून अर्ध्या जिन्यांतून बाहेर ओसरीवर आला. राजाराम शिकाऱ्यावर झडप घालण्याच्या निर्वाणीच्या पवित्र्यांत उभा राहून बापटशास्त्र्यांकडे नजर रोखून पाहूं लागला.

आतांच नानांनीं बापटशास्त्र्यांचा 'बाबा देसाई' करण्याचे भयंकर विचार राजारामच्या तोंडून ऐकले होते. ते आठवून नाना उठले आणि खुंटीवरचें उपरणें अंगावर घेऊन खादीची टोपी डोकीवर ठेवीत देवळाकडे जाण्यासाठीं बाहेर पडतां पडतां शास्त्रीबुवांना डोळ्यानें खुणावीत म्हणाले, "चला."

सदानंदही मनांत उसळून आलेल्या संतापाचा एका निःश्वासानें मारून मुटकून विरंगुळा करीत राजारामला म्हणाला, "चल. काय काय गोंधळ घातला आहे या लोकांनीं तिकडे जमनाच्या ठिकाणांत तो मला समक्ष जाऊन बघायचा आहे."

" चल. " असें म्हणत राजाराम राख सांचून विझूं लागलेल्या पेटत्या निखाऱ्यासारखा शांत होत बाहेर निघाला.

सदानंद सदरा टोपी घालून जिना उतरून खालीं आला. देसाईणबाई माजघरांतून तें सारें पाहात होत्या. बापाविरुद्ध मुलगा वैऱ्यासारखा उलटून वागूं लागला आहे याचा तिलाही अचंबा वाटला व रागही आला. सदानंदाला राजारामबरोबर जातांना पाहून तिनें हांक मारली, " सदानंद ! जरा इकडे ये. "

पण सदानंद मागें फिरला नाहीं. आईच्या हांकेला त्यानें नुसता हुंकारही दिला नाहीं. राजारामच्या गळ्यांत हात टाकून तो चालूं लागला.

—

देवळाकडे देवाच्या अवसराचा मारे धूमधडाका सुरू होता.

आज भगवान घाड्याच्या अंगांत गांगदेवाचें वारें अगदीं कडकडून आलें होतें. कुडीचें हाडन् हाड खिळखिळें व्हावें अशा आवेशानें तो आज वदत होता.

आपणाला अगोदर देवाच्या पायांपाशीं जाऊन दाद मागण्याची संधि मिळेल ह्या आशेनें देवाच्या सभामंडपांत गर्दी करून उभे असलेल्या मंडळींना बाजूला करीत गंगाराम देवळी पुढें गेला व आंत गोपुरांत उभी असलेल्या गंगाकाकीच्या वतीनें त्यानें तिचें गाऱ्हाणें प्रथम ऐकून घेण्याची देवाला विनंती केली.

गंगाकाकीचें गाऱ्हाणें अर्थात् दुसरें तिसरें कांहीं नव्हतें ! शांतू भावणीबाबतचें होतें. शांतूची मति अलीकडे चळली आहे ती आपला कुळाचार सोडून, देवसेवा सोडून भलत्याच वाटेनें जाऊं लागली आहे; तिचें डोकें ठिकाणावर यावें म्हणजे आपण गांगदेवाच्या तरंगाला रुप्याचा कळस करून देऊं असें तें गाऱ्हाणें होतें.

गंगारामचें देवापुढें गाऱ्हाणें गाऊन संपतें तोंच शांता दुखवलेल्या नागिणीसारखी अकस्मात् देवळांत येऊन गंगाकाकीशेजारीं उभी राहिली. तिला आलेली पाहून गंगाकाकीनें भक्तिभावानें देवाला तिथूनच

हात जोडले आणि अंगाऱ्याच्या कुंडांतील अंगारा शांताचें मंगल चिंतीत तिच्या कपाळाला लावला.

इकडे देव जोराजोरानें वदत बोलूं लागला, "मग देसाईणीचें म्हणणें काय ?"

"म्हणणें इतकेंच देवा! कीं शांतू भावणीला चांगली बुद्धि व्हावी. तिच्या बापानें, मावशीनें तुझी मर्यादा मोडली आणि तें घराणें मोडायची वेळ आली आहे. तसें न व्हावें."

"भावीण कुठें आहे ?" देवानें देवळांत दूरवर नजरेच्या एका झटक्यासरसें पाहात विचारलें.

"जा.–जा पुढें. देवाच्या पायावर डोकें ठेव आणि हात जोडून देव काय सांगतो तें ऐक. जा—" शांताच्या पाठीवर आपुलकीनें हाताची थाप मारीत गंगाकाकी म्हणाली.

पारध्याच्या हातांतून धनुष्यबाण सुटावा तशी शांता बाणासारखी सभामंडपांत गेली आणि देवासमोर उभी राहून हात जोडून म्हणाली, "हां! काय म्हणतोस देवा ?"

"तुला लगन करून माझ्या पायापाशीं बेइमानी करायची आहे कीं वाडवडिलांची चालरीत राखून भावीण होऊन माझी सेवा करायची आहे ? बोल."

शांता पदराखालीं पोलक्याच्या खिशांत उजवा हात घालून देवाकडे पाहूं लागली. तिच्या नजरेंतून भडकणाऱ्या ज्वाला आतां धुमसण्याच्या पलीकडे जाऊन पेटूं लागल्या होत्या.

"बोल. तुझ्या साऱ्या कुळाची वाताहात कां झाली तुला माहीत आहे ? माझ्या सेवेंत जीं अंगचुकारपणा करतील—"

इतक्यांत डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच शांतानें टीचभर लांबीची बाटली पोलक्याच्या खिशांतून काढून उघडून देवाच्या तोंडावर फेंकली. त्यासरसा देव हातांतील तरंग टाकून दोन्ही हातांनीं तोंड चोळीत मोठ्यानें किंचाळला.

दंश करून सळसळत निघून जाणाऱ्या नागिणीसारखी शांता सभामंडपांतून बाहेर निघून गेली. पण तिच्याकडे कुणाचेंही लक्ष गेलें नाहीं. जो तो देवाच्या किंचाळ्या ऐकत, भगवान घाडी त्या तेजापाच्या आगीनें चांगलेंच भाजलेलें स्वतःचें तोंड दोन्ही हातांनीं चोळतांना पाहून गांगरलेल्या वृत्तीनें आपापल्या मनाला विचारीत होता, "हा काय अनर्थ?"

वदणाऱ्या सर्व देवांनीं लगेच 'स्थिर केलें'—अंग सोडलें. भगवान घाड्याला उपचार करण्यासाठीं धांवपळ सुरू झाली.

नाना अधिकारी व बापटशास्त्री त्या गर्दीतून धूर्तपणें बाजूला सटकले. गंगाकाकी मात्र भगवान घाड्याच्या भाजलेल्या तोंडावर उपचार करण्यांत गढून गेलेल्या मंडळीवर सर्व खानदानी भाडभीड मोडून, चालरीत सोडून मुकादमी करण्यांत गढून गेली.

जिकडे तिकडे त्या अत्याचारामुळें एकच गोंधळ उडाला.

दिवेलावणीची वेळ झाली. देसाईणबाईंनीं ओसरीवर येऊन समई लावली आणि देवघरांत देवापाशीं तेवणाऱ्या नंदादीपाची वात सारीत 'शुभं करोति' म्हटलें. तरी देखील देवळाकडून आल्यावर ओसरीवर बोलत बसलेल्या नाना अधिकारी, बापटशास्त्री या दोघांचें बोलणें संपलें नव्हतें. समुद्रमंथनांतून हालाहल निघतांना खवळलेला समुद्र त्या दोघांना आपल्या सभोंवार प्रळय गर्जत असलेला ऐकूं येत होता.

आपल्या कलहमय विषमतापूर्ण जीवनांतील विराट भीषणता त्या संध्याकाळीं प्रथमच सदानंदाच्या मनाला खरी जाणवली.

जमना आणि रावबा यांचें निकराला गेलेलें भांडण सोडवून त्यांची समजूत करण्यासाठीं म्हणून तो राजारामला बरोबर घेऊन तिकडे गेला. पण तो त्या बाबतींत कांहींही उपाययोजना करूं शकला नाहीं.

देसायांच्या अफाट जमीनदारीचा धनी या नात्यानें त्यानें रावबाला खूप दटावून पाहिलें. पण रावबानें कायद्याच्या आधारावर त्याला जाणीव करून दिली, " तूं जमीनदार आहेस तसा मीही आतां जमीनदार आहे.

तूं मोठा जमीनदार असलास तर मीही आतां लहानसा तरी जमीनदार आहेंच. रखेल्या ठेवायचा अधिकार काय एकट्या देसाई जमीन-दारांनाच आहे ?"

अगदीं या शब्दांत नाहीं तरी या बेदरकार वृत्तीनें रावबानें जमनाच्या त्या वृंदावन ठिकाणांत नवा खरेदीदार मालक म्हणून हक्कानें उभा राहून सदानंदाला धुडकावून लावलें होतें.

तें दुःख सदानंदाच्या मनाला चांगलेंच झोंबलें. तो आपणालाच विचारूं लागला, "आपण या गांवचा एवढा मोठा देसाई मालक असतांना हा दीड दमडीचा फाटका बेलीफ आपणाला जो इतका उन्मत्तपणें धुडकावूं शकला हें रावणबळ त्याच्या ठायीं कुठून आलें ?"

हा विचार करतां करतां त्याला उघड आढळून आलें कीं रावबाला त्या लहानशा जमिनीच्या तुकड्याच्या मालकीचा एवढा मद चढला आहे; पण त्याला आपण कोणत्या तोंडानें नांवें ठेवावीं? शेतकरी कुळां-कडून ठार मारला गेलेला आपला दत्तक बाप बाबा देसाई यानें तरी याच ठिकाणाबाबत काय कमी अरेरावी जमीनदारी गाजविली होती? आणि सदानंदाच्या जन्मदात्या नाना अधिकाऱ्यांची अरेरावी तरी त्या गांवांत काय कमी चालली होती ?

त्या आठवणीसरसा सदानंद कडाडत्या विजेचा लोळ अंगावर कोसळल्यासारखा लाजिरवाण्या संतापानें आंतल्या आंत धगधग पेटूं लागला. हा आपला जन्मदाता या नात्यानें त्याला नानांविषयीं वाटणारा नैसर्गिक आदर तो या काजरोळी गांवीं आल्यापासून गेल्या तीन आठवड्यांत दिवसेंदिवस वद्य पक्षांतील चंद्रासारखा कलेकलेनें क्षीण होत होता.

त्या ओसरण्याचा कडेलोट त्या दिवशीं संध्याकाळीं त्यानें घराच्या मागील दारच्या खोलींतील त्यांचें तें किळसवाणें संभाषण कानीं पडल्या-क्षणीं झाला होता.

त्या सायंकाळीं रावबाला धिःकारण्यासाठीं पुढें सरसावलेल्या त्याच्या मनाला नाठाळ परिस्थिति उपहासपूर्वक विचारीत होती, "अरे! रावबानें

बऱ्यावाईट उपायानें कां होईना पण पैसा मिळवून त्या पैशाच्या जोरावर तरी या ठिकाणाची मालकी संपादन केली आहे. पण ह्या देसाई दौलतीचा मालक म्हणून आज जो इथें मीरवायला आला आहेस त्या तूं तरी ह्या मालकीहक्क मिळवण्याकरितां काय कष्ट सोसले आहेस ? नानानें देसाई घराण्यांतली अफाट दौलत अनायासें लाटण्याचा डाव रचून लाजिरवाण्या उपायांनीं वश केलेल्या ह्या देसाईणबाईला तूं दत्तक गेलास आणि तूं त्या व्यभिचारी आईबापांचा पुत्र म्हणवून घेण्यांत लाज न मानतां असा उजळ माथ्यानें धनी म्हणून मिरवतो आहेस. आतां सांग, रावबाला हंसायचा तुला काय अधिकार आहे ? ”

“ आमचें आम्ही पाहून घेऊं; तुम्हांला आमच्या भानगडींत पडायचें कारण नाहीं. ” असा रावबाच्या तोंडून जमनासमोर, त्या तारू भावणीसमोर पाणउतारा करून घेऊन सदानंद लाजिरवाण्या अगतिक वृत्तीनें त्या ठिकाणाबाहेर चालला तेव्हां राजाराम त्याच्याबरोबर होता. त्याचीच धाकटी बहीण तारा भावीण. त्या ठिकाणाची ती नवी मालकीण. रावबा विचारे मालकाची ती भावीण तोऱ्यानें रावबाशेजारीं उभी राहून त्याला उद्दाम शब्दांनी नाहीं तरी उद्दाम वृत्तीनें, उद्दाम मुद्रेनें, उद्दाम नजरेनें साथ देत होती.

तो मुंगीएवढया क्षुल्लक जिण्याच्या जाणिवेनें मुकाटपणें ठिकाणाबाहेर पडला. तेव्हां जातां जातां त्याला एकदम वीज कडाडल्यासारखें तारा आणि जमना यांचें भांडण झोंपडीपाशीं जुंपल्याचें ऐकूं आलें. देऊं नयेत त्या शिव्या देऊन तारा जमनाला झोपडीबाहेर काढण्यासाठीं निर्भर्त्सना करूं लागली. तिच्या त्या बेताल वर्तनानें चिडून राजाराम तीरासारखा हात उगारून तिच्यावर धावून गेला तरी ती नरमली नाहीं.

तेव्हां एकदां सदानंदाच्या मनांत असेंही आलें कीं आपण पुढें जावें आणि ताराची चांगली कानउघाडणी करावी. पण मागें जाण्यासाठीं उचललें गेलेलें त्याचें पाऊल लगेच आखडलें गेलें. पुन्हा त्याच्या मनाला खिजवून परिस्थितीनें जाब विचारला, “ कोण रे तूं तिला दटावणारा ? तारू त्या ठिकाणाच्या मालकाची रखेली तरी आहे. परंपरेचा वडिलार्जित

कुळधर्म पाळून ती भावीण–वेश्या बनली, यांत तिचा काय अपराध ? पण तूं ज्या आईच्या मांडीवर दत्तक गेला आहेस, त्या आईला आणि तुझ्या जन्मदात्या बापाला आठवून तूं सांग—”

स्वतःच्या मनाशीं देखील तें कटुसत्य पुढें बोलायला शरमिंदा होत तो आपल्या भडकलेल्या मनाचा विरंगुळा करण्यासाठीं त्या ठिकाणाच्या आवाराबाहेर येऊन घाटी चढून जाऊं लागला. तोंच डोकीवर गवताच्या वरंडी आणि लाकडाचे भारे घेऊन घाटी उतरणाऱ्या शेतकऱ्यांच्या बायका त्याला आढळल्या. त्या आपसांत ‘राधाकाकी’ असें कायसें कुजबजत होत्या. तें ओझरतें कानीं पडतांच सदानंद कान टवकारून क्षणभर वाटेंतच थबकला.

गांवीं आल्यापासून गेल्या दोन तीन आठवड्यांत असेंच एका देसायाच्या राधाकाकीचें नांव त्याच्या कानीं आलें होतें. गोपाळकाका देसाई या नांवाचा आपला एक चुलत आजोबा–खून होऊन ठार झालेल्या आपल्या दत्तक बापाचा चुलता होता. तो तिकडे कुठें आफ्रिकेंत नोकरीला होता. त्यानें म्हणे दोन बायका मेल्यावर पंचेचाळीसाव्या वर्षी तिसरेपणीं लग्न केलें होतें. कां न कळे, पण पुढें पुढें त्याचें आणि त्याच्या त्या तिसरेपणच्या पोरसवदा तरुण बायकोचें पटेना. ती हवा पाणी मानणार नाहीं अशा सबबीवर नवऱ्याबरोबर आफ्रिकेंत गेली देखील नाहीं. अखेर गोपाळकाका बारा वर्षांपूर्वी पेन्शन घेऊन हिंदुस्थानांत आला तो काशीला कीं कुठें जाऊन राहिला आणि तिथेंच मेला. त्या म्हाताऱ्याच्या तिसरेपणाच्या तरुण बायकोचें नांवही राधाकाकी असें होतें हें सदानंदाला आतां कर्णोपकर्णी कानीं येणाऱ्या गांवकुटाळकीवरून माहीत झालें होतें. बाबा देसायाचा खून झाल्यानंतर देखील ती राधाकाकी म्हणे गांवांतच आपल्या सूनबाईच्या–पार्वतीबाईच्या–आसऱ्यानें राहात होती. नात्यानें ती पार्वतीबाईची सासू होती एवढेंच. पण वयानें पार्वतीबाईपेक्षां बरीच लहान होती. बाबा देसायाच्या पश्चात् नाना अधिकारी देसायांच्या दौलतीचा कारभार पाहूं लागले आणि त्याच सुमाराला त्या सास्वा-सुनांचें पटेनासें झालें. तेव्हां राधाकाकी त्या जिण्याला कंटाळून घरांतून

जी यात्रेसाठीं म्हणून बाहेर पडली ती आज तागायत पुन्हा गांवीं म्हणून आली नव्हती. गांव तिला विसरला होता आणि ती गांवाला विसरली होती. ... लोक आपले बोलत कीं ती नरसोबाच्या वाडीला खानावळ चालवीत असे. खरेंखोटें कुणाला माहीत? बरींच वर्षें होऊन गेलीं होतीं त्या गोष्टीला.

सागरचें मीठ व डोंगरचे आंवळे एके ठिकाणीं मिसळून त्यांचा रुचकर परिपाक व्हावा तशी सदानंदाला त्याच्या मुंबईतील मातेप्रमाणें प्रेमळ खाणावळीणबाईची आठवण झाली. सदानंदावर त्या मुंबईतील राधाकाकी खाणावळीणबाईचें अगदीं पोटच्या मुलासारखें प्रेम होतें. ती त्याच्या जीवाला स्वतःच्या जीवापलीकडे जपायची. त्याचें दुखणें खुपणें सारें पाहायची. लहानशी खाणावळ ठाकुरद्वारच्या सूर्यमहालांत एका लहानशा दुहेरी खोलींत थाटलेली. स्वतःचें पोट भागण्यापुरतें दहा पंधरा लोकांना ती जेवायला करून वाढी. तिला लिहितां वाचतां येत नसे; हिशेब ठिशेब समजत नसे. म्हणून तिचा व्यवहार सहज पाहतां येईल तेवढा सदानंद पाहायचा.

सदानंदाला उगीचच तेव्हां घाटी चढतां चढतां मुंबईतील त्या आपल्या आईसारख्या प्रेमळ खाणावळीणबाईची आठवण झाली. आपण मुंबई सोडून इकडे कोंकणांत आलों, तेव्हां गांवीं जातांच खुशालीचें पत्र पाठवीन आणि पुढें दर आठ दिवसांनीं खुशाली कळवायला चुकणार नाहीं असें आपण त्या खाणावळीणबाईला सांगितल्याचेंही त्याला स्मरत होतें. आपणाला तिची खुशाली कळावी म्हणून स्वतःचा पत्ता लिहून चार पोस्टकार्डेंही त्यानें तिला देऊन ठेवलीं होतीं. तो सर्पदंशाच्या अरिष्टांत सांपडल्यामुळें जरी त्या मानलेल्या प्रेमळ आईला आपल्या खुशालीचें पत्र गांवीं येतांच पाठवूं शकला नाहीं तरी तिचा त्याचा विसर पडला नव्हता. तिचीं—तिनें दुसऱ्याकडून लिहून घेऊन पाठविलेलीं—दोन खुशालीचीं पत्रें आजपावेतों त्याला मिळालीं होतीं. पण त्यानें मात्र तिला पत्र पाठविलें नव्हतें. याचें कारण आपणाला सर्पदंश झाल्याची बातमी ऐकून ती बिचारी आपल्या मानलेल्या लेकाच्या प्रकृतीची काळजी करीत खाणावळ गुंडाळून इकडे निघून यायची!

• बोटींत बसायला निघतेवेळीं राधाकाकूनें त्याला चहा करून देतांना काढलेले उद्गारही सदानंदाला आठवले, "मला घेतील का रे तुमच्या सत्याग्रहांत स्वयंसेवक म्हणून? जल्माला आल्यासारखें एवढें तरी पुण्य घडूंदे हातून!"

हे तिचे उद्गार ऐकून सदानंद तेव्हां तिला म्हणाला होता, "सत्याग्रह कांहीं सोपा नाहीं राधाकाकी! पोलीस लाठीमार करतील, गोळीबार करतील— "

"तें कांहीं नाहीं. आज घरीं गेल्यावर पहिल्यानें जेवायच्या अगोदर राधाकाकीला खुशालीचें पत्र लिहायचें आणि तें पोस्टांत नेऊन द्यायचें. म्हणजे उद्यां सकाळच्या डाकेनें जाईल आणि परवां तिला मिळेल..." असें मनाला बजावीत सदानंद घाटी चढून गेला व त्या म्हाताऱ्याच्या मांगराकडे वळला.

तोंच मागाहून त्याला हांक ऐकूं आली, "सदानंद!"

"त्यानें ती निशिकांताची हांक ओळखून मागें वळून पाहिलें. तों निशिकांत व प्रतिभा त्याला त्या काजरघाटीच्या मध्यावर फणसाच्या झाडाखालच्या पायरीपावेतों चढून आलेली दिसली. तो तसाच त्याच पावलीं मागें वळून तिकडे जाऊं लागला.

"कुठें कुठें म्हणून शोधायचें रे तुला? घरीं पाहिलें, नाहीं. देवळाकडे पाहिलें, नाहीं. देवळाजवळ—" निशिकांत ओठावर आलेलें शांता भावणीचें नांव भीतियुक्त संकोचानें तसेंच गिळीत सदानंदाला म्हणाला.

"केव्हां आलांत?" सदानंदानें चर्येवर बळेंच उसनें हास्य आणीत प्रतिभाला विचारलें.

"आज सकाळींच आल्यें." प्रतिभा भालेराईच्या मर्मभेदी नजरेनें सदानंदाकडे पाहात म्हणाली, "मी खरें म्हणजे येणार नव्हत्यें, इकडे या गांवीं तुमच्या सत्याग्रहाच्या प्रचारांत अडथळा आणायला. पण हे मला स्वस्थ बसूं देईनात."

निशिकांतला 'त्याच्या' प्रतिभेचें तें आगीच्या पेटत्या ठिणग्यांसारखें स्फोटक भाषण कांहींसें अस्थानीं वाटलें.

तिन्हीसांजांची ती वेळ. तीं तिघेंही मग कांहीं तरी बोलत बोलत घाटी उतरूं लागलीं.

नदीवरच्या सांकवापावेतों तीं तिघेंही येऊन पोंहोचलीं. तेव्हां दिवस मावळायला गेला होता.

प्रतिभा एकदम मध्येंच सांकवाच्या तोंडाशीं थांबून निशिकांताला म्हणाली, "निशिकांत! तुम्ही जा आतां. मी आजची रात्र इथें आल्यासारखी यांच्या घरीं राहीन, आणि सकाळीं उठून तिकडे येईन." ती क्षणभर थांबून पुन्हा म्हणाली, "नाहीं तर कुणी चांगलीशी सोबत मिळाली तर यांच्या घरीं मंडळीशीं थोडा वेळ गप्पागोष्टी करून घटका दोन घटकांनीं रात्रीं देखील जमल्यास तिकडे झोंपायला येईन म्हणावें काकांना."

निशिकांत त्यावर 'बरें आहे.' असें म्हणून त्या दोघांचा निरोप घेऊन मावळत्या सूर्याच्या क्षीण होत चाललेल्या संधिप्रकाशांत झपझप पावलें टाकीत घरच्या वाटेला लागला.

"इतकी रात्र होईतों बाहेर कुठें बसला होतास रे?" संकटनिवारणार्थ देवघरांत देवापुढें बसून गुरुचरित्राची पोथी वाचीत असलेल्या देसाईण-बाईनीं सदानंदाकडे वळून पाहात विचारलें.

"फिरायला गेलों होतों निशिकांताबरोबर. बोलत बोलत त्याच्या घरापावेतों गेलों म्हणून यायला वेळ झाला." असें उत्तर देत सदानंद आपल्या खोलींत माडीवर गेला.

"जेवायचें नाहीं?"

"नाहीं. मला नाहीं जेवायचें. मी फराळ करून आलों निशिकांता-कडून." तो उगीच वेळ मारून नेण्यासाठीं उद्‌गारला.

माडीचा जिना चढून जाऊन 'आई'च्या नजरेआड होतांच सदा-नंदाला हायसें वाटलें.

तो जें बोलला तें सहेतुक पण खोटें बोलला. प्रतिभेला निशिकांताच्या घरीं पोचवण्यासाठीं तो बोलत बोलत तिच्याबरोबर गेला होता खरा. पण

तो अर्ध्या वाटेपावेतों. तेवढ्यांत मागाहून एक ओळखीचा दहीबांबकरी शास्त्रीबुवांच्याच घराशेजारीं घर असलेला घराकडे जातांना त्याला आढळला. प्रतिमाही मग म्हणाली कीं "एवढी सोबत मला पुरे. तुम्ही माघारीं गेलां तरी चालेल."

प्रतिमा आतां पूर्वीची ती उरली नव्हती. दोन घटका एकांतांत तिच्याशीं झालेल्या संभाषणावरून तो आतां पूर्णपणें ओळखून चुकला होता कीं प्रतिमेला आपण आतां दुरावलों आहों.

आपल्या गांवांतील वर्तनाविषयींच्या इतक्या विपरीत वार्ता वर्तमानपत्रांतून देखील ज्या जगजाहीर झाल्या त्यांनींच प्रतिमेचें मत आपणाविषयीं कलुषित केल्याचें त्याला तिच्याशीं झालेल्या त्या समक्ष संभाषणांत आढळून आलें.

सकाळीं निशिकांतानें तिचे तीनचार फोटो घेऊन तिला अर्पण केलेले जेव्हां सदानंदाला खुद्द तिच्याच हातून त्या भेटींत पाहायला मिळाले, तेव्हां त्याचें शंकाकुल मन त्याच्या मनांत कुजबुजलें, " नव्या वृक्षाच्या आसऱ्यानें ही वेल आतां वाढीला लागलेली दिसते."

तसेंच तेव्हांच आपण निशिकांताचे घेतलेले फोटोही प्रतिमेनें जेव्हां त्याला दाखविले—आणि ते त्या दोघांचेही फोटो तिच्या जवळच्या लहानशा सुंदर आल्बममध्यें कलात्मक चातुर्यानें एकमेकांशेजारीं चिकटवलेले—तेव्हां तर त्याची खात्रीच पटूं लागली कीं, ही वेल ह्या नव्या वृक्षाच्या आधारानें चांगलीच बहरूं लागली आहे.

रिकाम्या देव्हाऱ्यासारखें, प्रतिमेच्या अभावीं ओकें ओकें झालेलें त्याचें अंतःकरण थोडा एकलेपणा मिळतांच त्याला आतां भारावल्यासारखें वाटूं लागलें होतें.

त्या तशा भारावलेल्या अंतःकरणानें तो ती सारी रात्र अंथरुणावर नुसता तळमळत होता. त्याचा डोळ्याला डोळा कसा तो लागेना. प्रतिमेविषयींच्या निराशेच्या भाराखालींच तो चक्काचूर होत होता असें नाहीं. ती शांता, ती 'आई", ते वडील, ते देव, ते शेतकरी या

साऱ्यांनीं त्याच्या निराश हृदयावर जणूं त्याच्या साऱ्या आशा–आकांक्षांची चिरेबंदी समाधी उभारण्याची घाई चालविली होती.

परंतु ती बाकीची सारी वैचारिक सृष्टि क्षणभर बळेंच दृष्टीआड करून त्याचें विव्हल मन तेव्हां प्रतिभेच्या आठवणीसभोंवार निष्फळ लोलुपतेनें पिंगा घालीत होतें.

त्या रात्रीच्या प्रशांत वेळीं, मन नको नको म्हणत असतां त्यानें कागद घेऊन प्रतिभेला अखेरचें पत्र लिहायला घेतलें.

'प्रिय प्रतिभा!' या नेहमींच्या मायन्यानें पत्राला आरंभ करावा असें त्याच्या मनांत आलें. पण त्याची लेखणी आतां प्रतिभेला 'प्रिय' म्हणायला धजेना. त्यानें मग मामुली पद्धतीनें पत्र लिहायला सुरवात केली, "स. न. वि. वि. ...

तों पुन्हा त्याची लेखणी अडली. पुढें काय लिहावें हें त्याचें त्यालाच नीटसें कळेना. एकदां त्याला वाटलें, श्रीमंत मुलीच्या चवचाल बहकत्या प्रेमाचें विद्रुप या पत्राच्या आरशांतून प्रीतिबिंबाच्या रूपानें तिच्यापुढें उभें करावें. कोणी कोणी लेखक जे संपन्न, सुशिक्षित तरुणीवर थिल्लर बाजारी प्रेमाचा आरोप करतात तो अगदीं खरा आहे असें तिला सांगावें.

पण पुन्हा त्याला वाटलें, काय अडलें आहे आपलें त्यावांचून! –अखेर प्रतिभेला पत्र लिहिण्यासाठीं पुढें घेतलेला कागद चोळामोळा करून त्यानें खिडकीबाहेर टाकून दिला; आणि तो पुन्हा अंथरुणावर जाऊन पडला.

मानसिक श्रमांच्या अतिरेकामुळें आलेल्या थकव्यानें आणि खिडकींतून भावळत्या मध्यरात्रीच्या गार वाऱ्याच्या झुळका खोलींत अंगावर झुळु झुळु येऊं लागल्यामुळें त्या विचाराच्या धगधगींतच त्याचा डोळा लागला.

●

मध्यरात्र उलटली. पहांट उजाडूं लागली.

तों एकदम देसाईणबाईची ओरड ऐकून तो दचकून जागा झाला.

"...नाहीं–दिनू! मी आतां तुला रागें भरायची नाहीं. तुला राग येईल असें कांहींसुद्धां करायची नाहीं मी. तूं मला एकदां आई म्हणून हांक मार ना रे!"

तिचें तें झोंपेंतील स्वप्नमय बरळणें ऐकून सदानंद झोंपेंतून जागा होऊन कान टवकारून दोन्ही हातांच्या मनगटांनीं डोळे चोळीत बिछान्यावर उठून बसला.

तोंच नानांचे शब्द त्याच्या कानीं आले, "ए, जागी झालीस? ऊठ."

मग थोडा वेळ घरांत अगदीं शांत होतें.

तोंच पुन्हा त्याला त्यांचें संभाषण ऐकूं आलें.

"आत्तां पहांट होईल; कोंबडा आरवेल. गाडीवाला आत्तां हांक मारायला येईल. उठ, न्हाणीघरांत जाऊन पाण्याच्या हंड्याखालीं विस्तव पेटव. न्हाणें धुणें आटोपून गेलें म्हणजे देवगडला आजच्या दिवसापुरती तरी तेवढी कटकट चुकली. चल, ऊठ लवकर."

सदानंदानें एवढें ऐकलें. त्यानंतर त्याला कांहीं ऐकूं आलें नाहीं. देसाईणबाई उठून न्हाणीघरांत गेल्या आणि नाना अंथरुणावरचें हिंदु कायद्याचें मराठी पुस्तक त्यांतील दत्तक प्रकरणाच्या अर्धवट वाचलेल्या मजकुरांत आठवणीसाठीं आगपेटीच्या काडीची खूण घालून तें बाजूला ठेवीत उठले. ती दृष्टीआडची सृष्टि सदानंदाला दिसली नाहीं. पण कानीं पडलेल्या दोघांच्या त्या संभाषणावरूनच त्याला त्या अंतःसृष्टीचें ओझरतें दर्शन होत होतें. त्या दर्शनानें तो भांबावून अंथरुणावर स्वतःला छेडीत तळमळत पडला होता.

तो एकदम तीरासारखा अंथरुणावरून उठला आणि जिना उतरून खालीं गेला. तों ओसरीवर नाना तोंड धुणें, स्नानसंध्या वगैरे प्रातःकाळचीं आन्हिकें आटोपून कपडे करून देवगडला जाण्याच्या तयारीनें तें हिंदु कायद्याचें मराठी पुस्तक समोरील समईच्या मंद प्रकाशांत वाचीत बसलेले त्याला दिसले. लेक जिना उतरून आपल्या पुढून ओसरीवरून आंत गेला हें देखील ध्यानीं येऊं नये इतक्या एकचित्तानें ते त्या पुस्तकांतील दत्तक प्रकरण वाचण्यांत गढून गेले होते.

आपल्या मुलाच्या दत्तविधानाचे कागदपत्र आपण कांहीं भानगडींमुळें कायदेशीरपणें कोर्टांत नोंदवून घेतलेले नाहींत ही उणीव त्यांची त्यांना माहीत होती. दिनकर देसाई मयत असल्यामुळें त्यांनीं ती उणीव आजवर मनावर घेतली नाहीं इतकेंच. वकिलाच्याही मतें त्या दत्तक-पत्रांत मयत गोपाळराव देसायांच्या–बाबा देसायांच्या–हिश्याबाबत कांहीं अपुरेपणा राहिला होता. तो आतां—सदानंद घरीं आलाच होता; त्याच्या विचारानें व होकारानें दूर करून घेण्याचा त्यांचा मानस होता.

"आहे. आमचा हिंदू कायदा भू–जल–तेज–समीरण–स्थिर–चर व्यापून दशांगुळें उरणाऱ्या परमेश्वरासारखा सारें व्यापून उरणारा आहे खरा." असें मनांत म्हणत त्यांनीं जळक्या आगकाडीची खूण त्या पुस्तकांत घालून तें बाजूला ठेवलें, आणि स्वयंपाकघराकडे मान फिरवून देसाईणबाईंना उद्देशून म्हटलें, "आटोपलें कीं नाहीं तुझें? चल लौकर, दिशा फांकूं लागल्या. आत्तां येईल गाडीवाला हांक मारायला."

बोलतां बोलतां पुन्हा एकवार त्यांनीं त्या पुस्तकाकडे नजर वळविली. हिंदु स्त्रीनें नवऱ्याशीं घटस्फोट घेऊन दुसऱ्या पुरुषाशीं लग्न केलें आणि तो नवरा वारून ती विधवा झाली तर तिला आपला पूर्वीचा नवरा दत्तक घेतां येतो, हा हिंदु कायद्याचा आदेश त्यांना लोखंडाचें सोनें करणाऱ्या परिसासारखा बहुमोल वाटत होता. त्याच मजकुराच्या पानांत त्यांनीं ती खूण घालून ठेवली होती.

"बाकी कायदा ही अजब चीज आहे खरी! म्हणूनच आम्ही म्हणतों कीं वकील म्हणजे भूलोकावरचा परमेश्वराचा अवतार ...... आपला सदानंद देखील वकील होईल तर काय बहार होईल?" असें मनांत म्हणत ते उठून घरांत चालले. तों प्रातर्विधि आटोपून आपल्या माडीकडे चाललेला सदानंद त्यांना देवघरांत भेटला. देसाईणबाईही निघण्याच्या तयारीनें देवघरांत देवापुढें बसून संकटनिवारणार्थ तोंडांतल्या तोंडांत कांहींतरी स्तोत्र पुटपुटत होत्या.

"हां! आम्ही जाऊन येतों. तुला सांगणार होतों मी–सभा घ्या, गांवांतून सत्याग्रही गोळा करा, शिरोड्याला जाऊन मिठाचा सत्याग्रह करा,–

पण म्हार मांस खातो तो हाड गळ्यांत बांधतो का?—आधींच आपलीं कुळें आहेत त्रिथरलेलीं. त्या माकडांच्या हातीं आपल्या हातानें पेटतीं कोलितें देऊन त्यांना आपलीच दौलत तरी जाळायला शिकवूं नका. बाकी काय हवें तें करा."

देसाईणबाई मनोमन चाललेलें फावल्या वेळचें स्तोत्रपठण अर्धवटच आवरतें घेत मध्येंच म्हणाल्या, "मुलगा दत्तक घेतात तो घरादाराचें, जमीनजुमल्याचें असें वाटोळें करण्यासाठीं नाहीं घेत."

तोंच गाडीवाला अंगणांत येऊन हांक मारूं लागला. त्यामुळें तो विषय तेवढ्यावरच संपला. देवळांत पहांटेचा चौघडा वाजूं लागला.

"मुलगा दत्तक कशासाठीं घेतात?—"

सदानंदाला हंसूं आलें. तें हंसूं प्रसन्नतेचें नव्हतें, विषादाचें होतें. तोच तो प्रश्न पुन्हा मनांत आठवून तो म्हणाला, "बेदरकारपणें माणुसकीला सोडून परोपरीचीं पापें पुजण्याची परंपरा पुढें चालविण्यासाठीं! मुलगा दत्तक घेतात स्वतःच्या शेतांत गुलामाप्रमाणें मरेमरेतों राबणाऱ्या कष्टाळू शेतकऱ्याची पिळवणूक करणारी वडिलार्जित वतनदारी पुढें चालविण्यासाठीं! ..."

ह्या दत्तकाच्या प्रश्नामागें लपून आयत्या पिठावर रेघोट्या ओढायला माणसाला शिकवणारी वंशपरंपरेची खाजगी मालमत्ता हा आपल्या अनेक पिढ्यांच्या पापाचा परिपाक आहे, ही विषादपूर्ण कल्पना आज या क्षणीं सदानंदाच्या अंतःकरणांत जालीम विषारी शल्यासारखी सलूं लागली. आपण या घराण्यांत दत्तक आलों यांत त्याला आजवर कधींही जाणवला नव्हता इतका ओशाळेपणा आज या क्षणीं जाणवूं लागला.

त्या मनस्तापाच्या भरांत स्वतःच स्वतःवर दांतओठ खात स्वतःला शापीत फाडकन थोबाडींत मारून घेत तो सदरा टोपी घालून माडीचा जिना उतरून खालीं आला.

बाहेर अजून पायाखालीं चांगलें दिसत नव्हतें. पक्ष्यांची किलबिल घरासभोंवारच्या माड—पोफळींच्या बागेंतून ऐकूं येत होती. बागेंतील

आंब्याच्या झाडावर बसून कोकिळा कुहूकुहू गोड गात होती. पण त्याच्या नेहमींच्या काव्यमय वृत्तीला तें रम्य कूजनही कर्कश व कंटाळवाणें वाटूं लागलें.

क्षणभर तो आपल्या घराच्या पुढच्या अंगणांत थांबला. त्याला एकदम शांताची आठवण झाली. ती देखील आपल्यामुळें आपल्या-सारखीच कांहीं निराळ्या कारणासाठीं कां होईना, पण दुःखी कष्टी असेल,--तिचें शांतवन करायला गांवचा कोणीही सज्जन माणूस पुढें जाणार नाहीं, हें ओळखून तो घराचा पुढील दरवाजा घट्ट ओढून घेऊन पहांटेच्या त्या मिणमिणत्या अंधुक प्रकाशांतून शांताच्या घराकडे चालला.

तोंच पलीकडच्या वाटेनें गांवांतील लोकांची प्रभातफेरी राष्ट्रगीतें गात फिरूं लागलेली त्याला ऐकूं आली. गेल्या पंधरा दिवसांत पोलिसांनीं गांवांत चालविलेल्या दडपशाहीच्या नंग्या नाचाला भिऊन गांव जो शांत होता तो गेल्या दोन दिवसांपासून सदानंदाच्या परिणामकारक प्रचारामुळें पुन्हा खडबडून जागा झाला होता; नवचैतन्यानें नटला होता. गांवांतलीं बुद्रुक माणसें जरी पोलिसांच्या भीतीनें असल्या चळवळींत घराबाहेर पडायला धजत नव्हतीं, गांवचे विद्यार्थी जरी आबा मास्तर तुरुंगांत गेल्यामुळें त्यांच्या नेतृत्वाला मुकले होते, गांवचे कुणबी शेतकरी जरी त्यांचा धडाडीचा पुढारी शिवराम तांबे हा लोक सोडून गेल्यामुळें आणि सावळाराम, राजाराम हेही पकडले गेल्यामुळें भांबावल्यासारखे झाले होते, तरी सदानंद बरा होऊन वाडीवाडीवर जाऊन प्रचार करूं लागतांच त्या सर्वांची भीती दूर झाली होती. सत्याग्रहाच्या कष्टमय वाटेवरून चालतांना पायांत बोंचणारे कांटे त्या गांवच्या साऱ्या लोकांना आतां फुलांच्या पाकळ्यांसारखे मऊ मऊ वाटत होते.

शांतानें काळोखांतच दार उघडलें.

"कशाला आलां तुम्ही इकडे अशा अवेळीं? लोक आधींच तुमच्या नांवानें जळतात. भिंतीला कान असतात. ..." पुढें शांताच्यानें बोलवेना. हुंदक्यांनीं तिचा कंठ दाटून आला.

" तें तूं मनाला लावून घेऊं नकोस शांता ! लोक काय पाहिजे तें बोलूं देत. तें माझें मी पाहून घ्यायला खंबीर आहें. मला काळजी वाटते आहे ती तुझी. मी इथला खोत जमीनदार आणि तुम्ही आमचीं कुळें.–"

" माझ्यामुळें उगीच तुमच्या नांवाला मात्र डाग.—" ती एकदम बोलतां बोलतां मध्येंच थबकली आणि खिडकींतून पलीकडे पाहात कान टंवकारून उभी राहिली.

गंगाराम देवाळ्याच्या आणि तिच्या घरांमध्यें फक्त एका लहानशा परड्याचें अंतर होतें. त्या परड्याला लागून असलेली खोली ताराची उठण्या–बसण्या–झोंपण्याची होती. त्या खोलींत ती आणि रावबा यांची हळू हळू चाललेली कुजबूज ऐकून शांताचे नेत्र संतापानें आग ओकूं लागले. दांत ओंठ चावीत तिनें खिडकींतून पुन्हा एकवार तिकडे पाहिलें.

" काय ? काय ऐकतेस ? " सदानंदानें विचारलें.

शांता हातानें त्याला ' जा ! जा ! ' अशी खूण करीत पुढें येऊन हलक्या स्वरांत म्हणाली, " जा तुम्ही बघूं अगोदर इथून ! "

ती नुसती एवढें बोलूनच थांबली नाहीं. तिनें हलक्या हातानें सदानंदाला दरवाजाबाहेर लोटल्यासारखें केलें. तो बाहेर पडतांच तिनें दरवाजा लोटून घेतला.

तोंच तिला गंगाराम देवाळ्याच्या अंगणांतून उभ्या वाडींतील एका ओळखीच्या शेतकऱ्याचा आवाज ऐकूं आला; " शांतू घरांत असेल ? "

शांतानें तो आवाज ऐकून त्या शेतकऱ्याला तिकडे हांक मारली.

" जमना रात्रभर जाबडते आहे. एकसारखी तुला हांक मारते आहे. ती कांहीं आतां जगत नाहीं. सावित्रीनें तुला सांगितलें आहे कीं एकदां येऊन तिला भेटून तरी जा. बाकी काजराई आई भगवान घाड्याच्या भाकेला बांधलेली आहे म्हणतात तें खोटें नाहीं शांतू ! " तो शेतकरी दरवाजांतून बाहेर डोकावून ताराच्या खोलीकडे पाहात शांताला पुढें अगदीं हलक्या आवाजांत म्हणाला, " आज दोन तीन दिवस ह्या रावबा बेलिफाची देवदेवस्की चालली आहे काजराईच्या राईत. कालच तेवढा काय तो भगवान घरांत पडून होता. —तूं त्याला बसवलेंस ना घरांत

नाहींतर गेले दोन तीन दिवस तो रोज आपला दिवसा रात्रीं कौल घेत, गाऱ्हाणीं करीत, कोंबडीं कापीत काजराईच्या राईत पुरलेला असायचा.'"

त्या शेतकऱ्याच्या तोंडून जमनाची काजराई देवीनें निर्दयपणें अशी छळणूक चालविलेली ऐकून शांताला अतिशय दुःखही झालें आणि संतापही आला. ह्या अफाट उघड्या जगांत तिला आधार आतां एकट्या जमनाचाच काय तो मैत्रीण म्हणून होता. तो आधार देखील काजराई आणि तो बाबदेव हे देव इतक्या दुष्टपणानें हिरावून घेऊं पाहात आहेत हें पाहून ती मनांतून भीतीनें हादरली, चिडली, संतापली.

"काय माझें वाटोळें करायचें टेवलें आहे या देवांनीं? आतां मेलेल्या मेंढरानें आगीला काय म्हणून भ्यायचें?" असें मनांत म्हणत जोहाराला निघालेल्या रजपूत वीरांगनेसारखी ती त्या शेतकऱ्याबरोबर जमनाकडे जायला निघाली.

आतां पायांखालीं झुंजुमुंजु दिसूं लागलें होतें. दिशा फांकल्या होत्या. घरोघर थोडथोडी जाग येऊं लागली होती.

त्या दिवशीं गांवांत ज्याच्या त्याच्या तोंडीं तोच एक विषय.

एऱ्हवीं जमना मेली असती—ती एकच काय, अशा आणखी कितीही जमना मेल्या असत्या, तरी 'मेली? सुटली एकदांची!' असें हळहळण्यापेक्षां आणखी कांहींच कुणीं गांवांत तिकडे लक्ष दिलें नसतें. शिवराम मेला तेव्हां तरी तिकडे कुणीं लक्ष दिलें? गांवांत माणूस मेलें, मसणांत नेऊन जाळून टाकलें कीं मोकळें झालें.

पण आज जमना मेली आणि मसणांत तिचें सरण पेटूं लागलें, तेव्हां त्या सरणाच्या ज्वालांनीं सारा गांव प्रकाशमान झाला. याचें कारण त्या ज्वालांतून भडकलली त्रागेखोर शांताच्या पराकाष्ठेच्या आततायी संतापाची भडकलेली आग! त्या आगींत अडाणी गांवकऱ्यांच्या मनावर व शरीरावरही अस्मानी सुलतानी गाजवणारा खेडवळ देव—धर्म जिवंत जळतांना साऱ्या गांवकऱ्यांनीं पाहिला.

जमनाची चिता पेटली आणि मर्तिकाला गेलेले गांवकरी दुःखी अंतःकरणानें घरोघर परतले. पण ती घरीं गेली नाहीं. तिथेंच मसणांत पलीकडच्या मढेवडाच्या झाडाखालीं रडत, हुंदके देत पदर अश्रूंनीं भिजवून ओलाचिंब करीत बसली होती.

जमनाची चिता पेटली, पिचूं लागली, तरी ती तिथेंच.

तोंच एकदम तिच्या मनानें काय घेतलें कोण जाणे, मसणांतल्या लांवसटीसारखी ती तर्‌तर्‌ उठून चितेपाशीं गेली. चितेंतली एक जळकी गोवरी उचलून घेऊन ती एखाद्या पिसाटासारखी काजरघाटीच्या रोखानें वारेमाप बडबडत जाऊं लागली. तिला वाटेंत भेटलेल्या गांवकऱ्यांना कळून चुकलें कीं बिचारीला ह्या दुःखांत आतां वेड लागणार !

" कुठें चाललीस शांतू? चल. घरीं चल." असें एकादोघांनीं तिला समजावण्याचा प्रयत्न केला.

त्यावर शांताचें एकच बेताल उत्तर, " शांतू चालली मसणांत ! देवाचें सरण पेटवायला चालली. काजराई मेली, बाब्रदेव मेला, त्यांचें सरण पेटवायला चालली."

आणि खरोखरच तिनें त्या वेडाच्या भरांत काजरघाटी चढून जाऊन त्या देवांचें सरण पेटवलें. त्या काजऱ्याच्या राईची मसणवट करून सोडली. तिथें देवांच्या आजूबाजूला सभोंवार छातीइतकें उंच वाळलेलें गवत होतें. त्या गवताला आग लागल्यावर काजराई आणि बाब्रदेव हे देव त्या आगींत होरपळून गेले.

सकाळचा सूर्य प्रहरभर वर येईपावेतों ती महिषासुरमर्दिनी पेटलेल्या काजराईच्या राईंत अशी थैमान घालीत होती. ती मग त्या देवाच्या मसणवटींतून बडबडत हातवारे करीत कुणाला न सांगतां, न विचारतां पिसाळलेल्या जखमी वाघिणीसारखी कुठें भरकटली कोण जाणे !

•

तशा त्या दुःखावलेल्या खिन्न वातावरणांत चाललेली देवाच्या पटांगणांतली ती सत्याग्रहाची सभा. त्या सभेंत त्या दिवशीं सदानंद जसा कांहीं आकाशांतून वाढत्या दाहकतेनें जळत तापत जाणाऱ्या सूर्यासारखा

वाढत्या संतापानें बोलला. शिवराम, जमना, शांता यांच्यासाठीं सारा गांव दुःखी झाला होता त्यापेक्षां तो जास्त दुःखी झाला होता. सभेंत त्या तिघांचें, तसेंच पकडले गेलेले आबा मास्तर, सावळाराम, राजाराम, शिवनाकाचा लेक पिराजी यांचें स्मरण करून त्यानें जेव्हां आदरपूर्वक दोन्ही हात जोडले तेव्हां सारे लोक दुःखानें मुसमुसूं लागले.

त्या सभेंत सदानंदानें स्वतःला आतां ऐकूं येऊं लागलेली आपल्या कष्टी भारतमातेची हांक जेव्हां त्या गांवकऱ्यांना ऐकवली, तेव्हां तर प्रत्येकाचें अंतःकरण इतकें उचंबळून आलें कीं खरेंच ह्या तरुण धन्याच्या मुखानें आपली ही मायमाउली भारतमाता आपणाला कळवळून हांक मारते आहे, त्या हांकेला आपण धांवून गेलेंच पाहिजे असें प्रत्येकाला—उस्मानला देखील—वाटलें.

देशाच्या कोनाकोंपऱ्यांत जी भारतमातेची हांक आपल्या खेड्यांतील बरबाद शेतकरी जीवनांतून त्याला ऐकूं येत होती, तीच हांक आपल्या गांवकऱ्यांना त्या सभेंत ऐकवतांना सदानंद स्वतः आपल्या देसाई वतनाच्या परंपरेच्या प्रभावळीसह जनतेचा महान् अपराधी म्हणून आपल्या घराण्याच्या आजवरच्या दुष्कर्मांचा जाब देण्यासाठीं धीटपणें उभा राहिला होता.

“ हें वतन माझें—आयत्या पिठावर रेघोट्या ओढायला गांवांत आलेल्या उचल्या दत्तकाचें—नाहीं; तें साऱ्या गांवाचें आहे. महात्मा गांधींच्या उपदेशाप्रमाणें हा सदानंद देसाई गांवकऱ्यांच्या ह्या धनदौलतीचा केवळ एक विश्वस्त आहे.—रखवालदार नोकर आहे. तो वतनदार नाहीं; वतनदारीचा आणि वतनदारींत राबून धनधान्याचें सोनें पिकवणाऱ्याचा शेतकऱ्याचा तो सेवक आहे. आजवर झालें तें होऊन गेलें. त्याबद्दल—माझ्या वाडवडिलांनीं शेंकडों वर्षें वंशपरंपरेनें ह्या जमीनदारींत पुजलेल्या पापांबद्दल माझ्या शेतकरी बंधूंनीं मला क्षमा करावी. यापुढें या देसाई वतनांत कोणीही कूळ खंडासाठीं, कर्जासाठीं अथवा कशासाठींही नाडलें जाणार नाहीं. गांवकऱ्यांची सेवा जी माझ्या हातून घडेल त्या चाकरीचा पगार निर्वाहाला लागणाऱ्या अन्नवस्त्रापुरता अगदीं

गरज तेवढाच सालोसाल येणाऱ्या खंडांतून मी तुम्हांला सांगून घेईन, आणि बाकीचें खंडांतील सारें धनधान्य तुम्ही खुषीनें द्याल तें तुमच्यासाठीं तुमच्या गरजेला देतां यावें म्हणून तुमचा इमानी नोकर या नात्यानें जतन करीन. पूज्य महात्माजींच्या मुखानें माझ्या कानीं आलेली ही माझ्या भारतमातेची हांक मी ऐकून न ऐकलीशी करणार नाहीं. देशांतला दरिद्रीनारायण शेतकरी–कामकरी सुखी तर देश सुखी, हा महात्माजींचा संदेश मी यापुढें कधीं विसरणार नाहीं."

सदानंदाच्या त्या संजीवनी वचनांनीं सभेंतील साऱ्या शेतकऱ्यांचीं अंतःकरणें वसंतऋतूंतील वैभवश्रीनें नटलेल्या वनश्रीसारखीं ताजीं टवटवीत प्रफुल्लित केलीं. सभेच्या शेवटीं त्यानें जेव्हां त्यांना शिरोड्याच्या मिठाच्या सत्याग्रहाचा संदेश दिला, तेव्हां जो तो शेतकरी अहमहमिकेनें 'मी येणार. माझें नांव अगोदर नोंदून घ्या' असें सांगत बाकीच्यांना बाजूला सारीत उतावळेपणानें पुढें येऊं लागला.

देवाचा मांड त्या दिवशीं सभेला आलेल्या शेतकऱ्यांच्या गर्दीनें कसा अगदीं फुलून गेला होता. पटांगणांत न मावणारी गर्दी देवळांत जमली होती. देवळांतील सभामंडपाच्या उजवीकडे पुजाऱ्याची धर्मशाळा होती. नाना, बापटशास्त्री, कुळकर्णी हे व असे तालेवार बुद्रुक गांवकरी त्या धर्मशाळेंत कान टवकारून सभा ऐकत बसले होते. ती बुद्रुक मंडळी आतां सभा संपत आली असें पाहून परस्पर देवाच्या बागेंतून गडग्याचा आखाडा ओलांडून आडवाटेनें अंग चोरून आपापल्या घरीं निघून गेली.

"बापू! जातों." नाना शास्त्रीबुवांना म्हणाले.

"चला, मी येतों तुमच्या घराकडे. थोडें बोलायचें आहे तुमच्याशीं." असें म्हणून शास्त्रीबुवा त्या मंडळींतून नानांबरोबर त्यांच्या घरीं गेले.

गंगाराम देवळी पोलीस पाटील मांडावरच पण बाजूला पिंपळाखालीं बसला होता. तो ताबडतोब देवगडला मामलेदारसाहेबांकडे त्या सभेची तिखटमीठ लावून खमंग केलेली बातमी लिहून कळवण्यासाठीं चाकरीच्या महाराला शोधायला निघाला.

सभेंतून घरीं जातांना सदानंदाची चित्तवृत्ति महान विजयी योद्धयासारखी प्रफुल्ल झाली होती. त्या विजयाच्या जाणिवेंत अहंकार नव्हता. उन्माद होता. पण तो पावित्र्याचा, सात्विकतेचा, कर्तव्यपालनाच्या जाणिवेचा सर्वमंगल उन्माद होता.

त्या उन्मादाच्या प्रसन्नतामय तंद्रींत तो अंगणांतून घरांत पाऊल टाकतो तोंच पडवींत नानांचीं कालच तेल लावून वापरायला काढलेलीं नवीं कोरीं पायतणें दिसलीं. तेवढ्यांत घरच्या गड्यानेंही येऊन सांगितलें कीं नाना तिठ्यावरून माघारे आले; देवगडला गेले नाहींत.

"कां?" सदानंदानें त्याला हळूच विचारलें.

गडी तितक्याच हळू स्वरांत उद्गारला, "ने म्हणत होते कीं आजचा दिवस डाक्तराकडे जायला चांगला नाहीं. म्हणून ते तिठ्यावरून परत आले."

पण नाना एकटेच परत आले. देसाईणबाई त्यांच्याबरोबर आल्या नव्हत्या.

त्या कां आल्या नाहींत व कुठें गेल्या हें त्यांचें त्यांना आणि नानांना माहीत. आपण त्यांना परस्पर गाडींतून कासाड्यांला पाठवून दिलें हें कांहीं नाना घरांत गड्यापाशीं किंवा खोलींत गंभीरपणें बोलत बसलेल्या शास्त्रीबुवांपाशींही बोलले नव्हते. गंगाकाकीनें कीं कुणीतरी आगलावेपणा केल्यामुळें शिकारी कुत्र्यासारखे पोलीस शिकारीच्या वासानें टेहेळणी करीत आज आपल्या गांवाकडे येऊं लागले आहेत अशी कुणकुण त्यांना कळली. त्यासरसे ते परस्पर कासाड्यांला देसाईणबाईंना त्याच गाडींतून रवाना करून बाकीची अवश्य ती सारी निरवानिरव करण्यासाठीं त्याच पावलीं माघारीं गांवीं आले होते, हें त्या गड्याला काय माहीत!

गडी आपल्या कामाला निघून गेला. ओसरीवरच्या खोलींत दार लोटून घेऊन बोलत बसलेल्या नाना आणि शास्त्रीबुवा यांचा रागीट आवाज सदानंदाला चांगला ऐकूं येत होता. आपणाविषयींच त्या दोघांचें बोलणें चाललें आहे असें कळतांच माडीवर जातां जातां तो जिन्यांतच दबकून तें ऐकत उभा राहिला.

" पाहा बुवा! मला तरी कांहीं एकंदरींत हीं ब-याचीं लक्षणें दिसत नाहींत. गांधी काय अशी गांवाला आग लावायला सांगतात? स्वतःच्या हातानें स्वतःच्या वतनावर निखारा ठेवायला निघालेले हे राजेश्री! याचा बंदोबस्त कसा करायचा तो तुम्हीं जरूर केला पाहिजे. गय करतां उपयोगी नाहीं."

" अहो बापू! मी तरी गय करीन असें तुम्हांला वाटतें? पोटचा मुलगा झाला म्हणून काय झालें?"

तें संभाषण ऐकून सदानंदाच्या अंतःकरणांत क्रोधाचा वडवानल उफाळूं लागला. त्या आगीच्या भडकत्या ज्वालेसारखा तो त्या खोलीचा दरवाजा उघडून आंत जात उद्गारला, " नाना! मला तुमच्याशीं थोडें बोलायचें आहे."

" काय–काय बोलायचें आहे?" नानांनीं दुर्वासासारखे डोळे लाल करून पाहात विचारलें.

" तुम्ही मला समजतां तितका मी नेणता पोर आतां उरलों नाहीं नाना! बरें–वाईट माझें मला कळतें.—"

" घरादाराचें वाटोळें करायचें कळतें तुला. वतनवाडीवर तुळशीपत्र ठेवायला तूं निघालास—

" होय निघालों. माझ्या वतनवाडीवर मी तुळशीपत्र ठेवायला निघालों."

" जा स्वतः काय ते दिवे लाव, मिळव आणि त्यावर मग तुळशी-पत्र ठेव. तुला इथें आयत्या बिळांत नागोबा आणून बसवला तो कृतघ्ना-सारखा आम्हांला डसायला नव्हे."

" नव्हे! कुळांना डसायला. होय ना? आपलें इथें पटायचें नाहीं नाना!"

" पण तूं कोण? पटायचें नाहीं म्हणून तोंड वर करून मला सांग-णारा तूं कोण? मी सांगतों, इतक्या बेमुर्वतखोरपणानें वागायचें असेल तर या घरांत तुझें कांहीं नाहीं."

त्या वेळीं जर कुणाला नानांच्या अंतरंगाचा ठाव घेतां आला असता, तर त्या अंतरंगांत हा नाना अधिकारी हिंदु कायद्याच्या पाठबळावर देसाईणबाईंच्या मांडीवर दत्तक बसायच्या तयारीला लागलेला दिसला असता.

"बापजाद्यांच्या दौलतीचा धूर हा असा विषारी आहे खरा! या धुरांत फसून मी कुठें भलतीकडे आलों हा!" असें मनांत म्हणत सदानंदानें वडिलांना विचारलें, "मग तुमचें म्हणणें काय? हें घर माझें नाहीं?"

"घरांत धुळीचे दिवे लावणाऱ्या मुलासाठीं हें घर नाहीं. नीट वागायचें असलें तर ठीक आहे. नाहींपेक्षां तुम्हांला बारा वाटा मोकळ्या आहेत."

तीरासारखा सदानंद ते शब्द ऐकून माडीवर गेला. आपले कपडे, पुस्तकें, भराभर हाताला आलें तसें सर्व त्यानें कातड्याच्या बॅगेंत कोंबलें. आणि बॅग घेऊन जिना उतरला तो थेट बाहेर निघाला.

तो दरवाजाच्या बाहेर पाऊल टाकणार, तोंच तो काजरघाटीवरचा म्हातारा भिक्षा मागण्यासाठीं आलेला दारीं दत्त म्हणून उभा!

सुप्त ज्वालामुखी जागृत व्हावा व आगीचे लोळ ओकूं लागावा तसल्या संतापानें लालबुंद झालेल्या त्या म्हाताऱ्याच्या चर्येकडे सदानंदानें जातांना पाहिलेंही नाहीं. पण म्हाताऱ्यानें मात्र त्याच्याकडे पाहिलें.

"सदानंद! मागें फीर." म्हाताऱ्यानें गहिंवरलेल्या घोगऱ्या स्वरांत हांक मारली. पण सदानंद मागें फिरला नाहीं. त्यानें मागें वळून ढुंकून पाहिलेंही नाहीं.

"जाऊं दे त्याला बुवा! आईबापाच्या सांगण्या म्हणण्यांत नाहींत, असलीं पोरें असल्यापेक्षां नसलेलीं बरीं. जाऊं दे त्याला कुठें जायचें असेल तिकडे." नाना ओसरीवरून जरा खालच्या स्वरांत उद्‌गारले. त्यांना वाटलें, म्हातारा आपली बाजू घेऊन मुलाची समजूत घालूं पाहतो आहे. लगेच त्यांनीं म्हाताऱ्याला हांक मारून म्हटलें, "बुवा! आज तुम्ही जेवायलाच राहा ना आमच्या घरीं."

"तुझ्यासारख्या म्हारा—मांगाहूनही नीचाच्या घरचें अन्नसेवन करावें त्यानें नर्क सेवन करावा. हा कोण बोलतो आहे तूं ओळखलास? बद-फैलीपणाच्या घाणींतून मोरींतून देसायाच्या वतनांत आयत्या बिळांत नागोबा शिरलेल्या काळसर्पा! — "

संतापाच्या उद्रेकामुळें जिभेवरचें तें अर्धें वाक्य कोवळ्या पुष्पकळी-सारखें जिभेच्या टोंकानें तोंडांतल्या तोंडांत चुरगळून गिळून टाकीत म्हातारा एकदम बाहेर निघून गेला.

"हा म्हातारा मोठा चक्रम् दिसतो!" अशा न उमगणाऱ्या प्रश्नार्थक गूढ दृष्टीनें नाना आणि शास्त्रीबुवा कावरे बावरे होऊन एकमेकांच्या तोंडाकडे पाहूं लागले.

तोंच देवळाकडे दुपारचा बारांचा चौघडा झडूं लागला.

●

"दौलतीचा धूर हा असा असतो!"

घणाच्या घावासारखे ह्या विचाराचे घाव आपल्या निधड्या छातीवर झेलीत सदानंद घरांतून बाहेर पडला तो सुसाट काजरघाटीच्या वाटेनें चालूं लागला. माध्यान्हींचा सूर्य डोकीवर तळपत होता. तवा तापल्या-सारखी पायातळची वाट आणि सभोंवारची जमीन तापली होती.

तो वाट चालतां चालतां आपल्या मनाला समजावून सांगत होता, "दौलत! वाडवडिलांची दौलत! आम्ही कष्टाळू गोरगरीब कुळांच्या निढळाच्या घामांतून रक्तामांसाच्या चिखलांतून शेतांत पिकलेली दौलत लुबाडून आयतखाऊ देसाई जमीनदार बळी मातून बसलों आहों. त्या दौलतीचा धूर हा असा आहे!—बापाला मुलगा, मुलाला बाप, नवऱ्याला बायको असलें हें कुटुंबांतील नात्यांचें जें जाळें विणलें आहे तें ह्या दौलतीच्या धाग्यादोऱ्यांनीं. ह्या बळकट जाळ्यांत बळेंच बांधलेली ही आमच्या कुटुंबसंस्थेची आवळ्यांची मोट!— हें जाळें एकदां तुटूं द्या कीं मग हे आजचे बापलेक, नवराबायको, बहीणभाऊ कुणाचीं कोण? मग हे आवळे आजच्या कुटुंबसंस्थेच्या फाटक्या जाळ्याबाहेर माळावर

इतस्ततः पसरलेल्या दगडधोंड्यासारखे दाही दिशांना सैरावैरा उधळतील! हे असे माझ्यासारखे उधळतील!..."

स्वतःची प्राप्त परिस्थिति आठवून त्याचें त्यालाच हंसूं येऊं लागलें. तीन आठवड्यांपूर्वी ज्या वाटेनें तो त्या गांवीं आला होता त्या आल्या वाटेनेंच तो आज माघारा चालला होता.

" मला वाटत होतें कीं माझ्या मायदेशांत—या सात लाख खेड्यांत पसरलेल्या कोट्यवधि हीन दीन रंजल्या गांजल्या जनतेला करतां येईल तितकी सुजाण करून मी माझ्या मायदेशाच्या उद्धारासाठीं सत्याग्रहाचा लढा लढायला तिला उभी करीन. आम्ही सुशिक्षित पांढरपेशे समाजांतील वरच्या थरांतले मध्यमवर्गीय लोक—आम्ही आमच्या कोटमाप अजाण बांधवांना मार्गदर्शन केलें नाहीं तर भारतमातेच्या ह्या कोटि कोटि संतानांचा उद्धार कसा होणार ?...पण त्या माझ्या भारतमातेच्या हांकेचा खरा अर्थ आज मला कळला. आज मी जागा झालों. किती दुबळा आहें मी! ज्याच्या पोटीं जन्म घेतल्याबद्दल मरेपावेतों मला शरमेनें खालीं मान घालावी लागणार अशा एका दुराचारी गांवगुंड माणसानें मला आपणासारख्याच दुसऱ्या माजलेल्या गांवगुंडाच्या नांवानें दत्तक देऊन जमीनदार करावें, आणि त्याच्या मनाजोगा मी वागत नाहीं असें दिसतांच मला त्यानें भणंग बनवून बाहेरची वाट दाखवावी! कुठें गेलें तें आपलेकाचें नातें ? वाहवा रे माणूस! माणसानें डोंगरांतली माती आणावी, त्या मातीची मूर्ति बनवावी, त्या मूर्तीची पूजा अर्चा करून मंगल वाद्यांच्या गजरांत तिला विघ्नहर्तेपणाच्या परमोच्च सिंहासनावर बसवावें व देव म्हणून तिचा नमत्या मस्तकानें जोडल्या हातानें जयजयकार करावा; आणि तीच मूर्ति आपल्या मतलबाला जागेनाशी होतांच एका लाथेसरशी मोडून तोडून माळावरच्या मातींत मिसळून टाकावी. वाहवा रे माणूस! बाबा देसायासारख्या माणसांतल्या लांडग्याला तो मेल्यावर देखील माणूस पुन्हा देव बनवतो. शांतासारखी पापभीरु सच्छील मुलगी—ती आपल्या अब्रूचें दुकान मांडीत नाहीं म्हणून हा माणूस तिला छळतो. माझ्या मायदेशांतल्या सात लाख खेड्यांत हा माणूस खासगी दौलतीच्या जोरावर असें थैमान घालीत आहे. माझ्या भारतमातेचें रक्तशोषण करून माज-

णाऱ्या ह्या जळवा !—'या जळवांपासून कुणी तरी मला सोडवा रे!' ही माझ्या भारतमातेची हांक ह्या खेडोपाडीं मला आतां कुठें ऐकूं येऊं लागली..."

तो चालत होता व त्याचे विचार त्याच्यापुढें चालत होते. आपण कुठें जाणार, कुठें थांबणार, काय करणार याचा विचार करण्याइतका तो भानावर कुठें होता? तो शेतांतील वाट तुडवीत नदीवरचा सांकव ओलांडून जमनाच्या शेतावरून जाणाऱ्या वाटेनें घाटी चढूं लागला घाटी चढून तो सकाळींच शांतानें देवाची मसणवट करून सोडलेल्या काजऱ्याच्या राईपाशीं गेला. तिथून त्यानें एकवार मागें वळून पाहिलें, तेव्हां हा सोन्यासारखा गांव सोडून जातांना त्याच्या डोळ्यांना पाणी आलें.

पलीकडे चार हातांवर एक आंब्याचें झाड होतें. त्या झाडाखालीं तो उन्मत भ्रमिष्टासारखा जाऊन बसला. आणि विचार करूं लागला, "पुढें काय?"

तेवढ्यांत त्याच्या मागोमाग घाटी चढून येणाऱ्या म्हाताऱ्यानें त्याला पाहून हांक मारली, "सदानंद!"

म्हातारा त्याच्याजवळ आंब्याच्या पाळावर बसतां बसतां म्हणाला, "कांहीं हरकत नाहीं. झालें तें एकपरीनें चांगलेंच झालें. वेळींच तुझे डोळे उघडले. माझेही डोळे असेच उघडले. पण फार उशीरां—मसणांत माझ्या गोंवऱ्या गेल्यावर. तूं तसा भाग्यवान आहेस. आयुष्याच्या आरंभालाच ठेंच लागून कां होईना पण शहाणपण तूं शिकला आहेस. देसायाची अवलाद, सापाचें पोर मी तुला समजत होतों. पण तूं तसा नाहींस."

एक दीर्घ उसासा सोडून म्हातारा उद्गारला, "तूं भिऊं नकोस. लोकांचें कल्याण तुला करायचें आहे ना? त्या मार्गानें जातांना कोण तुला अडवणार आहे? त्या पाप्यांच्या दौलतीला आग लागूं दे. पण मी तुझा आहें." त्यानें गहिंवरून सदानंदाला आपल्या हृदयाशीं कवटाळून आपल्या आनंदाश्रूंचें अभ्यंग स्नान त्याला घालीत म्हटलें, "लोक मेला

मेला म्हणून समजतात तो ह्या निम्या देसाई वतनाचा मालक गोपाळराव देसाई तुझा आजोबा, माझ्या लेकरा! तुला आशीर्वाद द्यायला तुझ्या पाठीशीं उभा आहे. नांवासाठीं नव्हे तर पूज्य महात्माजींच्या दिव्य उपदेशामुळें तुमच्या आमच्या दृष्टिपथांत आलेल्या विश्वकुटुंबाच्या पायांतला एक लहानसा दगड—एक लहानशी दगडी कपार म्हणून तरी हा जन्म मरत्या म्हातारपणीं मावळतां मावळतां सार्थकीं लागावा म्हणून—माझ्या बाळा! तूं मला हवा आहेस. मी ह्या गांवचा पिढीजाद देसाई धनी म्हणून जन्माला येऊन देखील गांवच्या गोरगरीब शेतकरी कुळांचें कांहीं कल्याण करू शकलों नाहीं. पण आतां तरी माझ्या नाहीं तर तुझ्या हस्तें त्या शेतकरी दरिद्रीनारायणाची सेवा घडतांना पाहून मी ह्या माझ्या मायभूमीच्या मांडीवर सुखानें प्राण सोडीन. सत्याग्रहाच्या पुण्यकार्याची उभारणी करण्यासाठीं तूं घराबाहेर पडला आहेस; पुण्यवंता! तुझ्या मुखानें कानीं आलेल्या भारतमातेच्या हांकेला धांवून आलेला मीही एक सत्याग्रहीं आहें. चल ऊठ. चल आपल्या झोपडींत जाऊं. गांवांतला देसायाचा वाडा आतां तुझा सत्तेचा नसला तरी ही झोंपडी तर तुझी आहे! चल तुझ्या आईला तुझ्या राधाकाकीला भेटायचें आहे ना तुला?"

सदानंद वात्सल्यमय आनंदाच्या महापुरांत लीलेनें तरंगूं लागल्यासारखा हंसत एकदम उठून उभा राहून म्हणाला, "कुठें आहे राधाकाकी?"

"चल माझ्याबरोबर. दाखवतों तुला." असें म्हणून म्हातारा सदानंदाचा हात धरून झोंपडीकडे जाऊं लागला.

ते दोघे झोंपडीजवळ गेले. म्हातारा सदानंदाला अगदीं हळू स्वरांत म्हणाला, "मुद्दाम जरा बाहेर थांब. आपण थोडी गंमत करूं तिची."

"किती भाबडें लालित्य हें! इतके दिवस हें कुठें दडलें होतें? तें आजच कसें एकदम ओसंडूं लागलें?" असें स्वतःशीं म्हणत सदानंद थांबला.

"राधा!" अशी हांक मारीत म्हाताऱ्यानें दार उघडून आंत जातां जातां विचारलें, "एक पाहुणा जेवायला आला आहे. तुझ्या खाणा-

चळींत जेवायला मिळेल त्याला ? पाहुणा कुणी परका नाहीं. तुझा नातूच आहे. मिळेल त्याला जेवायला ? ”

एखाद्या अगदीं वठलेल्या चांफ्याच्या वृक्षाला नवे अंकुर फुटून ते हां हां म्हणतां कल्पद्रुमासारखे फोफावून पाळवून फुलांनीं बहरावे, आणि त्या फुलांचा प्रसन्न परिमल सभोंवारचें वातावरण सुगंधित करीत दरवळूं लागावा तसें नितान्तरम्य प्रसन्न यौवन त्या म्हाताऱ्याच्या वृत्तींतून बहरूं लागलेलें पाहून सदानंदाला जणूं भूवर स्वर्ग अवतरला असें वाटूं लागलें. म्हाताऱ्याचे उद्गार तो बाहेरून स्पष्ट ऐकत होता. त्याला आतां मुळींच राहवेना. तो तसाच झोंपडींत गेला. दाराच्या आंत पाऊल टाकतांच त्यानें त्या झोंपडींत सभोंवार नजरभरारीनें पाहात हांक मारली, “ राधाकाकी !—”

तो राधाकाकीच्या मुखाकडे पाहून क्षणभर दचकला व तिनेंही दचकून बाजूला मान वळविली.

“ अग ! लाजावें सकेशा विधवेनें. सौभाग्यवतीला लाजायचें काय कारण ? आतां कांहीं तूं विधवा नाहींस. तुझ्या कपाळींचें हें म्हातारें कुंकूं तुझ्या नातवाशीं आंत येण्यापूर्वीच बोललें आहे. ”

आतां मात्र सदानंदाला उमज पडला.

तो मग म्हणाला, “ राधाकाकी ! अगोदर आम्हांला जेवायाला वाढ पाहूं ! पण हें पाहा, आमच्याकडून आतां पैसा अडका कांहीं मिळायचा नाहीं बरें ! ”

त्या ऋणानुबंधी मायलेकरांना मनमोकळेपणानें बोलायला सवड मिळावी म्हणून म्हतारा आंघोळीच्या निमित्तानें नदीवर निघून गेला.

“ मी तुला इकडे आल्यापासून पत्र पाठविलें नाहीं म्हणून तूं माझ्यावर रागावली असशील नाहीं राधाकाकी ? ” राधाकाकी आंत कोपऱ्यांत मांडलेल्या तीन दगडांच्या चुलींत स्वयंपाकासाठीं विस्तव पेटवूं लागली, तेव्हां तिच्याजवळ जाऊन जमिनीवर बसकण मारीत लेकराच्या लडिवाळपणानें सदानंद बोलूं लागला.

"अरे तूं कोंबडा झांकलास म्हणून कांहीं उजाडायचें राहिलें नाहीं! सत्याग्रहांत मी येणार म्हटलें ती तूं आणलें नाहींस तरी आल्यें ना?" राधाकाकी मुखावरचें हास्य लपवीत किंचित् ओठ चावीत मुद्दाम त्याला खिजवण्यासाठीं त्याच्याकडे पाहात म्हणाल्या.

"म्हणजे? तूं सत्याग्रहाला आली आहेस?"

"होय तर! मी खरें म्हटलें तर विल्यापारल्याहून परस्पर सत्याग्रहींच्या तुकडीबरोबर शिरोड्यालाच जायची. पण लोक आपले कुणी कांहीं तर कुणी कांहीं तुझ्याबद्दल काळें बेरें बोलूं लागले, म्हणून म्हटलें एकदां समक्ष जाऊन पाहावें तरी!"

चांगली दोन घटका तीं मानलेलीं मायलेंकरें अशा सुखदुःखाच्या गोष्टी बोलत बसलीं होतीं. सदानंदानें कांहीं देखील आडपडदा न ठेवतां गांवीं आल्यापासूनची आपली सारी हकीकत तिला सांगितली.

आपल्या भालप्रदेशावर नजर फिरवून सदानंद बोलत असलेला पाहून टचकन् तिच्या नेत्रांत अश्रू उभे राहिले. ते पदराच्या टोकानें पुशीत घोगऱ्या स्वरांत ती उद्गारली, "सदानंद! माझी पुण्याई देवाच्या पायीं रुजू होती म्हणून देवानें माझें हें हरवलेलें कुंकूं मला शोधून दिलें. मला माहीत नव्हतें हे जिवंत असतील आणि ते असे भणंगासारखे इथें राहात असतील असें.—बाकी त्यांचेंही खरेंच. माणूस अब्रूसाठीं मरतो. त्यांना आपलें वाटलें,—पुरुषाची जात. म्हातारपणांतली तरणी बायको आपल्या शीलाला जिवापेक्षां जास्त जपत असेल इतका विश्वास कोणत्या म्हाताऱ्या नवऱ्याचा आपल्या बायकोवर असतो तो यांचा असेल! पण आतां मात्र त्यांची पुरी खात्री पटली.—बाकी यांनीं देखील खोट्या संशयानें मला कांहीं कमी छळलें नाहीं. म्हणतात ना, नवराच बायकोला वेडें वांकडें कांहीं म्हणाला कीं जन तिला सांड म्हणतो. यांना—इतक्या पोक्त वयाचे हे, लोक बोलतात त्यांतलें खरें काय आणि खोटें काय एवढें कळायला नको होतें?—मुळांतच यांनीं मला या घरांत कां ठेवावें? खरोखर हा बायकांचा जन्म मेला फार वाईट. अनेक जन्मीं पापें करावीं आणि एकदां बायकोच्या जन्माला यावें. डोळे असून बघायचें नाहीं, कान असून ऐकायचें नाहीं, तोंड असून

बोलायचें नाहीं. गोठ्यांत दावणीला बांधलेल्या मुक्या गाई जशा कांहीं यांच्या बायका म्हणजे !..."

तोंच दारांतून आंत पुसट सावली पडलेली पाहून कोणीतरी आलें असें ओळखून ती तेवढ्यावरच बोलायची थांबली.

"हां ! तुला मुलगा नव्हता तो मुलगा मिळाला ना ? त्याच्या जोडीला आणखी ही मुलगी घे." म्हातारा शांताचा हात हातीं धरून तिला आंत आणतां आणतां म्हणाला.

तो पुढें म्हणाला, "मूर्ख कुठची ! जीव द्यायला निघाली होती नदीवर. चूक दुसऱ्याची. त्या चुकीबद्दल शिक्षा काय आपण भोगायची ?— सदानंद ! तुझ्या सत्याग्रहीच्या तुकडीत आतां एक सोंडून दोन सत्याग्रही बायका झाल्या. उद्यां आबा मास्तर तुरुंगांतून शिक्षा भोगून देशभक्त बनून आला म्हणजे देशभक्त न झालेल्या मुलीशीं मी लग्न कसें करूं अशी घमेंड त्याला वाटायला नको. —जा बैस तिच्यापाशीं जाऊन. तुला घरादाराचें, गांवाचें पुन्हा तोंड बघायचें नाहीं ना ? तर नको बघूं— घरादारावर गांवावर तुळशीपत्र ठेवून आम्ही सत्याग्रहाला निघालों आहों तशी तूंही चल आमच्याबरोबर."

सदानंद प्रतिभाशाली कथालेखक व कवि होता. शांताचें तर त्याला कौतुक वाटलेंच; पण शांतापेक्षांही त्या उत्साही म्हाताऱ्याचें तर त्याला प्रतिभाशाली कल्पनाशक्तींतही न समावण्याइतकें नवल वाटलें.

"मानवतेच्या जन्म–मृत्यु–पुनर्विकासाची असली अनन्य साधारण प्रतिकृति कोणत्याही शब्दसृष्टीच्या ईश्वराला आपल्या सृष्टींत निर्माण करतां येणार नाहीं, ती आपणाला आज मूर्तिमंत लाभली आहे. हिचा उपयोग पुढेंमागें आपण आपल्या शब्दसृष्टींत करणारच."—ही आठवण नीट ठेवायला आपल्या मनाला बजावीत व नव्यानें जन्माला आलेल्या शांताकडे स्नेहाळू नजरेनें पाहात तो राधाकाकीला म्हणाला, "जेवायला वाढाना आम्हांला आतां लवकर. भूक फार लागली. असा जेवणापायीं सारा दिवस मोडून प्रचार कसा व्हायचा ?"



# भारतमाते, ऊठ !

...श्री. हडप यांची 'कादंबरीमय आंग्लशाहीं'तील पांच संकल्पित कादंबऱ्यांपैकीं 'भारतमाते, ऊठ!' ही पहिली कादंबरी असून ती एक नवें दालन उघडीत आहे असें म्हणतां येईल. १९१८ ते १९२२ या कालखंडांतील ३० मार्च १९१९ चा दिल्ली येथील गोळीबार, नंतर जालियनवाला बाग कत्तल, त्यानंतरची गुरुद्वारांतील शीखांची कत्तल, रायबरेलीचा किसान मोर्चा व त्यानंतरचा फैजाबाद जिल्ह्यांतील संघर्ष हे या कादंबरींतील प्रमुख प्रसंग आहेत. यांतील हरकिसन, कहानसिंग, आणि सत्तावनच्या बंडांत होरपळून निघालेला म्हातारा अयोध्यानाथजी हीं स्वभावचित्रें जिवाला चटका लावणारीं आहेत. कौसल्या हें स्वभावचित्र गांधीजींच्या प्रभावानें सर्व दुःखें गिळून देशसेवेला वाहून घेणाऱ्या अगणित महिलांचें प्रातिनिधिक आहे. कथानकाचा विस्तार मोठा, पात्रें अनेक असें असूनही त्याची सुसूत्रता कोठेंही ढळत नाहीं. प्रसंगांची गुंफणही कृत्रिम वाटत नाहीं...काळ अलीकडचा व वातावरण राजकीय यामुळें प्रसंगांबाबत योग्य ते आधार घेण्याची दक्षता श्री. हडप यांनीं दाखविली आहे.

—लोकसत्ता, मुंबई.

